भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, पुरस्कृत ग्रंथमाला, क्रमांक २१



# सम्पूर्ण भूषण

( 'शिवराज-भूषण', 'शिवा-बावनी', भाषांतर 'छत्रसाल दशक' 'फुटकर' कविता संग्रह—कठिण शब्दार्थांसह )

जे सोहात सिवराज को ते कवित्त रसमूल

—शिवराज-भूषण

अनुवादक

## रामचंद्र गोविंद काटे

शके १८५१ ]    मूल्य १॥ रुपया    [ सन १९३०

# अनुक्रमणिका

पृष्ठ





# पुरस्कार

रा० काटे यांनीं तयार केलेला सम्पूर्ण भूषण-मराठी भाषांतर-हा ग्रंथ श्रीशिवाजी-त्रिशतसांवत्सरिक महोत्सवाचे (शके १५५१ प्रमाणें) शुभप्रसंगीं जनतेस सादर करण्याचा योग येत आहे ही गोष्ट फार आनंददायक तशीच अत्यंत उचित म्हटली पाहिजे.

भूषण कवीच्या ग्रंथांकडे महाराष्ट्रांत विशेष बारीक लक्ष्य पुरविण्यांत आलें नाहीं, ही तक्रार खरी आहे.

प्रो० सरकार यांनीं भूषणाचे ग्रंथांविषयीं अभिप्राय 'नो हिस्टरी नो डेट्' (जदु० तिसरी आवृत्ति) या सूत्रांत दिला आहे, या सूत्राचे दोन्ही अर्थ मिथ्या आहेत, हें या ग्रंथांतील विवेचनावरून स्पष्ट होईल.

मराठी, इंग्रजी, फारसी, पोर्तुगीज, डच, वगैरे भाषांप्रमाणेंच हिंदी भाषेंतहि शिवेतिहासरचनेस उपयुक्त असें **समकालीन** साहित्य आहे आणि त्याची चिकित्सा करून मिळेल तेवढी भर आपल्या ज्ञानभांडारांत घातली पाहिजे एवढी गोष्ट प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनानें स्पष्टपणें स्थापित होईल आणि हाच त्याचा ऐतिहासिकांच्या दृष्टीनें मुख्य विशेष होय.

कवी, रसिक व देशभक्त यांना तर भूषणाचा ग्रंथ मराठींत उतरल्यानें मोठाच लाभ झाला असें वाटेल; परंतु निर्विकार असे जे इतिहासविमर्शी पंडित त्यांनाहि वर सुचविलेप्रमाणें तसाच अनुभव येईल.

ऐतिहासिक दृष्टीनें भूषणाच्या ग्रंथाची याहीपेक्षां सूक्ष्म चिकित्सा व्हावयास पाहिजे. तज्ज्ञ या संधीचा पूर्ण फायदा घेतील व यांतील उणिवा प्रकट करतील अशी उमेद आहे.

रा० काटे, रा० जोशी व रा० खुपेरकरशास्त्री या त्रिवर्गांनीं वरील कार्यास योग्य आरंभ केला आहे यांत संशय नाहीं.

लाल–भूषणप्रभृति कवींच्या ग्रंथांतील निर्मळ सत्य, खसखशीत चिकित्सेनेंच प्रगट होईल. आतां तो मार्ग या ग्रंथामुळें सुकर होईल.

रा० काटे यांचे परिश्रम व कळकळ अत्यंत अभिनंदनीय आहे. आपल्या कार्याचा अभिमान त्यांनीं असाच जागता ठेविला पाहिजे आणि त्यासाठीं सर्वांनीं योग्य तें प्रोत्साहन ग्रंथकर्त्यास देण्यांत अंतर करतां कामा नये.

हुताशनी पौर्णिमा
शके १८५१, पुणें.

मंडळाचे आज्ञेवरून
दत्तो वामन पोतदार
चिटणीस, भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, पुणें.

---

* 'मंडळा'चे [illegible]



# निवेदन

पुन्यचरित्र सिवा सरजै सर ॥
न्हाय पवित्र भई पुनि बानी ॥२९०॥

—शिवराज-भूषण

[पावन चरित्र अशा शिवराज-तीर्थांत स्नान केल्यामुळें वाणी पुन्हा पवित्र झाली.]

श्री छत्रपति शिवाजीमहाराज यांचे पदरीं असलेल्या कविभूषणाच्या 'शिवा–बावनी' नामक ५२ छंदांच्या काव्याचें मराठी सरळ भाषांतर मे १९२७ मध्यें झालेल्या त्रिशत–सांवत्सरिक–जयन्तीप्रसंगीं मुंबई उत्सव कमिटीतर्फे प्रसिद्ध करण्यांत आलेल्या 'Shivaji Souvenir'-मध्यें समाविष्ट करण्यांत आलें होतें; आज फाल्गुन वद्य ३, शके १८५१ (१७–३–१९३०) रोजीं नवीन व ऐतिहासिक तिथीवर साजऱ्या होणाऱ्या त्रिशत-सांवत्सरिक–जयन्तीच्या मंगल प्रसंगीं भारत इतिहास–संशोधक-मंडळाच्या पुरस्कृत ग्रन्थमालेकडून 'संपूर्ण–भूषण' महाराष्ट्रासमोर येत आहे.

कवि–भूषण यांचा महाराष्ट्रीयांस आज नव्यानें परिचय होत आहे असें नाहीं. सुमारें चाळीस वर्षांपूर्वीं (शके १८११ त) 'काव्येतिहास–संग्रहां'तून भूषणांची 'शिवराज–भूषण' व कांहीं स्फुट कविता प्रसिद्ध झाली होती, याच काव्येतिहाससंग्रह प्रतीच्या दोन आवृत्त्या 'लक्ष्मी–व्यंकटेश्वर प्रेस, मुंबई'कडून प्रसिद्ध झाल्या. दुसरी आवृत्ति रा० काशीनाथ पांडुरंग परब यांचेकडून प्रत मिळवून त्यांच्याच उत्तेजनावरून प्रसिद्ध केली असें तिसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनालेखकांनीं म्हटलें आहे.

तिसरी आवृत्ति शके १८३९ त प्रसिद्ध झाली. लक्ष्मी-व्यंकटेश्वर प्रेस-कडून मुंबईसारख्या महाराष्ट्राच्या शहरीं जरी भूषणकाव्याच्या दोन आवृत्त्या निघाल्या तरी ह्या प्रेसचा सर्व व्यवहार हिन्दी जगताशीं असल्यामुळें

महाराष्ट्रांत ह्या आवृत्त्यांचा तादृश उपयोग झाला नाहीं असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं. भूषणाचा कांहीं थोडा परिचय महाराष्ट्रीय इतिहास-भक्तांना व काव्यप्रेमी रसिकांना काव्येतिहाससंग्रहांतून प्रसिद्ध झालेल्या 'शिवराज-भूषणा'मुळेंच राहिला आहे. यानंतर कांहीं थोडे लेख* वगळले असतां महाराष्ट्रांत भूषणाच्या काव्यासंबंधीं कांहीं चर्चा झाली नाहीं असें म्हटल्यास अत्युक्ति होणार नाहीं.

प्रस्तुत अनुवादकर्त्याचें शिवा-बावनीचें मराठी सरळ भाषांतर प्रसिद्ध झाल्यानंतर श्री० तिवारी यांचा मंदारमाला वृत्तांतील शिवा-बावनीचा अनुवाद 'शिवप्रताप' नांवानें कविचरित्रासह एप्रिल १९२८ मध्यें प्रसिद्ध झाला.

उत्तर हिंदुस्थानांत प्रथम संवत् १९५० म्हणजे ३६ वर्षांपूर्वी 'शिवराज-भूषण' मूळ काव्य नवलकिशोर प्रेसमधून श्री० परमानन्दजी सुहाने यांनीं प्रसिद्ध केलें. यानंतर कलकत्ता येथील वंगवासी-भूषण ग्रन्थावली, बाराबंकी येथील शिवराज-भूषण हीं प्रसिद्ध झालीं व अलीकडे या दहाबारा वर्षांत काशी नागरी प्रचारिणी सभेतर्फे विख्यात मिश्रबन्धु सम्पादित एक व हिन्दी साहित्यसम्मेलन प्रयागतर्फे श्री० रामनरेशजी त्रिपाठी यांनीं एक अशा दोन भूषण-ग्रंथावल्या आपापल्यापरीनें प्रसिद्ध केल्या. ह्या दोन्ही ग्रंथावल्यांच्या तीन तीन आवृत्त्या खपून गेल्या.

मिश्रबन्धूंनीं आपली प्रत प्रसिद्ध करण्यापूर्वी पूर्वप्रसिद्ध व अप्रसिद्ध सर्व भूषण-वाङ्मय¶एकत्रित केलें होतें व युगल किशोर मिश्र यांच्या-

---

*श्री० तिवारी यांचा महाराष्ट्र-साहित्य मासिकांतील 'कवि-भूषण' शीर्षक लेख, मे १९२२.

¶ वंगवासी-भूषण ग्रंथावली. २ शिव-भूषण, नवलकिशोर. ३ पुण्याची प्रत ( काव्ये. संग्रहाची ). ४।५ मुंबई प्रत कल्पतरु प्रेस व निर्णयसागर प्रेस. ६ बाराबंकी येथील शिव-भूषण प्रत. ७ युगल किशोर मिश्र यांजकडील हस्तलिखित प्रत ८ कवि गोविंद गिल्लाभाई काठेवाड यांजकडील हस्तलिखित.

कडील हस्तलिखित प्रतीचा शुद्धतेच्या दृष्टीनें अधिक उपयोग झाला व सर्वांत अधिक छंद कवि गोविंद गिल्लाभाई यांच्या संग्रहांतील हस्तलिखित प्रतींत मिळाले. हें त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत दाखविलें आहे. श्री० त्रिपाठीजींनीं मिश्र-बन्धूंचा हा संशोधित पाठ अधिक शुद्ध मानून थोड्याबहुत फरकानें आपली प्रत तयार केली. हिन्दी-साहित्यांत ह्या दोन्ही प्रती अधिक प्रमाणभूत मानल्या जातात म्हणून मीं यांचाच अवलंब केला आहे.

मिश्र व त्रिपाठी प्रतींतील शिवराज-भूषणाचा अनुक्रम सारखा आहे; पण शिवा-बावनी, छत्रसाल-दशक व फुटकर (स्फुट) यांतील अनुक्रम व छंद-संख्या यांत बरेंच अंतर आहे. त्याचा विचार त्या त्या सदरांत पुढें करण्यांत येईल.

## शिवराज-भूषण

सिव चरित्र लखि यों भयो कवि-भूषन के चित्त।
भाँति भाँति भूषननि सों, भूषित करौं कवित्त ॥२९॥

—शिवराज-भूषण.

हें शिवराजासंबंधीं कवि-भूषणाचें मुख्य काव्य. यांत कवीनें चांगले चांगले ग्रंथ पाहून व आपल्या मताप्रमाणें एकशें पांच अलंकारांनीं आपण शिवरायाचें वर्णन केलें असें सर्व अलंकारांची सूचि स्वतः देऊन म्हटलें आहे—

युत चित्र संकर एकसत भूषन कहे अरु पाँच।
लखि चारु ग्रंथन निज मतोयुत सुकवि मानहु साँच ॥

पृष्ठ १३३। १३४, दोहा ३७१ ते ३७९.

प्रथम दोहा वृत्तांत अलंकार-लक्षण देऊन त्याच्या उदाहरणांतून शिवचरित्राचें कवीनें रसभरित वर्णन केलें आहे. एकेका लक्षणाचें उदाहरण प्रायः एकेदा छंदांत केलें आहे. क्वचित् दोनदोन तीनतीन चारचार छंदांचाहि उपयोग केला आहे. उदाहरणांकरितां मनहरण, हरिगीतिका,

अमृतध्वनि, मालतीसवैया या वृत्तांचा प्रामुख्यानें उपयोग केला आहे. हें काव्य राज्याभिषेकानंतर सुमारें पंधरा दिवसांत तयार झालें असें कवीनें स्वतःच दिलेल्या ग्रंथसमाप्तिकालावरून दिसून येतें. ( दोहा ३८०, पृष्ठ १३४ ) मिश्र प्रतींतील ह्या रचनाकालाच्या दोह्यांत पाठभेद*असून त्यांच्या मतें कवीनें महिना लिहिला नाहीं; पण मुंबई प्रतींत व त्रिपाठी प्रतींत या बाबतींत साम्य दिसून येतें. त्रिपाठीजींनीं ह्या दोह्याचा अर्थ देतांना 'सुचि वदि तेरसि भान' ह्याचा अर्थ आषाढ वद्य १३ रविवार, असा केला आहे. शिवचरित्र प्रदीपांत× श्री० दिवेकर यांनीं अनेक साधनांनीं हा समाप्तिकाल ज्येष्ठ वद्य १३ रविवार, म्हणजे वर म्हटल्याप्रमाणें राज्याभिषेकानंतर बरोबर १५ दिवस ठरविला आहे व हा बरोबर असल्याचें श्री० गोविंदरावजी सरदेसाई यांनीं Shivaji Sounenirमध्यें आपल्या निवेदनांत कबूल केलें आहे.

या ग्रंथाचा प्रारंभकालहि विवादित आहे. कोणी म्हणतात, भूषण शिवराजाचे दरबारीं आल्यापासून म्हणजे सन् १६६७ पासून हें काव्य रचण्यास सुरवात केली असावी व राज्याभिषेकानंतर समाप्त केलें असावें. तर कोणी म्हणतात; भूषणासारख्या प्रतिभासम्पन्न कवीला महिना-पंधरा दिवसांत एवढें काव्य रचणें अशक्य नाहीं, सबब राज्याभिषेकापूर्वी महिना-पंधरा दिवस सुरू करून पुढें पंधरा दिवसांत संपविलें असावें. असो.

मुंबई प्रतींत शिवराज-भूषणाची छंदसंख्या ३२७ दिली आहे. तींत अलंकारसूचीचे १८ छंद धरिले आहेत. मिश्रप्रतींत व* त्रिपाठीप्रतींत हेच ९ आहेत. हे छंद ९ च समजल्यास मुंबई प्रतीची संख्या ३१८ होते. मिश्र व त्रिपाठी प्रतींतील छंदसंख्या ३८२ आहे. अर्थात् मुंबई प्रतीपेक्षां ६४ छंद मिश्र व त्रिपाठी प्रतींत अधिक आहेत. ह्या ६४ छंदांपैकीं, छंद ३६, ४३, ४५, ४७, १२७, १७९, १८८, १९४, २०१, २०३, २९८ हे अकरा छंद अलंकार लक्षणाचे आहेत. ते अलंकार हे—लुप्तोपमा ३६,

* पाठभेद पृष्ठ १३४ वर दिला आहे. × शिवचरित्र प्रदीप, पृष्ठ ३०५।३०६.

प्रतीपाचे तीन भेद ४३, ४५, ४७, तुल्ययोगिता दुसरा प्रकार १२७, आक्षेप दुसरा प्रकार १७९ विभावनेचा प्रकार १८८, विशेषोक्ति १९४; असंगतिचे दोन प्रकार २०१ व २०३ आणि अनुगुण २९८.

बाकी ५३ छंद, वरील ११ व इतर अलंकार-लक्षणाच्या उदाहरणांचे आहेत.*

हा ग्रन्थ कोणताही एखादा अनुक्रम (ऐतिहासिक प्रसंगाचा अथवा काळाचा) धरून रचलेला नाहीं. कारण कवीस शिवचरित्र, अलंकारांच्या उदाहरणाकरितां अभिप्रेत होतें. त्या दृष्टीनें जो प्रसंग उपयोगी वाटला तो अलंकार लक्षणाप्रमाणें घेतला, त्यायोगानें प्रसंग मागेंपुढें होणें सहाजिक आहे. आणि यामुळें एकेका ऐतिहासिक प्रसंगाचें वर्णन निरनिराळ्या अलंकारांतून झालें आहे, त्यामुळें एक ऐतिहासिक प्रसंग तयार करणें असल्यास त्या प्रसंगाचें विखुरलेलें वर्णन एकत्र करावें लागतें.

इतरत्र व्यक्ति व स्थल सूचि दिली आहे त्यावरून भूषणानें कोणत्या ऐतिहासिक प्रसंगाचें व स्थलाचें वर्णन कोणत्या व किती छंदांतून केलें आहे हें दिसून येईल.

कवीनें ह्या ग्रंथाचें नामकरणहि मोठ्या कुशलतेनें केलें आहे. 'शिवराज-भूषण' ह्या सामासिक पदाचे २।४ अर्थ संभवतील. उदा० (१) शिवराजाचें यश अलंकारात्मक वर्णिल्यामुळें ह्या ग्रन्थाचें नांव 'शिवराज-भूषण' हें अन्वर्थक वाटतें. शिवराजाचें वर्णन कवि-भूषणानें केलें म्हणजे स्तव्य व स्तोता ह्या उभयतांच्याहि नांवाचा बोध 'शिवराज भुषण' ह्या पदावरून

*मुंबई प्रतीहून मिश्र व त्रिपाठी प्रतींतील अधिक असलेले छंद:—१, २७, ३६, ३७, ४३, ४४, ४५, ४६, ४७, ४८, ५०, ६९, ७२, ८४, ८७, ९७, १०४, ११७, १२३, १२७, १२८, १३२, १३३, १४३, १४८, १५४, १५५, १५९, १६२, १७१, १७९, १८०, १८८, १८९ १९०, १९३, १९४, १९५, २०१, २०२, २०३, २०४, २१३, २२१, २२६, २२९, २४३, २५९, २६५, २७३, २७९, २९६, २९८, ३२०, ३२३, ३२८, ३२९, ३३७, ३४५, ३४६, ३५१, ३५२, ३५९, ३८२ = एकूण ६४.

*

होतो.(२) हा ग्रन्थ शिवरायास भूषणभूत असल्यामुळेंहि या नामाभिधानास अनुरूप असाच आहे. असो.

आपल्या काव्यनायकाचें अलंकारात्मक वर्णन करणारा कवि-भूषणाशिवाय दुसरा कोणी झाला नाहीं.

## शिवा-बावनी

> कासी हू की कला जाती मथुरा मसीत होती,
> सिवाजी न होतो तो सुनति होति सबकी ॥
>
> —शिवा-बावनी.

या काव्याच्या नांवावरूनच समजून येतें कीं, हांत शिवाजीसंबंधाचे ५२ छंद (श्लोक) आहेत. हें एक छोटेंच पण मोठें प्रभावशाली काव्य आहे. शिवाजीच्या पराक्रमाचें तसेंच चहूंकडे त्याच्या बसलेल्या दराऱ्याचें वर्णन कवीनें प्रत्यक्ष पाहिल्याप्रमाणें केलें आहे. वीररसापेक्षां रौद्र व भयानक या रसांचा परिपोष अधिक प्रमाणांत झालेला दिसून येतो. ह्यांतील बहुतेक वर्णन राज्याभिषेकानंतरच्या प्रसंगास अनुलक्षून आहे असें मिश्र-बन्धूंचे मत आहे; पण तत्पूर्वीचें वर्णनहि कांहीं कमी नाहीं हें 'बावनी'चा जो सारांश सूचीरूपानें इतरत्र दिला आहे त्यावरून दिसून येईल.

या काव्यांत नांवाप्रमाणें शिवाजीविषयक ५२ छंदांचाच समावेश असावयास पाहिजे; परन्तु जुन्या प्रतींतून अवधूतसिंह सुलंकी, चिंतामणि, साहूजी इत्यादिकांच्या वर्णनाचे छंद मिसळलेले आहेत; ते मिश्र व त्रिपाठी प्रतींतून वगळले आहेत व त्याऐवजीं फुटकर (स्फुट) कवितेंतून शिवाजीसंबंधाचे छंद निवडून घेऊन ५२ छंदांची भरती केली आहे. ही निवड मिश्रबन्धूंनीं आपल्या मताप्रमाणें व त्रिपाठीजींनीं आपल्या समजुतीप्रमाणें केली आहे. त्यामुळें नवीन त्रिपाठी प्रतींत सात छंद मिश्र प्रतीहून निराळे छापले आहेत. मीं सम्मेलन प्रतीचा क्रम ठेविला असल्यामुळें मिश्रप्रतीहून फक्त छंद क्र. १ व ५० हे दोनच छंद निराळे असल्याचें

दिसून येईल. मिश्र व त्रिपाठी प्रतींत निराळे असलेले छंद फुटकरमध्यें घातले आहेत. सारांश, भूषणाचा उपलब्ध कोणताहि छंद शुद्ध दिला नाहीं.

दक्षिणेंत आल्यावर भूषणांनीं शिवरायाच्या दरबारांत वीररसपर ५२ छंद म्हणून दाखविले व त्याबद्दल त्यांना बावन लाख रुपये मिळाले अशी जी आख्यायिका प्रसिद्ध आहे, तीस अनुलक्षून कोणा तरी भूषण-भक्तानें ह्या छंदाचा संग्रह मागाहून आपल्या समजुतीप्रमाणें केला असावा. भूषणांनीं आपले असेच बावन छंद म्हणून दाखविले असें निश्चित पणें सांगण्यासारखा पुरावा नाहीं. तरीपण एकं रीतें पाहातां संग्रहित छंद जोरदार व वीर, रौद्र, भयानक या रसांनीं परिपूर्ण असे आहेत.

हिन्दी साहित्यांत 'बावनी'प्रमाणें जोरदार व वीररसानें भरलेली कविता दुसऱ्या कोणा कवीची नाहीं असें हिन्दी साहित्यभक्त मुक्त-कंठानें म्हणतात.

## छत्रसाल-दशक

> भूषन भनत राय चम्पति को छत्रसाल रोप्यो रन
>
> ख्याल ह्वै के ढाल हिन्दुवाने की ॥
>
> —छत्रसाल दशक.

भूषणांनीं शिवाजीप्रमाणेंच हिन्दुधर्माभिमानी असलेल्या व शिवाजी-च्याच उपदेशाप्रमाणें वागणाऱ्या छत्रसाल बुन्देल्याच्या स्तुतिपर काहीं छंद रचिले आहेत. ते बावनीप्रमाणेंच कोणातरी भूषण-भक्तानें निवडून 'छत्रसाल-दशक' या नांवानें संग्रहित केले आहेत. मिश्र व त्रिपाठी प्रतींतील संग्रहांत अगदींच फरक आहे. छत्रसाल बुन्देल्याच्या पदरीं 'लाल' नांवाचा कवि होता. त्यानें हि छत्रसाल बुंदेल्याचें 'छत्र-प्रकाश' नामक काव्यांतून उत्कृष्ट वर्णन केलें आहे; त्याचेंहि छत्रसाल-वर्णनपर काहीं स्फुट छंद भूषणाच्या दशकांत मिसळले आहेत. तसेंच बुन्देला छत्रसालाच्या समकालीन पन्ना छत्रसाल (बुंदी-नरेश) नांवाचाहि एक राजा होऊन गेला. त्याच्या वर्णनाचेहि दोन चार छंद भूषणाच्या संग्रहांत

मिसळले आहेत. त्रिपाठी प्रतींत हे सर्व छंद वेगळे करून भूषणाचे तेवढेच दहा छंद बुंदेला-छत्रसालसंबंधाचे छापले आहेत. मीं आपल्या प्रतींत तेच कायम ठेविले आहेत.

भूषणांनीं आरंभींच्या दोन* दोह्यांतून स्पष्ट म्हटलें आहे कीं, दोघेहि छत्रसाल औरंगजेबाच्या डोळ्यांत सलत होते; एक हाडावंशी बुंदी नरेश व दुसरा महेवाचा छत्रसाल (हाच छत्रसाल बुन्देला) व बुन्दीनरेश ऊर्फ हाडा छत्रसाल हा आरंभीं दाराकडून औरंगजेबाशीं लढत होता व पुढें औरंगजेबाचे पदरीं राहिला म्हणून यास भूषणांनीं 'दिल्लीची ढाल' (दिल्लीचें ढालीप्रमाणें संरक्षण करणारा) व बुंदेला छत्रसाल दिल्लीपतीचा पराजय करून त्याचे ताब्यांत गेलेला आपला मुलूख हस्तगत करण्याचा प्रयत्न करीत होता म्हणून त्यास 'दिल्ली-दाहनवाल' (दिल्ली-विध्वंसक) असें म्हटलें आहे. या यवनाश्रित हिन्दू राजाचें स्तवन भूषणासारख्या स्वधर्माभिमानी कवीनें मुळींच केलें नसावें ही त्रिपाठीजींची कल्पना सयुक्तिक दिसते. असो.

त्रिपाठी प्रतींहून निराळे असलेले छत्रसाल दशकांतील छंद वाचकांकरितां या खालीं देत आहे—

निकसत म्यान ते मयूखैं प्रलैभानु कैसी, फारे तम तोम ज्यौं गयंदन के जाल को। लागत लपटिकंठ बैरिन के नागिन सी रुद्रहि रिझावैं दै दै मुंडन के माल को॥ 'लाल' छितिपाल छत्रसाल महाबाहु बली कहाँ लौं बखान करौ तेरी करवाल को। प्रतिभट कटक कटीले केते काटि काटि कालिका सी किलकि कलेऊ देत काल को॥ १॥

दारा और औरंग लरे हैं दोऊ दिल्लीवाल एक भाजि गयो एक मारे गये चाल में। बाजी करि दगाबाजी जीवन न राखत है जीवन बचाये ऐसे महाप्रलै काल मैं॥ हाथी तें उतरि हाड़ा लड़्यो लोह लंगर दै कहै 'लाल' वीरता

* हे दोहे भूषणाचेच आहेत असे खात्रीलायक म्हणतां येत नाहीं.

बिराजै छत्रसाल मैं। तन तरवारिन मैं मन परमेश्वर मैं पन स्वामिकारज मैं माथो हरमाल मैं ॥ २ ॥

चले चन्दबान घनबान औ कुहूकबान चलत कमान धूम आसमान छ्वै रहो। चली जमडाढै बाढ़वारैं तरवारैं जहाँ लोह आँच जेठ के तरनि मान वैं रहो। ऐसे समै फौजें बिचलाई छत्रसालसिंह अरिके चलाये पायँ बीररस च्वै रहो। हय चले हाथी चले संग छोड़ि साथी चले ऐसी चलाचली मैं अचल हाड़ा व्है रहो ॥ ३ ॥

कीबे को समान प्रभु ढूँढि देख्यौ आन पै निदान दान युद्ध में न कोऊ ठहरात है। पंचम प्रचंड भुज दण्ड को बखान सुनि भागिबे को पच्छी लौं पठान थहरात हैं॥ संका मानि सूखत अमीर दिली वारे जब चम्पति के नन्द के नगारे घहरात हैं। चहूँ ओर चकित चकत्ता के दलन पर छत्ता के प्रताप के पताके फहरात हैं ॥ ४ ॥

या चार छंदांपैकीं पहिल्या दोन छंदांत कवीचें नांव आलें आहे. त्यावरून ते लाल कवीचे आहेत; भूषणाचे नाहींत हें उघड होत आहे. तिसऱ्यांत कवि-नाम नाहीं व वर्णन हाड़ा छत्रसालचें आहे, ( याचें वर्णन भूषणांनीं केलें नाहीं हे वर दाखविलेंच आहे ) बुन्देला छत्रसालाचें नाहीं; चौथा 'पंचम' नामक कवीनें रचला असावा असें त्रिपाठीजींचें मत आहे. मिश्रबन्धु ह्या पंचमास बुन्देल्याचा पूर्वज समजतात. सारांश, यांतहि कविनाम नसल्यामुळें भूषण-रचित नाहीं असें दिसतें.

भूषणानें ज्या छत्रसाल बुंदेल्याचें वर्णन केलें आहे त्याचा अल्पसा परिचय देणें अप्रासंगिक होणार नाहीं.

छत्रसाल बुन्देला हा चम्पतिराय नामक राजाचा मुलगा. हा शहाजहानच्या वेळीं मोगलाशीं लढत असे. पण शाहजहाननें एकदां याचा पूर्ण पराभव केला, तेव्हां नाइलाजास्तव मोगलांची नोकरी यास पतकरावी

लागली. शहाजहाननें यास तीन लक्षांचा कौंच परगणा दिला. पुढें औरंगजेब बादशाह झाल्यावर त्याच्याशीं याचें मुळींच पटेना व पुन्हां यास मोगलांशीं लढावें लागलें. या लढायांपायीं त्यास आपलें राज्यहि गमवावें लागलें व स्वत: तो आपल्या-कालीकुमारी राणीसह मोगलांच्या विश्वासघातास बळी पडला (सन १६६४।१६६५).

छत्रसालाचा जन्म सन १६५० त झाला. वयाच्या चौदा-पंधराव्या वर्षींच आईबापाचा वियोग व राज्याची वाताहत झाल्यामुळें छत्रसाल मोठ्या असहाय स्थितींत सांपडला. कोठें तरी मोठ्या ठिकाणीं जाऊन उद्योग करावा, (बडे ठौर कहि उद्यम कीजे) असें त्यास वाटूं लागलें. त्या काळीं मोगल दरबारांत प्रवेश करून घेणें व कांहीं तरी अंगचा गुण दाखवून प्रसिद्धीस येणें एवढेंच काय तें ध्येय तरुणांपुढें असे. छत्रसालानें मोगल दरबाराकडे धांव घेतली व तो जयसिंग मिर्जाचे पदरीं राहूं लागला. जयसिंग मिर्जानें याच्या अंगची तरतरी व धडाडी पाहून त्यास आपल्याबरोबर, तर केव्हां इतर सरदारांबरोबर लढाया करण्याकरितां पाठवावें. एकदां नागपुराकडील देवगड किल्ला सर करण्याकरितां बहादुरखान नामक सरदाराबरोबर याची नेमणूक झाली. यानें या देवगडच्या युद्धांत आपण स्वत: घायाळ होऊन किल्ला बहादुरखानास सर करून दिला. आपण जिवाची पर्वा न बाळगतां किल्ला जिंकून दिला याबद्दल बहादुरखान नबाब दरबारकडे आपली शिफारस करील व लौकरच आपण मोठ्या पदवीला चढूं अशी छत्रसालास मोठी आशा वाटत होती; परंतु त्यास जेव्हां हें समजलें कीं, बहादुरखानानें आपण स्वत: किल्ला सर केला असें बादशहास कळविलें व बादशहानें संतुष्ट होऊन त्या खानाची मनसब वाढविली व आपला नामनिर्देश देखील कोणीं केला नाहीं, तेव्हां मात्र या मानी छत्रसालास फार वाईट वाटलें. हाच प्रसंग त्यास मोगलसेवेपासून परावृत्त करण्यास कारणीभूत झाला.

या सुमारास छत्रसालानें शिवाजीराजांची कीर्ति ऐकली. कोणत्या

तरी निमित्तानें शिवाजीमहाराजांची भेट घ्यावी व त्यांचे पदरीं राहून आपल्या सेवेनें त्यांस संतुष्ट करावें असा विचार करून तो मोगल सरदाराबरोबर दक्षिणेंत आला. व शिकारीचें निमित्त करून त्यानें शिवरायाची भेट घेतली. शिवाजीमहाराजांनीं त्याची तेजस्विता व धाडी पाहून त्यास आपणाजवळ ठेवून घेण्यापेक्षां स्वतंत्रपणें पराक्रम गाजवावयास वाव सांपडावा व दक्षिणेप्रमाणें उत्तरेंतहि हिंदूंची राज्यमर्यादा वाढावी ह्या दूरदृष्टीनें त्यास उत्तरकडील आपला गमावलेला प्रांत काबीज करण्याकडे प्रवृत्त केलें.‡ शिवरायाच्या ह्या उपदेशाचा परिणाम छत्रसालावर उत्कृष्ट झाला

छत्रसालानें लढायांवर लढाया करून मुलूख हस्तगत करण्यास सुरुवात केली. तहवरखाँ, अनवरखाँ, सदरुद्दीन, हमीदखाँ सारख्या शूर सरदारांचा पाडाव केला. बहलोलखानानें तर लाजून आत्महत्या करून घेतली. मुरादखाँ, दलेलखाँ, सैद अफगाण, शाहकुली इत्यादि सरदारांस पराजित करून यमुना आणि चंबळा नदीच्या दक्षिण प्रांताचा ( सर्व बुंदेलखंडाचा ) तो मालक झाला व सुमारें दीड दोन कोटींचा मुलूख छत्रसालाचे ताब्यांत आला.

सन १७०७ मध्यें बहादुरशहानें, छत्रसाल बुंदेलखंडाचा अधिपति असल्याचें मान्य केल्यावरून छत्रसालानें त्यास लोहगड नांवाचा किल्ला जिंकून दिला.

सन १७३२ मध्यें महमदशाह बंगश यानें छत्रसालावर स्वारी केली ह्या वेळीं छत्रसालाचें वय ८२ वर्षांचें होतें. स्वतःचे ठिकाणीं अवसान न राहिल्यामुळें व कुलामध्यें* तितका पराक्रमी कोणी नसल्यामुळें आपण

‡ ह्या शिवाजी-छत्रसाल भेटीचें व शिवरायांनीं केलेल्या बहुमोल उपदेशाचें वर्णन 'लाल कवीनें छत्रप्रकाश' नामक काव्यांतून मोठें सुरस असें केलें आहे. हा प्रसंग प्रस्तुत लेखकानें (Shiwaji Souvenir, पृष्ठ १५४) एका लेखांत दिला आहे.

* छत्रसालास कोणी २७ व कोणी ५२ मुलें होतीं असें म्हणतात.

संपादिलेला प्रान्त यवनांचे तावडींत सांपडतो असें पाहून ह्या वृद्धानें प्रसंगावधान राखून मोठी नामी युक्ति योजिली. यानें त्या वेळीं बाजीराव पेशव्यांचें साहाय्य मागितलें, या वेळीं श्री० बाजीराव पेशव्यांचा भाग्य-सूर्य अनुकूल तळपत होता. पेशव्यांना जें पत्र ह्या म्हातान्यानें लिहिलें होतें त्यात शेवटीं खालील करुणरसपूर्ण दोहा लिहिला—

जो गति ग्राह गजेन्द्र की सो गति जानहु आज ।
बाजी जात बुन्देल की राखो बाजी लाज ॥

बंगशाचा पूर्ण पराभव झाला. वृद्ध छत्रसालानें आपलया राज्याचा तिसरा हिस्सा बाजीरावास दिला.

येणेंप्रमाणें ह्या शिवाजी-भक्त छत्रसालाचें स्फूर्तिदायक चरित्र आहे. याच छत्रसालाच्या दरबारीं भूषण गेले होते व त्या वेळीं शिवरायाच्या दरबारीं राहिलेल्या ह्या कवीचा सन्मान त्यास पालखींत बसवून व आपण दांडा धरून छत्रसालानें केला अशी आख्यायिका आहे.

## फुटकर ( स्फुट )

शिवराज-भूषण, शिवा-बावनी, छत्रसाल-दशक यांखेरीज भूषणाचीं भूषण-उल्लास, दूषण-उल्लास, भूषण-हजारा,हीं काव्यें असल्याचें शिवसिंह सरोजकारांनीं लिहिलें आहे; पण त्यांचा अद्याप पत्ता लागला नाहीं.

ह्या काव्यांपैकींच इतस्ततः आढळलेले छंद 'फुटकर' म्हणून प्रसिद्ध असावेत. मिश्रप्रतींत हे ११ आहेत, तर त्रिपाठी प्रतींत यांची संख्या १५ आहे त्रिपाठीजींनीं प्रथम यांपैकीं कांहीं छंद 'प्रभा' मासिकांत प्रसिद्ध केले. ( सन १९२४ माहे जून. ) तिसऱ्या आवृत्तींत नंतर त्यांचा समावेश भूषण-ग्रंथावलींत केला. हे नवीन छंद स्वतः त्रिपाठीजींनीं संशोधन करून प्रसिद्ध केल्यामुळें त्यांच्या अनुमतीनेंच प्रस्तुत पुस्तकांत त्यांचा संग्रह केला आहे.

फुटकर छंदांतील कांहीं शिवा-बावनींत घातले व शिवा-बावनींतील

शिवाजीचा संबंध नसलेले फुटकरमध्यें ठेविले हें वर शिवा-बावनीच्या सदरांत दाखविलेंच आहे.

ह्या स्फुट संग्रहांतहि कांहीं छंद काव्य या दृष्टीनें फार बहारीचे आहेत व कांहीं ऐतिहासिक दृष्टीनें महत्त्वाचे आहेत.–४, ५, ७, १०, १२ ते १६, १८, १९, २१, २२, २५, २९, ३२, ३३, ४२.

छंद ११ यांत अफजलखानाबरोबर असलेल्या सैन्याची संख्या व युद्ध-भूमि इतिहासाबरहुकूम वर्णिली आहे.

छंद २६ यांत शिवाजीवर चालून आलेल्या सरदारांची नामावळी आहे.

छंद २७ यांत छत्रसालावर चालून आलेल्या सरदारांची नामावळी.

४६ ते ५४ हे नऊ छंद उच्च कोटीच्या शृंगार-वर्णनाचे आहेत.

वसंतऋतु–आगमनाचा छंद ४९ फारच बहारीचा आहे. फुटकरांपैकीं आणखी सुमारें आठदहा छंद त्रिपाठीजींकडे असून अगदीं अशुद्ध व अर्थबोध होत नसल्यामुळें ते प्रसिद्ध केले नाहींत असें त्यांचें म्हणणें आहे.

## कवि-भूषणाचा जीवन वृत्तान्त

शिवराज-भूषणाच्या आरंभीच कवीनें चार दोह्यांतून ( २५ ते २८ ) आपली माहिती सांगितली आहे. त्यावरून भूषण हे कनोजी ब्राह्मण, काश्यप गोत्री, यमुनेच्या कांठीं असलेल्या त्रिविक्रमपूर ( हल्लीं टिकमापूर ) गांवचे राहाणारे. ह्यांच्या बापाचें नांव रत्नाकर. अकबराच्या पदरीं असले-ला सुप्रसिद्ध बिरबल प्रधानाहि याच गांवचा राहाणारा. काशीविश्वे-श्वरासदृश 'बिहारीश्वर' ही ह्या गांवची ग्रामदेवता. भूषण पाहिल्यानें चित्रकूट संस्थानाधिपती सुलंकी वंशस्थ हृदयराम याचा पुत्र रुद्र ( शाह )चे पदरीं होते व तेथेंच 'कवि-भूषण' ही पदवी त्यांना मिळाली. ( अर्थात् पूर्वींचें नांव निराळें असावें. तें कोणतें होतें याचा अद्याप पत्ता लागला नाहीं.)

दोहा १४–२४ ह्यासंबंधीं विचार केला असतां दिसून येतें कीं, दक्षिणेचे सर्व किल्ले जिंकून रायगडावर शिवराज राहूं लागले, रायगडास

राजधानी स्थापन झाली. इच्छित दान देण्यासंबंधीं सर्वत्र शिवरायाची कीर्ति झाली, ही कीर्ति ऐकून देशोदेशींचे गुणीजन शिवरायाचे दरबारीं येऊं लागले. त्यांतच मी आलों असें भूषणानीं स्पष्ट म्हटलें आहे. यावरून भूषण दक्षिणेंत राज्याभिषेकाच्या सुमारास आले असावे असें वाटतें. भूषणांनीं स्वतःसंबंधीं सांगितलेली माहिती इतकीच आहे. इतर चरित्रकारांनीं भूषणाचें जें चरित्र लिहिलें आहे त्यांतील सारांश खालीलप्रमाणें:—

भूषण चौघे बन्धु चिन्तामणि, भूषण मतिराम व नीलकंठ ऊर्फ जटाशंकर. हे चौघेहि उत्तमांपैकीं कवि होते. चिंतामणीनें छंद-विचार, काव्यविवेक, कविकुल कल्पतरु व रामायण हे चार ग्रन्थ, मतिरामानें ललित ललाम, छंदसार, रसराज हे ग्रंथ लिहिले आणि नीलकंठ यानें 'अमरेश विलास' ग्रंथ लिहिला. (भूषणाच्या ग्रंथांचें वर्णन तर वर आलेंच आहे.) या ग्रंथनिर्मितीवरून हिन्दी सारस्वताची ह्या चौघां बंधूंनीं किती उत्तम सेवा केली हें दिसून येतें.

चिंतामणि§ औरंगजेबाचे पदरीं होते. भूषणाला शिवछत्रपतींचा आश्रय होता. मतिराम कोटा, पन्ना येथील राजदरबारीं होते.

भूषणाचे वडील रत्नाकर हे सुद्धां कवीच होते. त्यामुळें काव्य-रचनेची पैतृक सम्पत्ति ह्या चौघांहि भावांना मिळाली होती व तिच्या जोरावरच ह्या बंधुचतुष्टयानें वरीलप्रमाणें काव्यरचना केली.

भूषणाचा जन्मकाल निश्चित नाहीं. संवत् १६९२त (सन १६३६) यांचा जन्म झाला असावा असें मिश्रबंधूंनीं अनेक अनुमानांनीं ठरविलें आहे. जन्मकालाप्रमाणें अंतकालहि अनिश्चितच आहे. कोणी त्यांस ८० वर्षांचे तर कोणी १०२ वर्षांचे ठरवतात. असो.

निरनिराळ्या चरित्र-लेखकांनीं भूषणासंबंधीं खालील आख्यायिका दिल्या आहेत. त्यांवरून त्यांच्या स्वभावगुणांची थोडी बहुत जाणीव होते.

§ मिश्र बंधूंचें मत ह्या बाबतींत विरुद्ध आहे. औरंगजेबासारख्या कट्टर यवन धर्माभिमानी बादशहाच्या दरबारीं हिन्दू कवि मुळींच कोणी नव्हता असें ते म्हणतात.

(१) लहानपणीं भूषण अगदीं हूड स्वभावाचे होते, लिहिण्यावाचण्याकडे अगदीं दुर्लक्ष असावयाचें व घरांत कोणाशीं पटावयाचें नाहीं.

एकदां जवते वेळीं भूषणांनीं मीठ मागितलें असतां त्यांची भावजय टोंचून म्हणाली 'जसें कांहीं स्वतः कमावून आणल्यासारखेंच मागतां आहां' भावजईचे हे शब्द भूषणांस फार लागले. तेव्हांच ते घराबाहेर पडले. खडतर तपश्चर्या ( जीभ कापून वाहण्याची ) करून त्यांनीं श्री जगदंबेला प्रसन्न करून घेतलें व थोड्याच दिवसांनीं ते प्रतिभासम्पन्न कवि बनले.

(२) दिल्ली दरबारांत औरंगजेबाचें अभय घेऊन त्यास 'किवले की ठौर बाप बादशहा' व 'हाथ तसबीह लिये' हे मर्मभेदी दोन छंद म्हणून दाखविले. बादशाह क्रुद्ध झाला. भूषण सभेंतून निघून गेले. पुढें बादशहा नमाज पढण्याकरितां जुम्मा मशिदीकडे जात असतां समोरून भूषण कवि आपल्या केसरी घोडीवर बसून आले. त्यांनीं औरंगजेबास तर सलाम केला नाहीं, पण त्याजबरोबर असलेल्या भाटांना प्रणाम केला. भूषणांनीं केलेल्या ह्या अपमानामुळें बादशहा फारच असंतुष्ट झाला व त्यानें भूषणास पकडण्याकरितां स्वार पाठविले; परंतु भूषण सांपडले नाहींत.

(३) दिल्लीहून थेट भूषण रायगडास आले. संध्याकाळच्या वेळीं संध्येकरितां म्हणून एका देवळांत ते उतरले. त्याच देवळांत दर्शनाकरितां थोड्या वेळानें शिवराजहि आले. शिवराजांनीं या पांथस्थाची विचारपूस केली तेव्हां समजलें कीं, पांथस्थ कवि असून राजाश्रयाकरितां उत्तरेकडून दक्षिणेंत आला आहे. शिवरायांनीं कांहीं कवनें ऐकण्याची इच्छा दर्शविली. भूषणांनीं प्रथम शि. भू. ५६ वा छंद म्हणून दाखविला. एकदां ऐकल्यानें महाराजांचें समाधान झालें नाहीं; म्हणून हाच छंद ८ वेळां भूषणांनीं म्हणून दाखविला. १८ वेळां तोच तो छंद पुनः पुन्हा म्हटल्यामुळें

‡ कोणी म्हणतात ५२ वेळ निरनिराळे छंद म्हटले व ५२ लाख रुपये मिळाले आणि हेच ५२ छंद म्हणजे शिवा-बावनी होय.

भूषण थकले व पुन्हा म्हणाले नाहींत. तेव्हां शिवाजीमहाराजांनीं आपली ओळख दिली व म्हणाले जितके वेळां तुम्हीं छंद म्हणालां असतां तितके लक्ष रुपये, तितके हत्ती व तितकींच गांवें तुम्हांस मिळालीं असतीं. भूषणांनीं तेवढ्यावरच समाधान मानलें व तेव्हांपासून ते शिवरायाचे दरबारीं कवि बनले.

(४) भूषण दक्षिणेंतून सन्मान व धन कमाऊन बन्धूंच्या भेटीसाठीं दिल्लीस गेले. दिल्लीस हे आल्याची वार्ता बादशहास समजली. भूषणास दरबारांत घेऊन येण्याकरितां चिंतामणीस बादशहानें सांगितलें.भूषणांनीं प्रथम बन्धूंचे म्हणणें मान्य केलें नाहीं. चिंतामणीच्या समजावण्यावरून एका अटीवर दिल्लीपतीची भेट घेण्यास ते तयार झाले. ती अट म्हणजे शिवराजा-वांचून इतरांची स्तुति न करण्याची. ही अट मान्य करण्यांत आल्यावर भूषण दरबारांत गेले. बादशहानें भूषणाची वीररसपर कविता ऐकण्याची इच्छा दर्शविली. भूषण म्हणाले, माझी वीररसाची कविता ऐकत असतां आपला अपवित्र ठिकाणचा हात मिशीवर जाईल,त्याकारितां हात धुऊन तुम्ही माझी कविता ऐका. भूषणांनीं आपली वीररसाची कविता ऐकविली व बादशहाचा हात खरोखरच मिशीकडे वळला. या वेळींच इतर राजे मांडलिक व दिल्लीश्वर सार्वभौम तो सर्वांकडून करभार घेतो; पण शिवाजी-कडून घेण्याची प्राज्ञा नाहीं हें भ्रमर-चंपक कल्पनेचे दोन छंद म्हणून त्यांनीं दाखविले *

(५) पुढें कमाऊनच्या राजाचे भेटीस भूषण गेले. भूषणास शिवराज-दरबारीं मिळालेल्या सन्मानाविषयीं व धनाविषयीं त्या राजास किंचित् शंका वाटली. व त्यानें भूषणांची परीक्षा पाहिली. भूषणास तो एक लाख रुपये देऊं लागला.भूषणांनीं त्याचें धोरण ओळखून स्पष्टदिशीं सांगितलें कीं,"मी तुमच्या येथें पैशाच्या लालचीनें आलों नाहीं. शिवरायाच्या कीर्तीचा प्रसार येथवर

* ही औरंगजेब-भूषणाची भेट मिश्रबन्धूंना अग्राह्य वाटते.

झाला किंवा नाहीं, हें मला पाहावयाचें होतें." असें म्हणून कांहींच न घेतां ते निघून गेले.

(६) छत्रसाल बुन्देल्याच्या दरबारींहि भूषण गेले होते. छत्रसालानें यांचा उत्तम प्रकारें सन्मान ठेवला. जाते वेळीं भूषणास पालखींत बसवून नेत असतां छत्रसालानें पालखीचा दांडा आपल्या खांद्यावर घेतला. छत्रसालाचा हा विनय पाहून भूषण चतुर्दिशीं पालखींतून खालीं उतरले व पायीं चालूं लागले. भूषणांनीं त्याच्या वर्णनाचे कांहीं छंद रचले; पैकीं दहा छंद उपलब्ध आहेत. 'छत्रसाल दशक' ह्या सदराखालीं ते देण्यांत आले आहेत.

या आख्यायिकांपैकीं दुसऱ्या आख्यायिकेस बळकटी आणण्याजोगे कांहीं छंद शिव-भूषण व शिवा-बावनींत आढळतात. शिवा-बावनी छंद ४०तील वर्णनावरून दिसून येतें कीं, औरंगजेबानें भूषणास विचारिलें, "तूं शिवाजीची बढाई व आमची नालस्ती करितोस याचें काय कारण?" भूषणानें सडेतोडपणें उत्तर दिलें, ऐका, "तुर्कांची घमेंड शिवाजीवांचून दुसऱ्या कोणाला जिरवितां आली नाहीं; तसेंच देवब्राह्मणांचें त्यानें संरक्षण केलें. तुम्ही तर त्याजसमोर ठरत देखील नाहीं." या छंदांत बादशहानें प्रश्न करणें व 'सुनिये' असें म्हणून कवीनें उत्तर देणें ह्यावरून उभयतांच्या विद्यमानें (उपस्थितींत) हा छंद म्हटला असावा असें वाटतें.

तसेंच शिवा-बावनींतील छंद १३।१४ तून शहाजहानास कैद करणें; दारा, सुजा, मुराद यांस मारणें; इतर गोत्रजांचा घात करणें व अशीं (कु)कर्में केल्यामुळें तुम्हांस बादशाही मिळाली असें 'सुनो' (ऐका) म्हणून वर्णन भूषणानें केलें आहे. प्रत्यक्ष तोंडावर अशी निर्भर्त्सना औरंगजेबासारखा स्वाभिमानी व सार्वभौम बादशहा कशी ऐकेल? ह्याच वेळीं भूषणास पकडण्याचा हुकूम बादशहानें दिला असावा.

बावन लाख रुपये भूषणास शिवरायाकडून शिवा-बावनी ऐवजीं मिळाले; ह्या तिसऱ्या आख्यायिकेस प्रत्यक्ष असा कांहीं पुरावा नाहीं. शिव-

घरापासून द्रव्यलाभ फार झाला होता हें शिव-भूषणाच्या छंद १४०, १७१,१७५,२१५,२२१,२८०,२८२,३२६,३३६,३४० वरून दिसून येतें.

चौथ्या आख्यायिकेस महाराष्ट्रांतील चिटणीस बखरींत आधार सांपडतो. दक्षिणेंतून भूषण घरीं गेल्यावर चिंतामणीच्या सांगण्यावरून बादशहाच्या भेटीस गेले. व भ्रमर-चम्पक कल्पनेचे शिवा-बावनींतील दोन छंद १३।१४ व वीररसाचे कांहीं छंद म्हणून दाखविले. बादशहानें संतुष्ट होऊन कवीस बक्षिसहि दिलें. (चिटणीस पृष्ठ१८९ १९०) शिव-भूषणांतील २७९ त्यांतील 'मेरे कहे मेर करु'–माझ्या मतें तडजोड कर-या शब्द प्रयोगावरून व "चांगले चांगले सरदार व अभेद्य किल्ले विनाकारण तूं गमावून बसलास, व शहरें उध्वस्त करून घेतलींस' ह्या वर्णनावरून दक्षिणेंत शिवराज-दरबारीं राहून गेल्यानंतर अर्थात वरील प्रसंगीं कवीनें हा छंद म्हणून दाखविला असावा असें वाटतें. 'मेरे कहे मेर करु' ह्या शब्द योजनेवरून श्रोता वक्ता यांची समक्षता दिसून येते.

पांचव्या आख्यायिकेचें वर्णन चिटणीस बखरींतून कांहींसें फरकानें दिसतें. भूषण कवि हे घरांतून बाहेर पडतांच प्रथम कमाऊनच्या राजाकडे गेल्याचें बखर सांगते; तर इतरत्र दक्षिणेंतून परत गेल्यानंतर भेटल्याचा उल्लेख आहे. कमाऊनच्या राजानें 'मजसारखा एक लाख रुपये कवीला देणारा दुसरा कोण आहे' अशी गर्वोक्ति केल्यामुळें भूषणांनीं त्याचे लाख रुपये परत केले असें बखरींत वर्णन आहे; तर इतरत्र, कमाऊनच्या राजाला शिवराज-दरबारीं भूषण कवीला मिळालेल्या मान-धनाबद्दल शंका वाटली व हें भूषणाच्या निदर्शनास आल्यावरून "मी तुमच्याकडे पैशाची याचना करावयास आलों नाहीं, शिवराजाची कीर्ति येथवर पसरली आहे किंवा नाहीं हें पाहाण्याकरितां मी आलों होतों; असें म्हणून भूषण कांहींच न घेतां निघून गेले असें वर्णन आहे. असो.

भूषणांचा विवाहसंबंध कोणाशीं, केव्हां झाला व संतति काय होती इत्यादि कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. वृन्द व शीतल हे कवि भूषणाचे

वंशज असें म्हणतात यावरून त्यांचें लग्न झालें असावेंसें वाटतें. स्वतः कवीनें चार पांच दोह्यांतून आपली सांगितलेली माहिती व वर उद्धृत केलेल्या आख्यायिका एवढीच काय ती ह्यांची चरित्रसामग्री. भूषणासारख्या निस्पृह, बाणेदार व स्वधर्माभिमानी कवीचें साग्र चरित्र उपलब्ध असतें तर शिवराजाच्या सहवासाच्या व पराक्रमाच्या आणखी कितीतरी उद्बोधक गोष्टी आपणास समजल्या असत्या आणि शिवराजाच्या इतिहासांत भर पडली असती.

भूषणांचें समग्र चरित्र उपलब्ध नाहीं, तरी पण त्यांच्या शिवराज-भूषण व शिवा–बावनीसारख्या बहुमोल काव्याचा ठेवा आपणास लाभला हें देखील महद्भाग्यच समजलें पाहिजे. ह्या उत्तर हिन्दुस्थानांतील कवीनें दक्षिणेंत येऊन महाराष्ट्रपति शिवरायाचें गुणगान सुलालित हिन्दी भाषेंत करून महाराष्ट्रास तसेंच हिन्दी भाषाभाषियांस ऋणी करून ठेविलें आहे. उत्तरेकडे भूषण ग्रंथांचा उपयोग किती व कसा होत आहे त्यासंबंधीं मिश्रबन्धुंनीं आपल्या प्रस्तावनेंत एके ठिकाणीं म्हटलें आहे.—

"हमारे भारत वर्ष में पृथ्वीराज के पश्चात् चार स्वतंत्र राजा बड़े प्रभावशाली हुए. महाराजा हम्मीरदेव, महाराणा प्रतापसिंह, महाराजा सिवाजी और महाराजा रणजित सिंह। इन सब में हम लोगोंसे दूरतमवासी सिवाजी ही थे तथापि। एतद्देशीय हिन्दू समाज में सबसे अधिक प्रसिद्ध ये ही सिवाजी महाराज हैं। इस असाधारण प्रख्याति के कारण भूषणजीके ग्रन्थ हैं" व त्या ग्रंथांमुळेंच 'शिवाजी की लडाइयों का समाचार ग्राम ग्राम तथा घर घर पूछ लीजिए।' अलीकडे दहाबारा वर्षांत दोन्ही भूषण ग्रथावल्यांच्या तीन तीन आवृत्त्या खपून गेल्या यावरून उत्तरेकडील लोकां-चें शिवाजीविषयक प्रेम व भूषणाविषयीं आदर व्यक्त होतो. हिन्दी भाषाभिज्ञांनीं भूषणाची कविता यथार्थ स्वरूपांत प्रसिद्ध करून स्वतःस त्यांच्या उपकारांतून अंशतः तरी मुक्त करून घेतलें आहे. ज्या भूषणांनीं महाराष्ट्र-पतीचें नांव उत्तरेकडे सर्वतोमुखीं करून सोडिलें त्यांचा महाराष्ट्रांत

मात्र व्हावा तसा आदर झाला नाहीं हें कोणासहि नाकबूल करतां यावयाचें नाहीं. महाराष्ट्रांत भूषणांच्या काव्याची चर्चा व्हावी, भूषणवर्णित ऐतिहासिक प्रसंग, व्यक्ति व स्थल यांवर पूर्णपणें प्रकाश पडावा ह्या हेतूनें हा अल्पसा प्रयत्न करण्यांत आला आहे.

भूषणाचें काव्य जुन्या व्रजभाषेंत व अलंकारासारख्या गहन व शास्त्रीय विषयावर रचलेलें आहे. त्रिपाठीजींसारख्या हिन्दीच्या उत्तम कवि व ग्रंथकारानें जेथें प्रांजलपणें हें ध्वनित केलें आहे कीं, "भूषण की कविता यद्यपि बडी ही प्रासादिक है, पर कहीं कहीं शब्द और भाव दोनों मेरी समझ में नहीं आये" तेथें मजसारख्या परप्रान्तीय भाषांतरकारास ह्या काव्याचें निर्दोष व निर्व्यंग भाषांतर साधणें साहजिकच कठीण आहे. तरी पण होतां होईतों भूषणाची कविता शुद्ध स्वरूपांत महाराष्ट्रापुढें मांडण्याचा व कवितेचा भाव महाराष्ट्रीय वाचकांचे लक्ष्यांत आणण्याचा शक्यतों प्रयत्न करण्यांत आला आहे. ( शिवराज-भूषण व शिवाबावनी ह्या दोन्ही शिवराजपर काव्यांचें मराठी सरळ भाषांतर व फुटकर आणि छत्रसाल–दशक यांतील कठिण शब्दांचा अर्थ दिला आहे.) तो कितपत साधला आहे हें वाचकांनीं पाहावें.

वास्तविक ह्या ग्रंथाचें सम्पादन काव्य आणि इतिहास ह्या दोन्ही विषयांत पूर्ण निष्णात असलेल्या एखाद्या अधिकृत व्यक्तीकडून व्हावयास पाहिजे होतें; पण तसा योग आजवर जुळून आल्याचें दिसलें नाहीं. शिवराज-भक्ति व हिन्दी प्रेम एवढ्याच भांडवलावर ही अनधिकारी कृति मी करावयास प्रवृत्त झालों. असो.

काव्य आणि अलंकार यांच्या प्रेमी वाचकांकरितां महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध अलंकारशास्त्री श्री० खुपेरकर यांची अलंकारप्रस्तावना व इतिहासभक्तांच्या सोईसाठीं मंडळाचा ऐतिहासिक परिचय या ग्रंथास जोडला आहे.

अलंकार-प्रस्तावनेवरून दिसून येईल कीं, भूषणांनीं निरनिराळे अलं-

कारशास्त्रावरील संस्कृत ग्रंथ पाहिले होते व शिवराज-भूषणांतील अलं-कारानुक्रम त्यांनीं जयदेवविरचित 'चंद्रालोक' ग्रंथाप्रमाणें ठेविला आहे. तसेंच अलंकार-लक्षणें स्वरचित दोह्यांत देऊन उदाहरणेंहि स्वतःचींच रचणें व जुन्या अलंकारांचें नवीन पण यथार्थ नामकरण करणें इत्यादि प्रकारांवरून 'भूषण' हे सामान्य कवि नसून मोठे प्रतिभासंपन्न व विद्वान् होते हें उघड दिसून येतें.

ऐतिहासिक प्रस्तावनेवरून भूषणाचें वर्णन ( राधामाधवविलास चंपू, शिवभारत, जयरामकृत पर्णाल पर्वत ग्रहणाख्यान, बखरी, तत्कालीन पत्रव्यवहार इत्यादि ) इतिहासाशीं ताडून पाहतां कसें तंतोतंत मिळतें हें इतिहासज्ञांस समजून येईल.

मालोजीस माल मकरन्द या नांवानें संबोधणें, 'सीसोदिया' हें ब्रीद शिसोदें गांवावरून पडलें नसून 'दियो ईस को सीस' ( ईशचरणीं मस्तक वाहिलें ) ह्या ऐतिहासिक घटनेमुळें ह्या वंशास मिळणें, शिव-कालीन इतर शिव-भारत, राजव्यवहार कोशांप्रमाणें शिवाजीस 'हरि-अवतार' मानणें, औरंगजेब-शिवाजी भेट, साल्हेरीचें युद्ध, बहलोलखान युद्ध, नवसेरीखानाचें अहमदनगरचें युद्ध, सुरतेची जाळपोळ, पन्हाळगड, सिंहगड, लोहगड किल्ले हस्तगत करणें, तत्कालीन हिन्दू व त्यांच्या राव-राण्यांची झालेली अवनति यांचें यथार्थ शब्दचित्र रेखाटणें, जयसिंहास पसतीस किल्ले दिल्याचें वर्णन, किल्ले बांधण्याची प्रवृत्ति, मावळी सैन्याचें शौर्य, शिवाजीची राजनीति वगैरे वर्णन इतिहासाशीं विसंगत असें दिसून येणार नाहीं. मात्र हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, भूषण हे कवि होते, नीरस इतिहासकार नव्हते. त्यांच्या कृतीकडे कवि ह्याच दृष्टीनें पाहावयास पाहिजे. अलंकारांचें अवगुंठन बाजूस काढलें असतां भूषणकृतींत ऐति-हासिक सत्य इतिहासभक्तांस पाहावयास सांपडतें. ह्या ग्रन्थाच्या सम्पादनास मुख्यतः मिश्रबन्धु व त्रिपाठीजी ह्यांच्या प्रतींचा उपयोग झाला. ( हें वर सविस्तर दाखविलेंच आहे ) ह्यामुळें मी या उभय सम्पादकांचा अत्यंत

आभारी आहें. तसेंच काव्येतिहास-संग्रहांतील व नवलकिशोर प्रेसचे शिवराज भूषणाचा व चरित्र लेखनास लक्ष्मी-त्र्यंकटेश्वर प्रतीचें व श्री तिवारी यांच्या शिवाजी-प्रतापाचें साहाय्य झालें. एतदर्थ त्यांचेहि आभार मानणें क्रमप्राप्त आहे.*

श्री० बा. मा. खुपेरकरशास्त्री यांनीं, अलंकार-प्रस्तावना लिहून देण्याच्या विनंतीला मान देऊन आपल्या खासगी अडचणी बाजूस ठेवून वेळेवर प्रस्तावना लिहून पाठविली याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

इतिहास-मंडळानें आपल्या पुरस्कृत ग्रंथमालेंत ह्या ग्रंथाचा समावेश करून व ऐतिहासिक माहिती देऊन भाषांतरकर्त्यास कायमचें ऋणि केलें आहे. श्री० शंकरराव जोशी ह्यांनीं हिन्दीसारख्या परभाषेंतील काव्याचीं मुद्रितें व्यवस्थितपणें तपासून दिल्याबद्दल तसेंच ग्रंथसंपादनासंबंधीं वेळोवेळीं उपयुक्त सूचना दिल्याबद्दल आणि काव्यांतील 'ऐतिहासिक उल्लेखांचा परिचय' लिहून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानल्यावांचून राहावत नाहीं.

शेवटीं, हिन्दी भाषेचें काव्य मराठी टाईपांत (पण हिन्दीप्रमाणें) शुद्ध, सुबक, सफाईदार व नियमित अवधींत छापून दिल्याबद्दल 'विजय' छापखान्याचे मालक श्री० अप्पासाहेब गोखले ह्यांचे आभार मानून ही प्रस्तावना संपवितों.

रामचंद्र गोविंद काटे

---

*कै० राजवाडे राधामाधव वि. चंपू प्रस्तावना पृष्ठ ६ जयराम कवीसंबंधीं उल्लेख.

श्री शिवराज-भूषण

# अलंकार–प्रस्तावना

प्रबन्धानां प्रबन्धृणामपि कीर्तिप्रतिष्ठयोः ।
मूलं विषयभूतस्य नेतुर्गुणनिरूपणम् ॥

—प्रतापरुद्र.

उदारचरितनिबन्धना प्रबन्धप्रतिष्ठा ।

—रुद्रभट्ट

ग्रंथ व ग्रंथकार यांची कीर्ति चिरकाल स्थिर होण्यास जर मुख्य मूलभूत अशी एखादी कोणती गोष्ट असेल, तर त्या ग्रंथकारानें आपल्या ग्रंथांत केलेलें उदारचरित नायकाचें उदात्त गुणवर्णन हेंच होय. भगवान् श्रीरामचंद्राचें वर्णन केल्यामुळेंच वाल्मीकीला महर्षि ही पदवी प्राप्त झाली व त्यांच्या रामायण नामक ग्रंथास "आदिकाव्य" असेंहि लोक म्हणू लागले. वेद, इतिहास व पुराणें यांच्या अध्ययनानें सर्वांचें जें कल्याण होत आहे, त्यास मुख्यतः कारण त्या त्या ग्रंथांतून ग्रंथकारांनीं केलेलें भगवद्वर्णन हेंच होय. परमेश्वराच्या वर्णनामुळें वेदादि प्राचीन ग्रंथ हे जरी लोकहितकारक म्हणून प्रसिद्ध आहेत, तथापि त्यांचेपेक्षांहि सत्काव्यग्रंथांची उपयुक्तता कांहीं विशिष्टदृष्टीनें अधिक आहे. मानवजन्माचें सार्थक्य ज्या पुरुषार्थप्राप्तीमध्यें होत असतें, त्या धर्मार्थकाममोक्षरूप पुरुषार्थांचा लाभ वैदिक वाङ्मयाच्या अध्ययनानें अवश्य होईल. पण हें जरी खरें असलें तथापि वेद हे विधिनिषेधात्मक अतएव केवळ शब्दप्रधान असे असल्यानें त्यांच्या अध्ययनार्थ व तदुपदिष्ट धर्माचरणार्थ परिणतबुद्धीच्या विद्वानांसहि अत्यंत क्लेश होतात. यामुळें या वेदवाङ्मयाच्या अभ्यासाकडे सामान्य जनांची प्रवृत्ति क्वचितच होत असलेली दृष्टीस पडते. आतां वेदानंतरचे स्मृति, इतिहास किंवा पुराणें हे ग्रंथ वेदासारखे शब्दप्रधान नाहींत. तथापि ते इष्ट व अनिष्ट अशा विषयांचें केवळ तटस्थपणें प्रतिपादन करीत असल्यानें काव्यग्रंथांइतके वाचकांचे चित्तास सहज आकर्षक होऊं शकत नाहींत. काव्यवाङ्मयाची गोष्ट मात्र या शब्दप्रधान व अर्थप्रधान अशा श्रुतिस्मृत्यादि वाङ्मयाहून अत्यंत भिन्न अशी आहे. काव्यग्रंथ हे मधुर अनुपानमिश्रित अशा औषधाप्रमाणें सरस व सालंकार वर्णनाच्या

योगानें वाचकांची चित्तवृत्ति वेधून घेऊन त्यांस सन्मार्गाचरणाचे कडु घडे स्वीकारण्यास प्रवृत्त करितात व त्यायोगें त्यांचें हित साधून देतात. ह्याच काव्य-वाङ्मयाचा विशेष गुण ध्यानीं घेऊन कालिदासादि महाकवींनीं जशी संस्कृत भाषेमध्यें काव्यरचना केली तशीच इतर भाषांमध्येंहि ती पुष्कळ आहे. आज महाराष्ट्रभाषेमध्यें भाषांतरित होऊन मूळासह प्रसिद्ध होत असलेलें भूषण कवीचें "**श्रीशिवराजभूषण**" हें व्रज भाषेंतील काव्यहि याच प्रकारचें आहे.

२. प्रस्तुत काव्याचा कर्ता **महाकवि भूषण** हा काश्यप गोत्री कनोजी ब्राह्मण असून यमुनानदीच्या तीरावरील त्रिविक्रमपूर नामक गांवीं रहात असलेल्या रत्नाकराचा मुलगा होय. यास सुलंकी वंशांतील रुद्राचा मुलगा हृदयराम यानें "**कविभूषण**" ही पदवी दिली होती. पूर्वीं या त्रिविक्रमपुरामध्येंच बीरबला-सारखे वीर पुरुष व अनेक कवि उत्पन्न झालेले असून तेथेंच काशीविश्वेश्वरा-सारखी बिहारीश्वर नामक एक देवताहि असे. उत्तरेकडे राहणारा असा हा कवि, दक्षिणेंत शिवाजीमहाराजांनीं सर्व यवनांना जिंकून रायगड ही आपली राजधानी केली व तेथें महाराज हे सर्व लोकांना रुचिदान देऊन त्यांचे मनोरथ पूर्ण करीत आहेत अशी महाराजांची कीर्ति ऐकून, इतर गुणिजनांबरोबर महाराजांचें दर्शना-साठीं दक्षिणेंत आला. इकडे रायगडावर आल्यानंतर महाराजांचें उज्ज्वल चरित्र त्याचे दृष्टीस पडलें व त्यानें कलियुगांतील कवींनीं हिंदुधर्माचा उच्छेद करणाऱ्या म्लेंच्छ राजांचीं कवनें रचून भ्रष्ट केलेल्या वाणीला पवित्र करण्याच्या हेतूनें गोब्राह्मणप्रतिपालक शिवरायाचेंच चरित्र नानाप्रकारच्या शब्दार्थालंकारांनीं सजवावें अशी बुद्धि धरली व तदनुसार प्राचीन महाकवींचा काव्यरचनामार्ग त्यांच्याच कृपेनें समजावून घेऊन अलंकारमय **शिवभूषण** नामक शुभ ग्रंथ निर्माण केला.

३. प्रस्तुत शिवराजभूषण हें काव्य काव्यसमाप्तीच्या वेळीं कवीनें रसिकांना जी विनंति केली आहे* ती वरून वि. सं. १७३० म्हणजे शके १५९६ या सालीं रचि-ल्याचें स्पष्ट होत आहे. प्रस्तुत काव्यांत एकंदर ३८२ पद्यें असून आरंभींचीं तीन पद्यें भारतवर्षीय कविसांप्रदायानुसार इष्टदेवतानमनरूप मंगलाचरणात्मक अशीं आहेत.

---

* सम सत्रहसै तीस पर सुचि वदि तेरसि भान। भूषण सिवभूषन कियो पढियो सकल सुजान ॥१॥ संवत् १७३०, ज्येष्ठ व. १३ रविवारीं भूषणानें "**शिवराजभूषण**" काव्य रचिलें. सर्व सुजाण लोक हो, वाचा.

यांतील पहिल्या पद्यांत विघ्ननिवारणार्थ विघ्नहर्त्या गजाननाचेंच भजन व ध्यान हें सर्वांनीं अवश्य केलें पाहिजे असें सुचवून द्वितीय पद्यांत शुंभनिशुंभ आदिकरून दैत्यांचें निर्दालन करणारी जी आदिशक्ति कालिकादेवी तिचा प्रथम जयजयकार केला आहे व पुढें काव्यनायक जे शिवाजीमहाराज यांना विजयप्राप्ति देण्याविषयीं तिला प्रार्थना केली आहे. मंगलाचरणाचें तृतीयपद्यांत जगत्प्रकाशक व प्रस्तुत काव्यांतील वर्ण्यनायक जे शिवराय त्यांच्या कुलांतील आदिपुरुषाचें–सूर्यनारायणाचें वर्णन करून कवीनें येथें एक प्रकारचें औचित्यहि साधिलें आहे. मंगलाचरणाचीं हीं तीनहि पद्यें उपमारूपकादि अर्थालंकार व अनुप्रासादि शब्दालंकार यांनीं भूषित झालेलीं असल्यानें तीं प्रस्तुत काव्यकर्त्या कवीच्या उज्ज्वल प्रतिभेची व प्रसंगोचित वर्णनशैलीची साक्ष चांगलीच पटवून देतात. चतुर्थपद्यापासून पद्य आठपर्यंत राजवंशवर्णनाला आरंभ करून त्यांतील शिसोदिया नामक वंशांत मालोजी नामक राजा निर्माण झाल्याचें सांगितलें आहे. या मालोजी राजानेंच रणभूमीवर सिंहाप्रमाणें शौर्य गाजवून सरजा ही पदवी, दीर्घायुष्य प्राप्त करून घेऊन खुमान ही पदवी व शिलेप्रमाणें धैर्यानें व निश्चळपणें टिकाव धरून भू+सिला=**भोसला** ही पदवी प्राप्त करून घेतली. या पदव्यांतील भोसला या पदवीच्या व्युत्पत्तीविषयीं कै० राजवाडे यांनीं रा. मा. विलासचंपूच्या प्रस्तावनेमध्यें केलेल्या विस्तारापेक्षां प्रस्तुत कवीनें दिलेली भोसले आडनांवाची व्युत्पत्तिच आम्हांस पुष्कळ समर्पक वाटते.¶ नऊ आणि दहा या पद्यांत मालोजीपुत्र शहाजीचें वर्णन असून व पुढें अकराव्या व बाराव्या पद्यांत दशरथपुत्र राम हाच वसुदेवपुत्र कृष्ण झाला व तोच पुढे शहाजीचे पोटीं श्रीशिवराज नाम धारण करून अवतीर्ण झाला.* त्या वेळीं कलियुग नाहींसें झालें, म्लेंच्छांचा अहंकार नष्ट झाला व देवब्राह्मण संतुष्ट झाले, असें सांगितलें आहे. तेरावें पद्य शिवाजीच्या बालक्रीडा-वर्णनार्थ खर्ची घालून चवदाव्या पद्यापासून शिवाजीनें दक्षिणेंतील सर्व किल्ले जिंकून गडपति अशा ज्या रायगड किल्ल्यावरच आपलें निवासस्थान केलें त्या रायगडाचे वर्णनास सुरवात केली आहे. चोवीस पद्यांपर्यंत केलेलें हें रायगड

¶ इतिहासदृष्ट्या व्युत्पत्तिशास्त्राचा विचार करणाऱ्या चिकित्सकांनीं या भूषण कवीनें दिलेल्या "भोसले" शब्दाच्या व्युत्पत्तीकडे अवश्य लक्ष्य द्यावें अशी आमची येथें सूचना आहे.

* शिवभारतांतहि शिवाजीमहाराज हे विष्णूचे अवतार होत असें वर्णन आहे.

राजधानीच्या ऐश्वर्याचें वर्णन उदात्तालंकारमिश्रित अतएव फारच बहारीचें असें असून कविप्रतिभा येथें अधिकच विकसित झाल्याचें दिसून येतें. हा उपोद्घातांतील भाग प्रत्यक्ष मूळांतूनच वाचकांनीं वाचून पहावा म्हणजे आम्ही म्हणतों त्याचा त्यांस खास प्रत्यय होईल.

४. उपोद्घाताविषयीं सामान्यतः इतकें विवेचन केल्यानंतर आतां मुख्य ग्रंथ जो " **शिवराजभूषण** " त्यासंबंधीं विचार करावयाचा.

प्रस्तुत " **शिवराजभूषण** " हा एक शिवचरित्रपर असा अलंकारशास्त्रावरील ग्रंथ आहे. संस्कृत वाङ्मयांत अलंकारशास्त्रावर पुष्कळच ग्रंथसंपत्ति आहे. परंतु त्यांतील बहुतक ग्रंथकार, फार काय पण स्वतःला सरस्वतीदत्तवरप्रसाद म्हणवून घेणारे मम्मटाचार्यांसारखे ग्रंथकारहि अलंकारांचीं लक्षणें (व्याख्या) स्वतः करतात आणि त्या त्या अलंकारांच्या लक्षणानुसार उदाहरणें मात्र कालिदासादि प्राचीन अभियुक्त कवींच्याच काव्यांतील निवडून देतात असें दिसून येतें. परंतु **जगन्नाथराय पंडितासारखे** दिव्य प्रतिभेचे महाकवि, जसे संस्कृत वाङ्मयांत " अलंकाराच्या लक्षणांस उदाहरणभूत असें नवीनच काव्य निर्माण करून मी येथें रसिकांपुढें ठेवीत आहें परक्यांचे उसनवार असें मीं कांहींच घेतलेलें नाहीं कस्तूरी निर्माण करण्याची शक्ति ज्यास आहे असा कस्तूरीमृग हा इतर फुलांचा वास घेण्याचें कधीं तरी मनांत आणील काय ? "§ अशी दर्पोक्ति मोठ्या आढ्यतेनें पण यथार्थतेनें व्यक्त करणारे स्वल्प प्रमाणांतच उत्पन्न होतात. पंडितरायांच्या रसगंगाधरासारखाच लक्ष्यलक्षणात्मक उभयरूप ग्रंथ देशी भाषेंत निर्माण करण्याचा भूषण कवीचा हा प्रयत्न आहे. प्रस्तुत ग्रंथामध्यें भूषणकवीनें अर्थालंकार १०० व शब्दालंकार ५ मिळून १०५ अलंकारांचीं लक्षणें व उदाहरणें दिलीं आहेत.* हीं जीं १०० अर्थालंकारांचीं लक्षणें येथें भूषणकवीनें सांगितलीं आहेत तीं बहुतेक जयदेव कवीच्या चन्द्रालोकनामक अलंकारशास्त्रग्रंथावरूनच घेतलेलीं असावींत असें दिसून येतें. कारण, काव्यप्रकाशकार मम्मट आदिकरून नव्य आलंकारिकांनीं ज्या अलंकारांचा इतर अलंकारांतच अन्तर्भाव होत असल्यानें

---

§ निर्माय नूतनमुदाहरणानुरूपं काव्यं मयात्र निहितं न परस्य किंचित् ।
किं सेव्यते सुमनसां मनसापि गन्धः कस्तूरिकाजननशक्तिभृता मृगेण ॥

—रसगंगाधर.

* एक सत भुषन कहे अरु पांच—

त्यांची स्वतंत्र अलंकार म्हणून गणना केली नाहीं असे जे परिणाम, परिकरांकुर वगैरेसारखे चन्द्रालोकांतील अलंकार त्यांचीं लक्षणें व उदाहरणें देऊन त्यांचा संग्रह प्रस्तुत ग्रंथांत केला आहे. व तसेंच उपमा, अतिशयोक्ति आणि अपन्हुति या अलंकारांचे जे निरनिराळे पोटभेद चन्द्रालोककारानें केले आहेत व जे काव्य-प्रकाशादि नव्या मताचे ग्रंथांत दिसून येत नाहींत त्यांचाहि संग्रह भूषण कवीनें आपल्या या ग्रंथांत केला असल्याचें दिसून येतें. आतां चन्द्रालोकांतील विधि-प्रतिषेधादि* पंधरा अलंकारांचा प्रस्तुत ग्रंथांत जरी कोठेंहि पत्ता लागत नाहीं; तथापि भूषणकवीनें चन्द्रालोकांतील शतअलंकाराप्रमाणें आपल्याहि ग्रंथांतील अलंकारांची शतसंख्या भरण्यास उपमेचे दोन भेद, अपन्हुतीचे पांच भेद, अति-शयोक्तींचे चार भेद, भाविकाचा एक भेद व सामान्यविशेष आणि प्रश्नोत्तर असे दोन नवीनच अलंकार कल्पून ही शतसंख्या पुरी केली आहे.† या पंधरा अलं-कारांचे बाबतींत वर दाखविल्याप्रमाणें शिवराजभूषण व जयदेवाचा चन्द्रालोक यांमध्यें जरी फरक दिसून येतो, तरी इतर सर्व अलंकारांची व लक्षणांची रचना व क्रम व तसेंच उत्प्रेक्षा रुपकांचे पोटभेद या बाबतींत या दोनहि ग्रंथांचें सर्वांशीं साम्य असल्यानें **शिवराज-भूषण** हा ग्रंथ लिहितांना भूषण कवीच्या पुढें जय-देवाचा **चन्द्रालोक** हा ग्रंथच मुख्यतः असावा असा आमचा तर्क आहे.

५. श्रीशिवराजभूषण या ग्रंथांत कवीनें आम्हीं वरील कलमांत दाखविल्या-प्रमाणें जरी बहुतेक चंद्रालोकांतील अलंकारांचा संग्रह केलेला आहे; तथापि 'ललितोपमा' व 'सामान्य विशेष' हे दोन अलंकार चंद्रालोकांत किंवा इतर कोणत्याहि प्राचीन अलंकारशास्त्रग्रंथांत उपलब्ध न होणारे असे स्वतंत्रच येथें लक्षणोदाहरणासह कवीनें दिले आहेत. तसेंच जुन्या कारणमाला नामक अलंकारास "गुंफ" अशी नवीनच पण यथार्थ संज्ञा निर्माण केली आहे. चित्रालंकारांतील कामधेनु चित्रहि नवीनच आहे. या सर्व गोष्टींचा विचार केला असतां कवीचा

* १ विधि. २ प्रतिषेध. ३ युक्ति. ४ विवृतोक्ति. ५ गूढोक्ति. ६ सूक्ष्म. ७ उत्तर. ८ अनुगुण. ९ रत्नावलि. १० मुद्रा. ११ ललित. १२ विकस्वर. १३ कारक-दीपक. १४ अल्प. १५ प्रस्तुतांकुर.

† १ उपमा—१ मालोपमा, २ ललितोपमा असे दोन भेद. २ अपन्हुति—१ हेतु. २ पर्यस्त, ३ भ्रांत, ४ छेक, ५ कैतव, असे पांच भेद. ३ अतिशयोक्ति—१ भेदक, २ अक्रम. ३ चंचल. ४ अत्यंत असे चार भेद. १ भाविक. २ विरोध. ३ सामान्य विशेष ४ प्रश्नोत्तर. मिळून एकूण १५ अलंकार.

अलंकारशास्त्रावरील व्यासंग चांगलाच झालेला असल्याचें दिसून येतें. उदाहरणांतील कल्पना प्राचीन कवींच्या संकेतानुरूप ठराविक प्रकारच्याच जरी बऱ्याच ठिकाणीं दिसून येतात तथापि रचनाकौशल्यानें त्यांतहि नाविन्य आलें आहे. शिवाजीमहाराजांच्या चरित्राचें गायन हेंच भूषण कवीचें प्रस्तुत काव्यरचनेचें मुख्य ध्येय असल्यानें महाराजांचें शौर्य, धैर्य, औदार्य, कीर्ति, धर्मनिष्ठा वगैरे सद्गुणांचेंच वर्णन प्रस्तुत काव्यांत झालेलें सर्वत्र दिसून येतें. मूळ ग्रंथ हिंदी भाषेंत असल्यानें तो मराठी वाचकांस समजण्यास जरी बराच कठीण आहे. तथापि त्याचें मराठी भाषांतर प्रस्तुत पुस्तकांत मूळाबरोबरच प्रसिद्ध केलें जात असल्यानें मूळांतील रसाचा आस्वाद घेण्यास केवळ मराठी वाचकांस पुष्कळच मदत होणार आहे.

प्रस्तुत ग्रंथांत कवीनें जे शत अलंकार गुंफले आहेत त्यांच्या गणनेसंबंधीं येथें भाषांतरकाराशीं थोडासा आमचा मतभेद आहे. लुप्तोपमेचा स्वतंत्र भेद त्यांनीं कल्पिला आहे; परंतु तो गुप्तोत्प्रेक्षा किंवा न्यूनाधिक्य रूपक यांच्याप्रमाणें स्वतंत्र न कल्पितां शतसंख्यापूर्तीसाठीं परिकर आणि परिकरांकुर असे दोन अलंकार स्वतंत्र निरनिराळे मानावेत. कारण ज्या चंद्रालोक ग्रंथावरून प्रस्तुत शिवराजभूषण हा ग्रंथ भूषण कवीनें निर्माण केला त्या चंद्रालोकांतहि हे दोन अलंकार स्वतंत्र मानिले आहेत. शिवाय, लुप्तोपमेच्या लक्षणांत पूर्णोपमेचेंहि लक्षण दिलें असल्यानें लुप्तोपमा हा अलंकार जर स्वतंत्र मानावयाचा तर तत्साहचर्यानें पूर्णोपमा हाहि अलंकार स्वतंत्र मानावा लागेल; पण अशा रीतानें अलंकारांची कवीनें ग्रंथसमाप्तीला स्वतः निर्दिष्ट केलेली शतसंख्या अतिक्रान्त होते; करितां लुप्तोपमा हा स्वतंत्र भेद कल्पूं नये हेंच आम्हांस प्रशस्त दिसतें.

६. प्रस्तुत ग्रंथाच्या बहिरंगासंबंधानें वरीलप्रमाणें विचार केल्यानंतर त्याच्या अंतरंगाचा विचार करतांना मुख्यतः या मराठी भाषांतरासंबंधींच विचार करावयास पाहिजे. कोणत्याहि ग्रंथाच्या भाषांतरासंबंधीं सामान्यतः अशी समजूत आहे कीं, भाषांतर म्हणजे केवळ अन्य भाषा; अर्थात् ज्या मूळ ग्रंथाचें भाषांतर करावयाचें असेल त्या मूळ ग्रंथाची केवळ भाषा तेवढी बदलावयाची, बाकी मूळांतील अर्थांचें प्रतिबिंब या दुसऱ्या भाषेमध्यें जसेंच्या तसें उठवून द्यावयाचें. या समजुतीप्रमाणें ह्या ग्रंथाचें भाषांतर बहुतेक बरोबर उतरलें आहे. त्यांतून हा ग्रंथ अलंकारशास्त्रावरील लक्ष्यलक्षणात्मक असा असल्यानें या ग्रंथाचें भाषांतरा-

कडे कांटेतोलपणानें पाहणें, विशेषत्वानें पाहणें प्राप्त असल्यामुळें तसें पहात असतां कांहीं स्थलीं भाषांतर यथार्थ घडून आल्याचें दिसून येत नाहीं. उदाहरणार्थ–

(अ) आरंभींचा उपमा अलंकार. तेथें "जणों काय सैन्याच्या अग्रभागीं रागावलेल्या हत्तीस माहूत चुचकारून पुढें नेण्याचा प्रयत्न करीत आहेत'; 'असें उदाहरणपद्याचें भाषांतर केले आहे; परंतु "जणों काय" हीं पदें उपमालंकार-सूचक नसून उत्प्रेक्षासूचक आहेत.

(आ) "जेथें प्रसिद्ध उपमानाचें उपमेयत्व वर्णन केलें जातें तेथें प्रतीप अलंकार होतो" असें प्रथम प्रतीपाचें लक्षण आहे. या अलंकाराच्या उदाहरणाचें "ज्याप्रमाणें चंद्रानें अंधकारास ग्रासून शुभ्र चांदणें पसरावें; त्याप्रमाणें शिवाजीनें अफजलखानास मारून पृथ्वीवर आपली उज्ज्वल कीर्ति पसरली" असें भाषांतर केलेलें आहे. परंतु, या उदाहरणांत वर्ण्य शिवाजी असल्यानें तो उपमेय आहे आणि त्यास चंद्राची उपमा दिलेली असल्यानें तो चंद्र उपमान आहे. या चन्द्र उपमानाचें उपमेयत्ववर्णन हें येथें उदाहरणांत अभिप्रेत आहे. म्हणजे त्याकरितां "ज्याप्रमाणें व त्याप्रमाणें" या उपमाबोधक शब्दांची उलटापालट केल्यास वरील वाक्यच लक्षणानुसार प्रस्तुत अलंकाराचें उदाहरण सुसंगत होईल. येथील ही सुधारणा अत्यंत थोडी आहे. परंतु ती अवश्य असल्यामुळें दर्शित केली आहे.

(इ) "उपमेयोपमा" अलंकाराचे उदाहरणांतच "तुझा हात कल्पवृक्षाप्रमाणें शोभतो; किंबहुना कल्पवृक्षच तुझ्या हातामुळें शोभतो" असें म्हटलें आहे. त्या ऐवजीं "तुझा हात कल्पवृक्षाप्रमाणें जसा शोभतो तसा कल्पवृक्षहि तुझ्या हाता-प्रमाणें शोभतो." असें असल्यास तें अधिक समर्पक होईल असें वाटतें.

(ई) "आन बातको आन मैं जहँ संभावत होय, वस्तु हेतु फलयुत कहत उत्प्रेक्षा है सोय ॥" या उत्प्रेक्षालक्षणाचें भाषांतर "एका वस्तूत अन्य वस्तूची संभावना करून वस्तूचा हेतु फलाद्वारां सांगितला जातो तेथें उत्प्रेक्षा अलंकार जाणावा" असें केलें आहे. परंतु जेथें एकावर दुसऱ्याची कल्पना केलेली असून ती कल्पना वस्तु, हेतु आणि फल यांच्या आश्रयानें असते तेथें उत्प्रेक्षा अलंकार जाणावा" असें भाषांतर पाहिजे. वस्तु, हेतु आणि फल यांच्या आश्रयानें वस्तूत्प्रेक्षादि उत्प्रेक्षेचे तीन भेद येथें होत आहेत. कांहीं कांहीं उदाहरणांचें भाषांतरहि "जणूं काय" वगैरेसारख्या उत्प्रेक्षाबोधक

शब्दांचा उपयोग करून न करितां " प्रमाणें " हा उपमाबोधक शब्द घालूनच केलें आहे. त्यामुळें तें उदाहरण उत्प्रेक्षेचें होऊं शकत नाहीं ही गोष्ट भाषांतरकारांचे नजरेतून सहज निसटून गेल्यासारखी झाली आहे.

(उ) तुल्ययोगिता अलंकाराचें भाषांतरांतहि थोडी दुरुस्ती सुचवितों. येथील मूळ भूषण कवीचें लक्षणपद्य निःसंदिग्ध असें आहे. " अनेक वर्ण्य वस्तु किंवा अवर्ण्य वस्तु यांचें धर्मैक्य जेथें वर्णिलें जातें तेथें तुल्ययोगिता " आणि " वर्ण्य आणि अवर्ण्य या दोघांचं धर्मैक्य जेथें वर्णिलें जातें तेथें दीपक " असा या दोन अलंकारांतील भेद कवीनें मूळामध्यें स्पष्टपणें दाखविलेला असतां तो भाषांतरांत तितका स्पष्ट झालेला नाहीं. तुल्ययोगिता, दीपक, प्रतिवस्तूपमा, दृष्टान्त वगैरेसारखे गम्यौपम्यमूलक अलंकारांच्या उदाहरणांचें भाषांतर करतांना भाषांतरांतहि औपम्य गम्यच ठेवावयास पाहिजे. पण त्या बाबतींतहि कांहीं ठिकाणीं नजरचूक झाली असल्याचें दिसून येतें.

(ऊ) " एखाद्या वस्तूचा भाव जनमनरंजनासह जेथें प्रगट होतो तेथें सहोक्ति अलंकार होतो." असें सहोक्तीचें लक्षण भाषांतरांत दिलें आहे. तें " जेथें वस्तूंचा सहभाव जनमनोरंजक असेल तेथें सहोक्ति अलंकार होतो " असें केल्यास निर्दोष होईल.

पर्यायोक्त, असंगति, व्याघात, एकावली इत्यादि अलंकारांच्या लक्षणांचे भाषांतरांतहि वर दाखविल्याप्रमाणेंच थोडथोडा प्रकार झाला आहे. तथापि एकंदरींत विचार करतां भूषण कवीच्या प्रस्तुत काव्याचा मराठी वाचकांना सामान्य परिचय करून देण्याचे कामीं या भाषांतराचा पुष्कळच उपयोग होईल अशी आमची समजूत आहे. असो.

७. " **श्रीशिवराज-भूषण** " या **भूषण** कवीच्या काव्यग्रंथाचें समग्र परीक्षण करण्याचा आमचा येथें विचार नाहीं. आज प्रसिद्ध होत असलेल्या मराठी भाषांतररूप प्रस्तुत पुस्तकाचें अलंकारशास्त्रदृष्ट्या सामान्यस्वरूप वाचकांचे पुढें ठेवणें इतकाच या प्रास्तविक लेखाचा उद्देश असल्यानें तो आतांपर्यंत केलेल्या विस्तारानें स्वल्पांशानें कां होईना सिद्धीस गेला असल्यास पुरें आहे.

**बा. मा. खुपेरकर शास्त्री.**

---

# ऐतिहासिक उल्लेख–परिचय

**'संपूर्ण–भूषण'** हा ग्रंथ काव्यमय असून अलंकारशास्त्रविषयक व इतिहासकथन करणारा असा आहे. साहित्यशास्त्रांतर्गत उपमा इत्यादि १०५ अलंकारांच्या व्याख्या ह्यांत सांगितल्या असल्यामुळें हा अलंकारविषयक झाला आहे; आणि ह्या अलंकारव्याख्यांच्या स्पष्टतेकरितां कवीनें आपऱ्याच कालच्या शिवचरित्रांतील प्रसंगांचीं उदाहरणं घेतलीं असल्यामुळें हा ग्रंथ इतिहासविषयकहि झाला आहे. उदाहरणार्थ, रूपक ह्या अलंकाराचें तिसरें उदाहरण पाहा. छंद ६३ यांत अफजल मरणाचा प्रसंग आला आहे. 'जावलीच्या जंगलांत अफजलखान रूपी हत्तीस शिवसिंहानें पंजाच्या जोरानें मारिलें' ही प्रसिद्ध व ढोबळ गोष्ट तर कवीनें तेथें सांगितली आहेच; पण विशेष हे कीं, अफजल मृत्यु पावल्यानंतर पळून गेलेल्या याकुतखानाचा निर्देश, हत्तीवांचून जसा माहूत तसा हा याकूत अंकुश घेऊन निजधामास ( विजापुरास ) पळून गेला, असा केला आहे. हें वर्णन कवीचें शिवसमकालीनत्व आणि सत्य व सूक्ष्म वृत्तावलोकन असल्याचें निदर्शक आहे. अफजलखान हा रागीट, दांडगा, प्रतिष्ठित, वजनदार व मानी होता; पण याकुतखानाच्या सल्ल्याप्रमाणें वागणारा होता; म्हणजे अफजलखान हा हत्ती व याकुतखान हा त्याचा माहूत होता हा त्या दोघां खानांचा संबंध कवीनें जो वर्णिला आहे तो लक्ष्यांत घेण्यासारखा आहे. याकुतखानाचा उल्लेख 'तथा सारथिना खानयाकुतेनाभिमानिना' (शि.भा.अ.४:१७) असा अन्यत्र आला असून खंड २०, ले. ७ व १७१ मध्यें 'याकुतखान एदिलशाही' असे स्पष्ट म्हटलेंहि आहे. 'याकुतखान अंकुश घेऊन पळाला' असें सांगण्यांतहि कवीनें अंकुशखानासह याकूत पळाला हें ध्वनित केलें आहे. ह्या अंकुशखानाचाहि उल्लेख इतिहासास प्रमाण आहे. रणदुल्लाखानाबरोबर हा अंकुशखान कर्नाटकांत होता, नंतर मुस्तफाखांकडेहि याची नेमणूक झाली होती. ( शि. भा. व एक खाजगी देसायांचें दप्तर. ) हा अफजलमृत्युप्रसंग ज्या स्थलीं घडला तें स्थलहि 'पार जावलीके बीच गढ परतांप तलै। ( पृष्ठ १७३ ) असें नेमकें व पुरतें कवीनें सांगितलें आहे. अफजलखानाबरोबरच्या सैन्यसंख्येचाहि निर्देश सभासदी बखरीप्रमाणें 'बारा

हजार' हा केला आहे. असो. याप्रमाणें भूषण कवीनें साल्हेरचें युद्ध, आग्रा येथील औरंगजेब–शिवाजी भेट, उंबरखिंडीचें युद्ध, इ० इ० शिवाजी चरित्रांतील प्रसंग यथोचित अलंकार लेववून आपल्या काव्यांत ग्रथित केले आहेत. असें वाटतें कीं, भूषणाचें हें सर्व काव्य म्हणजे 'अन्योन्य' अलंकाराचेंच मोठें उदाहरण आहे. (पृष्ठ ७८, ७९) कारण, उपमा इत्यादि अलंकारांनीं शिवप्रसंग जसे अलंकृत झाले तसे त्या प्रसंगामुळें हे अलंकारहि सार्थ झाले आहेत. अशा काव्यांत आलेल्या ऐतिहासिक उल्लेखांचा येथें थोडक्यांत परिचय करून द्यावयाचा आहे.

हा परिचय करून देण्यापूर्वी एका गोष्टीसंबंधानें थोडें लिहिणें आवश्यक वाटतें. कित्येक विद्वान् व इतिहासाभ्यासी मंडळीसुद्धां काव्य म्हटलें, कीं अवहेलनापूर्वक म्हणतात कीं, काव्यांत कसला इतिहास पाहावयाचा ! कांहींचें हें म्हणणें मतलबाचें असतें तें सोडिलें तरी एवढें इतरांच्या लक्षांत येण्यास हरकत नाहीं कीं, जेथें व्याकरण, गणित, ज्योतिष, कोश, वैद्यक इ० विषय काव्यरूपांत सांगितले जातात तेथें कोणचाही विचार काव्यांत म्हणजे छंदोबद्ध वाङ्मयांत सांगणें आपला स्वभावच आहे असें ठरतें आणि त्यामुळें इतिहासवृत्तहि काव्यरूपानें कथन केलें गेलें हें सरळच होय. इतिहास सांगणारें लेखन–मग तें कागद, ताडपत्र, शिला, ताम्रपत्र इ० कोणत्याहि साधनावरील असो; तसेंच तें गद्यांत अथवा पद्यांत असो; इतिहास प्रत्यक्ष घडला त्या काळाशीं किती दूर अथवा जवळचें आहे, कोणीं लिहिलेलें आहे, अस्सल कीं नक्कल, वगैरे प्रकारांनीं त्याची चौकशी करूनच तें ग्राह्य ठरविलें पाहिजे. एऱ्हवीं केवळ तें काव्यांत आहे इत्यादि म्हणून अवमानणें योग्य होणार नाहीं. काव्यांत अतिशयोक्तीचा व कल्पित भाग असूं शकतो हें खरें; पण ज्यांत असा भाग आणतांच येत नाहीं, असें इतिहासांतील वास्तव रूपहि असतें आणि तें कोणचें हें पहाण्याची कवींनेहि सोय ठेविलेली असते व तसा तो भाग दिसतोहि. ह्या दृष्टीनें अलीकडे प्रसिद्ध झालेलें व होत असलेलें इतिहासविषयक काव्यवाङ्मय पाहिलें पाहिजे. प्रस्तुत भूषण कविकृत पुढील सर्व कवितांहि ह्याच दृष्टीनें पहातां विश्वसनीय ठरत आहे. ह्या काव्यांत शिवाजी चरित्रांतील कांहीं प्रसंग आले आहेत. कारण, कविराजांना शिवाजीचरित्र भिन्न भिन्न अशा अनेक भूषणांनीं भूषित करावयाचें होतें, तरी तें अलंकारांचें उदाहरण म्हणून होय. म्हणजे अलंकाराच्या नियमान्वयें शिवचरित्रांतील जो प्रसंग किंबहुना प्रसंगाचाहि जो भाग कवीस युक्त वाटला तेवढा अर्थात्

कवीनें वर्णिला आहे. यामुळें प्रस्तुत ग्रंथांत आलेले प्रसंग व्यक्ति-स्थलादि सर्व ऐतिहासिक उल्लेख प्रत्यंतर पुराव्यानें कसे निर्णित होत आहेत तेवढें दर्शवावयाचें; प्रसंगाचें अथवा व्यक्तीचें समग्र वर्णन देण्याचें कारण आहे असें नाहीं. तसेंच कांहीं व्यक्तींचा निर्देश कवीनें विशेष साभिप्रायानें केलेला नसल्यामुळें अशा उल्लेखांचेंहि स्पष्टीकरण येथें करावयास नको. सूचींत हे सर्व निर्देश दिले आहेत.

**अफजलखान**—त्याविषयींची माहिती लेखाच्या प्रारंभींच आली आहे त्याशिवाय, खान दगा करण्यास आला; प्रथम आगळीक खानानें केली; अर्थात् बिछव्यानें सर्जा शिवाजीनें त्या 'कीचकास' (खानास) मारिलें. एवढी हकीकत छंद ९९, २५२, ३३७ मध्यें आली आहे. रणदुल्लाखानानें कर्नाटकांतें असतांना शिरें येथील किल्ला घेण्याकरितां अफजलखानास पाठविलें असतां खानानें शिऱ्याच्या राजाला भेटीस म्हणून बोलावून घेऊन त्याचा खून केला-ही गोष्ट सर सरकार यांनींच महमदनाम्यावरून मॉडर्न रिव्ह्यूमध्यें दिली आहे (इ.१९२९ जुलै पृष्ठ ९). यावरून खान दगा करणारा आहे हें भूषणाचें विधान बरोबर आहे. शिवाय खानाविषयींच्या ह्या कामगिरीबद्दलच्या निघालेल्या विजापुरी फर्मानावरूनहि असाच अंदाज निघतो. (ले. ७७४). शिवाजीनें वाघनखानें मारलें कीं नाहीं हें अद्याप अनिर्णित आहे. (शके १५८१)

**अमरसिंह**—ह्या चन्दावत सरदाराचा उल्लेख उंबरखिंडीच्या युद्धप्रसंगानें आला आहे हिंदींतील भूषणग्रंथावलीचे संपादक मिश्रबंधु ह्यांनीं ह्या अमरसिंहाविषयीं आधार सांपडत नसल्यामुळें संशय दर्शविला आहे; पण 'श्रीमान् अमरसिंहाख्यो राजा चन्द्रावतान्वयः' असा स्पष्टच उल्लेख ह्याच प्रसंगीं शि. भा. अ. २५, श्लोक ४७ मध्यें आला आहे. आणखीही दोन ठिकाणीं असाच उल्लेख आला आहे. हा मोगलांकडील सरदार आहे. छंद १५५ मध्यें सुजानगडचा अधिकारी म्हणून ह्याच नांवाचा सरदार शिवाजीच्या हातें मरण पावला असें म्हटलें आहे; ह्याविषयीं मात्र प्रत्यंतर पुरावा आढळला नाहीं. मिश्रांचें म्हणणें ह्याविषयीं असूं शकेल. (शके १५८२)

**इखलासखां**—ह्याचा, शिवाजीवर आलेल्या मोगल सैन्यांतील प्रमुख सरदार म्हणून उल्लेख आला आहे तो बरोबर आहे मोरोपंत पिंगळे व प्रतापराव गुजर यांस शिवाजीनें साल्हेरच्या मदतीकरितां दोन हजार सैन्य देऊन पाठविलें असतां

त्यांनीं इखलासखानावर मोठा जय मिळविला इत्यादि हकीकत इतिहासांत नमूद आहे. शके १५९४ ( शि. च. निबंधावली, पृष्ठ ३४४ ).

**उदयभानु**—तानाजीनें सिंहगड ज्या मोगल किल्लेदारापासून घेतला तोच हा उदयभान राठोड रजपूत ( शके १५९१ ). ह्याविषयींची हकीकत प्रसिद्धच आहे. सिंहगड रात्रीं घेतला असें कवीनें छंद १००, २५९ मध्यें म्हटलें आहे.

**अदिलशहा**—म्हणजे अली अदिलशहा. पन्हाळा शिवाजीनें घेतला (शके १५८२ भाद्र. ) व परत देऊन सलाबतखानाशीं जो सल्ला केला व ज्या सल्यास पुढें अदिलशहानेंहि मान्यता दिली तो उल्लेख येथें कवीनें फारच चांगल्या प्रकारें वर्णिला आहे ( छंद १७८ ). (शके १५८२)

**कारतलबखान**—ह्याचा निर्देश कवीनें तलबखान असा केला आहे. ह्या खानाशीं शिवाजीचें उंबरखिंडींत युद्ध झालें. त्या हकीकतीस अनुलक्षून ह्या खानाचा उल्लेख आला आहे तो बरोबर आहे. ( शके १५८२ ) जे. श. व शि. भा.

**किशोरसिंह**—हा शाहिस्तेखानाबरोबरचा सरदार, कोटा संस्थानच्या हाडा नामक रजपूत राजघराण्यापैकीं आहे. ह्याचा उल्लेख शि. भा. अ. २५, श्लोक ४२ मध्यें आला आहे. इतिहासांत ह्याची मोगलांकडील कामगिरी प्रसिद्ध आहे. हा पुढें अर्काटच्या लढाईंत मारला गेला.

**कुतुबशहा**—अबदुल कुतुबशहा. ह्याच्याशीं संबद्ध अशा विशेष हालचाली कवीनें वर्णिल्या नाहींत.

**खवासखान**—ह्याची कुडाळवरील स्वारी व तेथील त्याचा शिवाजीनें केलेला पराभव कवीनें सांगितला आहे. ह्या खेरीजहि खानाचे दोनतीन उल्लेख आहेत ते पन्हाळा इ० वेगवेगळ्या प्रसंगांचे असून बरोबर आहेत. ह्यासंबंधींचीं पत्रेंच सावंतवाडी—इ. सा., ले. ६ व संग्रह ले. १४४१ इ० प्रसिद्ध आहेत.

**खानदौरा**—औरंगजेब दक्षिणेच्या सुभेदारिवर दुसऱ्यांदां असतां त्यानें बेदरकल्याणीकडे स्वारी केली. तेव्हां ह्या खानास व त्याबरोबर तलबखान, जोरावर इ० सरदारांस जुन्नर ते नगरपर्यंतच्या प्रांतावर संरक्षणार्थ ठेविलें होतें. ह्या भागावर शिवाजीनें स्वारी करून हत्ती, घोडे, पैसा इत्यादि लूट मिळविली. त्यास अनुलक्षून हा निर्देश आहे छंद १०३. (शके १५७९)

**जयसिंग**—ह्याचा उल्लेख पुरंदरच्या तहाला अनुलक्षून आला आहे ३५ किल्ले शिवाजीनें जयसिंगास दिले असें तेथें म्हटलें आहे. संग्रह ले. १०७७ मध्यें

तहाची हकीकत आली आहे. त्याशीं हा उल्लेख जुळताच आहे. म्हणजे तहाचे वेळीं प्रथम ३५ किल्ल्यांची बोली होती. शेवटीं १२ शिवाजीकडे राहून २३ मोगलांना दिले. (शके १५८७)

**जसवंतसिंग**—शाहिस्तेखानानंतर दक्षिण सुभ्यावर ह्याची नेमणूक झाली होती. ह्याचा उल्लेख कवीनें दु:शासन म्हणून एके ठिकाणीं केला आहे.

**दाउदखान**—सुरतेची लूट शिवाजीराजांनीं दोन वेळां केली. शके १५८५ व शके १५९२ मध्यें. ह्या दुसऱ्या लुटीनंतर परत येत असतां ह्या दाऊदखानाशीं दिंडोरीपाशीं शिवाजीचा झगडा होऊन खानाचा पराभव झाला. त्यास अनुलक्षून कवीनें आपला अभिप्राय सांगितला आहे.

**दिलेरखान**—साल्हेरी युद्धप्रसंग शके १५९२. ह्याबद्दलचा उल्लेख ले. १३९६ वरून बरोबर दिसतो.

**नबसेरीखान**—वर खानदौरासंबंधानें केलेलें स्पष्टीकरण ह्या खानासहि लागू आहे. ( संग्रह ले. ७४३ व जे. शके १५७९ ज्येष्ठामधील उल्लेख पाहा.)

**निजाम**—निजामशाही कोंकण शिवाजीनें घेतलें. त्यास अनुलक्षून छंद ७२ मध्यें निजामास जिंकणारा ( निजामके जितैया ) हें कवीनें म्हटलें असावें.

**फत्तेखान**—विजापुरदरबारीं ज्याचें चांगलें वजन आहे व ज्याचा आणि शहाजीचा पक्ष एक आहे त्या फत्तेखानाशीं शिवाजीचा तह झाला. (ले. ६६८)

**बहलोलखान**—ह्या नांवाचे दोन सरदार असून एक मोगलांकडील व दुसरा अदिलशाही आहे. पैकीं मोगली सरदार जो तो कवीला अभिप्रेत आहे. 'बहलोलखान शाहजानी' असा याचा उल्लेख येतो. ह्याच्याशीं युद्ध केलें व त्यास पकडलें तें साल्हेरीच्या शके १५९३ मधील लढाईचे प्रसंगीं.

**बहादुरखान**—औरंगजेबाची प्रतिमाच दुसरी; अशा शाहिस्तेखानाबरोबर जी बडी थोरली फौज देऊन शिवाजीवर मोगलांची स्वारी झाली, त्या स्वारींत हा खान होता व तेव्हांचा उल्लेख कवीनें बरोबर केला आहे.

**मोहकमसिंग**—ह्याचाहि निर्देश साल्हेरीच्या युद्धप्रसंगानें कवीनें केला आहे. ह्यास धरलें (छंद३५६) व सोडून दिलें (छंद२३९) असें जें लिहिलें आहे, तेंहि बरोबर आहे. ह्यासंबंधानें जेधे शकावलींत असा उल्लेख आला आहे.'माघमासी(शके१५९३) मोरोपंती हशम घेऊन सालेरीची माचीचा वेढा मारिला. उपराला केला. प्रतापराव

व आनंदराव फौजेनसी जाऊन बहलोलखान धरिला. मोहकमसिंग व दारकोजी भोसले धरिले. हत्ती ११ व घोडीं १७ पाडाव केलीं'. ( शि. प्र., पृष्ठ २५).

**रुस्तुमजमा**—ह्यास शिवाजीनें लुटलें असें कवीनें सांगितलें आहे. पन्हाळगडप्रसंगीं शिवाजीच्या ज्या हालचाली झाल्या त्यांत ह्याच्या ताब्यांतील सैन्याचा शिवाजीनें पराभव केला अशी हकीकत आहे.

**शाहिस्तेखान**—ह्याचा उल्लेख असलेले छंद सात आठ आहेत. त्यांत ह्याला दुर्योधन वगैरे म्हणून कैद म्हणजे शिक्षा केली असें छंद ७७ मध्यें म्हटलें आहे. विशेषतः 'लाख सैन्य पदरीं असणाऱ्या ह्या खानाच्या महालांत शिवाजीनें अवघ्या दोनशें लोकांनिशीं जाऊन मोठमोठ्या मनसबदारांस व चौकीदारांस जखमी करून तेथें 'महाभारत' म्ह. युद्ध केलें' हें जें छंद १८९ मध्यें कवीनें सांगितलें आहे तें सभासदी बखर, व ले. ९३०–३५–३७ मधील मजकुराशीं सुसंगतच आहे. मात्र इंग्रज कंपनीवाल्यांच्या ह्या पत्रांतून शिवाजीबरोबर चारशें लोक होते असें म्हटलेलें आहे. सभासदी बखरींत पृष्ठ ३३ वर भूषण कवीप्रमाणेंच लोकसंख्या सांगितली आहे.

**शिवाजी–औरंगजेब भेट**—भूषणानें ह्या भेटीचें वर्णन कोणत्याहि प्रसंगापेक्षां अधिक केलें आहे. निरनिराळ्या एकंदर १४ छंदांतून हें वर्णन आलें आहे, यावरून कवीस ही भेट तशीच महत्त्वाची व आणीबाणीची वाटली असावी आणि तें खरेंच आहे. भूषणवर्णित ह्या भेटीचा थोडक्यांत सारांश असा देतां येईल. ही भेट मुसलमानी धर्माप्रमाणें 'जशन' ह्या धार्मिक उत्सवाच्या दिवशीं, देवेन्द्राच्याहि वैभवाला लाजवील अशा उत्तम शृंगारलेल्या दरबारांत झाली. शिवाजीचा दरबारांत प्रवेश होतांच भालदार–चोपदारांची तर गाळण उडालीच; पण कांहीं उमरावहि शिवाजीस ताजीम देण्यासाठीं उभे राहिले. हें पाहून औरंगजेब विस्मित झाला. शिवाजीस पंचहजारी सरदारांत उभे केलें गेल्यामुळें वचनभंग (रसखोट) झाल्याचें शिवाजीच्या ध्यानांत आलें व तो ह्या अपमानानें अतिशय क्रुद्ध झाला. हें पाहून जयसिंगपुत्र रामसिंग यानें या वेळीं न रागवावें अशी विनंति शिवाजीस केली; परंतु उपयोग झाला नाहीं. औरंगजेबाचें सारें लक्ष्य शिवाजीकडे होतेंच, त्यानें हा प्रकार पाहून गुसलखान्यांत शिवाजीची भेट घेण्याचें ठरवून जसवंतसिंग व इतर स्वामिभक्त सरदार बादशहाच्या दोन्ही बाजूंस उभे असतां निःशस्त्र शिवाजीची भेट तेथें घेतली. बादशहास त्यानें

सलाम वगैरे केला नाहीं व तो धड नीट बोललाहि नाहीं. पुढें अटकबंदी झाली. आग्र्यांतील सात चौक्या ओलांडून ठिकठिकाणचे पहारे चुकवून कबुतराप्रमाणें शिवाजी कसा निसटून गेला हें कोणासच कळलें नाहीं. रिकामे पडलेले पलंग पाहून सारी राजधानी आश्चर्यचकित झाली. ( फुटकर ४६ मध्यें दिल्ली म्हटलें आहे. ) ह्या वर्णनास शिवसमकालीन पत्रांचा आधार पुढीलप्रमाणें मिळतो. शिवाजीस बादशहापुढें नम्र होण्यास भाग पाडणें अशक्य असल्यामुळें 'मित्रत्वाचें वचन' आधीं दिलें होतें ( शिवकालीन पत्रसार संग्रह. ले. ११४१ ) व तें न पाळलें गेल्यामुळें व दरबारीं शिवाजीस कठोरपणें वागविलें गेल्यामुळें ( ले. ११२८ व २९ ) तो दरबारांतून संतप्त होऊन बाहेर निघून गेला ( ले. ११३६ ). गुसलखान्यांत म्हणजे स्नानागारांत भेट झाल्याचें जें कवीनें सांगितलें आहे तेंहि सभासदी बखरींत पृष्ठ ४८ वर आलें आहे.

इतरहि अनेक व्यक्तींचे व स्थलांचे उल्लेख निरनिराळ्या प्रसंगांनीं कवीनें आपल्या काव्यांत सर्वत्र वर्णन केले आहेत. कविकृत ऐतिहासिक उल्लेखांचा परामर्ष ह्याहून विस्तृत प्रमाणांत व सूक्ष्मतेनें व्हावयास पाहिजे. तितक्या अवकाशाचे अभावीं ह्या उल्लेखांची कल्पना येण्याकरितां रा० काटेकृत व्यक्ति व स्थल सूचि पुढें जोडून हा परिचय पुरा करतों.

शं. ना. जोशी.



# भूषणवाणींत व्यक्ति-स्थलांची सूचि

## व्यक्ति-सूचि

# स्थल-सूचि

'शिवराज-भूषण' काव्यांतील

# अलंकार-अनुक्रमणिका

# श्रीशिवराज-भूषण

मंगलाचरण

**बिकट अपार भव पंथ के चले को स्त्रम हरन करन बिजना से ब्रह्म ध्याइए। यहि लोक परलोक सुफल करन कोकनद से चरन हिए आनि कै जुड़ाइए ॥ अलिकुल कलित कपोल, ध्यान ललित, आनंदरूप सरित में भूषन अन्हाइए। पापतरुभंजन, बिघन गढ गंजन, जगत-मनरंजन द्विरदमुख गाइए ॥ १ ॥**

बिकट वाटेनें चालणाऱ्या वाटसराचे श्रम हरण करण्यास जसा पंखा, तद्वतच ह्या अपार संसाराच्या कठीण मार्गांत होणाऱ्या ताप (त्रया) पासून सुटका करून घेण्यास ब्रह्मा (गणराजा)चें ध्यान केलें पाहिजे. इहलोक व परलोक सुफल करण्याकरितां त्या गणराजाचे ते लाल कमलाप्रमाणें असलेले चरण हृदयाशीं घट्ट जुळून धरावे. भूषण म्हणतो, गणराजाचें तें भ्रमरसमुदायानें वेष्टित गंडस्थल व सुंदर ध्यान पाहून आनंदरूपी नदींत निमज्जन करावेसें वाटतें. पापवृक्षाचें उन्मूलन करणाऱ्या, विघ्नरूपी दुर्गाचा विध्वंस करून जगताचें मनोरंजन करणाऱ्या गजमुखाचें नित्य गान करावें. (१)

छप्पय अथवा षट्पद

**जै जयंति जै आदि सकति जै कालि कपर्दिनि ।**
**जै मधुकैटभ-छलनि देवि जै महिष-विमर्दिनि ॥**
**जै चमुंड जै चंडमुंड भंडासुर-खंडिनि ।**
**जै सुरक्त जै रक्तबीज बिड्डाल-विहंडिनि ॥**

जै जै निसुंभसुंभद्दलनि भनि भूषन जै जै भननि ।
सरजा समत्थ सिवराज कहँ देहि बिजै जै जग-जननि २

हे आदि शक्ति ! हे कालिके ! हे कपर्दिनी (गौरी) ! हे मधुकैटभ-महिषासुरमर्दिनी देवी ! हे चामुण्डदेवी ! हे भण्डासुरखंडिनी ! बिडाल-विध्वंसिनी ! शुंभनिशुंभ-निर्दालिनी देवी ! तुझा जयजयकार असो. भूषण म्हणतो, हे जगज्जननी ! सिंहासमान शूर अशा शिवरायास विजय देत जा. (२)

शिवराय सूर्यवंशी असल्यामुळें कवीनें प्रथम सूर्यदेवता व नंतर सूर्यवंशांत झालेले राजे यांचें वर्णन केलें आहे.

दोहा

तरनि जगत जलनिधि तरनि जै जै आनँद ओक ।
कोक कोकनद सोकहर, लोक लोक आलोक ॥ ३ ॥

हे लोकलोकांतरास प्रकाशित करणाऱ्या सुर्यदेवते ! तूं संसारसमुद्रांतून पार पाडण्यास नौकारूप आहेस, तसेंच चक्रवाक आणि कमलें ह्यांचा तूं शोक हरण करणारी असून (सर्वांचें) आनंदभुवन आहेस. तुझा जयजयकार असो. (३)

राजवंश-वर्णन, दोहा

राजत है दिनराज को बंस अवनि अवतंस
जामैं पुनि पुनि अवतरे कंसमथन-प्रभु-अंस ॥ ४ ॥

सूर्यवंशरूपी मुकुट ह्या भरतभूमीस शोभतो व ह्याच वंशांत कंसमर्दन करणाऱ्या प्रभूचा अंश निरनिराळया रूपांनीं पुन्हां पुन्हां अवतरित होतो.(४)

महाबीर ता बंस मैं भयो एक अवनीस ।
लियो बिरद "सीसौदिया" दियो ईस को सीस ॥ ५ ॥

सिसोदानिवासी ह्या आडनांवाचे क्षत्रिय सर्व क्षत्रियांत श्रेष्ठ आहेत. त्या

(सूर्य) वंशांत एक महान पराक्रमी राजा झाला; त्याचें आडनांव 'शिसोदिया' असें होतें; व ईशचरणीं त्यानें आपलें मस्तक वाहिलें होतें. (५)

ता कुल मैं नृपवृंद सब उपजे बखत बुलंद।
भूमिपाल तिन मैं भयो बडो "माल मकरंद" ॥ ६ ॥

त्या कुळांत उत्पन्न झालेले सर्व राजे मोठे भाग्यशाली होते; त्यांतच 'मालोजी' नांवाचा एक मोठा राजा झाला. (६)

सदा दान किरवान मैं जाके आनन अंभु।
साहि निजाम सखा भयो दुग्ग देवगिरि खंभु ॥ ७ ॥

शौर्य आणि औदार्य यांचें पाणी ज्याच्या मुखावर नेहमीं झळकत असे व जो दौलताबाद किल्ल्याचा आधारस्तंभ होता तो मालोजी निजामाचा दोस्त झाला. (७)

ताते सरजा विरद भो सोभित सिंह प्रमान।
रन-भू-सिला सु भौंसिला† आयुषमान खुमान ॥ ८ ॥

(मालोजीस) सिंहाप्रमाणें शूर असल्यामुळें 'सरजा', व रणभूमीवर शिळेप्रमाणें निश्चळ रहात असल्यामुळें 'भोंसिला', तसेंच दीर्घजीवी या अर्थी 'खुमान' अशीं नांवें मिळालीं. (८)

भूषन भनि ताके भयो भुव-भूषन नृप साहि।
रातौ दिन संकित रहैं साहि सबै जग माहि ॥ ९ ॥

भूषण म्हणतो, त्या (मालोजी)च्या पोटीं राजा शहाजी उत्पन्न झाला. (ज्याच्यामुळें) पृथ्वींतील सर्व बादशहा रात्रंदिवस भिऊन राहूं लागले.(९)

कवित्त—मनहरण

एते हाथी दीन्हे माल मकरंद जू के नंद जेते गनि सकति बिरंच हू की न तिया। भूषन भनत जाकी साहिबी सभा के

† भूषण कवीनें आपल्या काव्यांतून शिवरायास 'सरजा', 'भोंसले' व 'खुमान' ह्या विशेषणांनीं जागजागीं संबोधिलें आहे. कवीनें ह्या दोह्यांत वरील विशेषणांची मूळ पीठिका दाखविली आहे.

देखे लागें सब और छितिपाल छिति में छिया ॥ साहस अपार हिंदुवान को अधार धीर, सकल सिसौदिया सपूत कुल को दिया । जाहिर जहान भयो साहिजू खुमान वीर साहिन को सरन सिपाहिन को तकिया ॥ १० ॥

मालोजीपुत्र शहाजीनें इतके हत्ती दिले कीं, ते सरस्वति देखील मोजूं शकली नाहीं. भूषण म्हणतो, ज्याच्या सभेचें ऐश्वर्य पाहून पृथ्वीवरील इतर राजे निस्तेज झाले, त्या (शहाजी) नें आपल्या अपार साहसानें हिंदूंना आधार आणि सर्व सिसोदिया कुलास सुपुत्र बनून धीर दिला. इतर बादशहांचा आधार व शिपायांचा आश्रय असल्यामुळें आयुष्मान शहाजी वीर जगप्रसिद्ध झाला. (१०)

दोहा

दसरथ जू के राम भे बसुदेव के गोपाल
सोई प्रगटे साहि के श्रीसिवराज भूपाल ॥ ११ ॥
उदित होत सिवराज के मुदित भए द्विजदेव ।
कलियुग हस्यो मिट्यो सकल म्लेच्छन को अहमेव ॥१२॥

दशरथाचा राम हाच वसुदेवाचा कृष्ण झाला व तोच पुढें शहाजीचे पोटीं शिवराज नामक राजा झाला. शिवरायाच्या अवतरण्यानें देव, ब्राह्मण आनंदित झाले, कलियुग नाहींसें झालें व म्लेंछांची अहमहमिका जिराली. (११-१२)

कवित्त-मनहरण

जा दिन जनम लीन्हो भूपर भुसिल भूप ताही दिन जीत्यो अरि-उर के उछाह को । छटी छत्रपतिन को जीत्यो भाग अनायास जीत्यो नामकरन में करन-प्रवाह को ॥ भूषन भनत बाललीला गढ कोट जीत्यो, साहि के सिवाजी करि

चहूँ चक्र चाह को। बीजापुर गोलकुंडा जीत्यो लरिकाइ
ही मैं ज्वानी आए जीत्यो दिलीपति पातसाह को ॥ १३ ॥

ज्या दिवशीं भोंसले घराण्यांत शिवरायानें जन्म घेतला त्याच दिवशीं त्यानें शत्रूंच्या अंतःकरणांतील उत्साह जिंकिला. सहावीस† छत्रपतींच्या भाग्यास जिंकिलें. नामकरणाच्या (नांव ठेवावयाच्या) दिवशीं अनायासेंच कर्ण-प्रवाहास (अर्थात् कर्णाच्या शौर्यौदार्याच्या कीर्तिरूप प्रवाहास) जिंकिलें. भूषण म्हणतो, शहाजीच्या शिवाजीनें गड आणि कोट जिंकण्याची बाळक्रीडा केली. आणि चहूंकडील आधिपत्य (सार्वभौमत्व) मिळावें अशी इच्छा केली. विजापूर, गोवळकोंडा पोरवयांत जिंकिलें आणि तारुण्यांत प्रवेश होतांच दिल्लीपती (औरंगजेब) बादशहास जिंकिलें. (१३)

दच्छिन के सब दुग्ग जिति दुग्ग सहार बिलास।
सिवसेवक सिव गढ़पती कियो रायगढ़ बास ॥ १४ ॥

दक्षिणेंतील सर्व किल्ले जिंकून शिवभक्त शिवाजीनें सर्व किल्ल्यांचा आधार व विलासस्थान अशा रायगड किल्ल्यास आपलें वसतिस्थान केलें. (१४)

## रायगढ़-वर्णन

मालती सवैया

जापर साहि तनै सिवराज सुरेस की ऐसि सभा सुभ साजै।
यों कबि भूषन जंपत है लखि संपति को अलकापति लाजै॥
जा मधि तीनहु लोक कि दीपति ऐसो बडो गढ़राज बिराजै।
बारि पताल सी माची मही अमरावति की छबि ऊपर छाजै॥१५

ह्या रायगड किल्ल्यावर शहाजी (पुत्र) शिवाजीची सभा (दरबार) इंद्र-

† सहावी:—महाराष्ट्रांत मूल जन्मल्यानंतर पांचवे दिवशीं विशेष प्रकारची पूजा करितात त्यास 'पांचवी' म्हणतात. उत्तर हिंदुस्थानांत अशी पूजा सहावे दिवशीं करितात म्हणून 'छटी' म्हणतात.

सभेप्रमाणें शोभते. भूषण (येथील सभेचें ऐश्वर्य पाहून) वारंवार म्हणतो कीं, येथील संपत्ति पाहून प्रत्यक्ष कुबेर देखील लाजूं लागला. हा किल्ला एवढा प्रचंड व विशाल आहे कीं, ह्यांत तिन्ही लोकींचें वैभव सांठविलें आहे. किल्ल्याखालील भूभाग (खोल खंदक व त्यांतील पाणी) जलमय पाताळाप्रमाणें, माची पृथ्वीप्रमाणें, व वरील प्रदेश इंद्रपुरीप्रमाणें शोभतात. (१५)

हरिगीतिका छंद

मनिमय महल सिवराज के इमि रायगढ़ मैं राजहीं ।
लखि जच्छ किन्नर असुर सुर गंधर्व हौंसनि साजहीं ॥
उत्तंग मरकत मंदिरन मधि बहु मृदंग जु बाजहीं ।
घन-समै मानहु घुमरि करि घन घनपटल गलगाजहीं ॥१६॥

रायगडावरील शिवरायाचे रत्नखचित महाल असे शोभत आहेत कीं, त्यांस पाहून यक्ष, किन्नर, सुर, असुर, गंधर्व हे देखील ईर्षेनें तसे (महाल) बनवूं लागले. उंच व भव्य अशा नीलमणिखचित मंदिरांतून मृदंगाचा जो घुमघुम आवाज निघत असे तो वर्षाकालीन अभ्रपटलावर होणाऱ्या मेघगर्जनेप्रमाणें भासूं लागतो. (१६)

मुकतान की झालरिन मिलि मनिमाल छज्जा छाजहीं ।
संध्या समै मानहुँ नखत गन लाल अंबर राजहीं ॥
जहँ तहाँ ऊरध उठे हीरा किरन घन समुदाय हैं ।
मानो गगन तंबू तन्यो ताके सपेत तनाय हैं ॥ १७ ॥

मोत्यांच्या झालरी आणि मण्यांच्या माळा यांनीं महालांतील सुशोभित केलेले सज्जे संध्यासमयीं नक्षत्रगणांनीं रक्त वस्त्रें परिधान केल्याप्रमाणें शोभत आहेत. असंख्य हिऱ्यांच्या किरणांचा दाट प्रकाश उंचवर जिकडे तिकडे पसरल्यामुळें आकाशरूपीं ताणलेल्या तंबूचे हे (किरण) शुभ्र तणावे आहेत असें भासत आहे. (१७)

भूषन भनत जहँ परसि कै मनि पुहुपरागन की प्रभा।
प्रभु पीत पट की प्रगट पावत सिंधु मेघन की सभा ॥
मुख नागरिन के राजहीं कहुँ फटिक महलन संग मैं।
बिकसंत कोमल कमल मानहु अमल गंग तरंग मैं ॥ १८ ॥

भूषण म्हणतो, समुद्रापासून जसा मेघसमुदाय प्रकट होतो; तद्वतूच त्या गगनरूपी तंबूंत पुष्कराज मण्यांची पीतवर्ण प्रभा उत्पन्न होऊन श्रीकृष्ण प्रभूच्या पीतांबराप्रमाणें झळकत आहे. शुभ्र स्फटिकाच्या महालांतून नगरवासी स्त्रियांचीं वदनें, निर्मल गंगातरंगांत नुकत्याच विकसलेल्या कोमल कमलाप्रमाणें विराजत आहेत. (१८)

आनंद सौं सुंदरिन के कहुँ बदन इंदु उदोत हैं।
नभ-सरित के प्रफुलित कुमुद मुकुलित कमल कुल होत हैं।
कहुँ बावरी सर कूप राजत बद्धमनि-सोपान हैं।
जहँ हंस सारस चक्रबाक बिहार करत सनान हैं ॥ १९ ॥

(गडावर) कुठें कुठें सुंदर स्त्रियांचे मुखचंद्र आनंदानें आकाश-गंगेंतील प्रफुल्लित कुमुदिनी व अर्धस्फुटित कमलें ह्यांच्या समुदायाप्रमाणें शोभत आहेत, तर कुठें रत्नखचित पायऱ्या असलेल्या विहिरी, सरोवरें व कूप विराजत आहेत; व तेथेंच हंस, सारस, चक्रवाकादि पक्षी आनंदानें जलविहार करीत आहेत. (१९)

कितहुँ बिसाल प्रवाल जालन जटित अंगनि भूमि है।
जहँ ललित बागनि द्रुमलतालि मिलि रहै झिलमिलि झूमि है ॥
चंपा चमेली चारु चंदन चारिहु दिसि देखिए।
लवली लवंग यलानि केरे लाखहौं लगि लेखिए ॥ २० ॥

तर कुठें विशाल अंगणांतून प्रवाळजडित वेलबुट्ट्या काढल्या आहेत. त्या अंगणांत भोंवतालील सुंदर वृक्षलतांच्या एकत्र आंदोलनानें अंधुकसा प्रकाश पडतो. (अर्थात् अंगणांतील प्रवाळजडित वेलबुट्ट्या वृक्षलतांच्या झुलण्याच्या वेळीं मधून मधून पडणाऱ्या फटींतून लकाकत आहेत.

परवीं वृक्षलतांच्या गर्द छायेमुळें पडलेल्या अंधारानें दिसत नाहींत.) चारहि दिशांकडे पहा; चंपा, चमेली, उत्तम चंदन, रायआंवळा, लवंगा, वेलदोडे, केळीं यांचीं लाखों झाडें लागून गेलीं आहेत. (२०)

कहुँ केतकी कदली करौंदा कुंद अरु करबीर हैं ।
कहुँ दाख दाडिम सेब कटहल तूत अरु जंभीर हैं ॥
कितहूँ कदंब कदंब कहुँ हिंताल ताल तमाल हैं ।
पीयूष ते मीठे फले कितहूँ रसाल रसाल हैं ॥ २१ ॥

कुठें केतकी, केळीं, कण्हेरी, कुंद, करवंद तर कुठें द्राक्ष, दाळिंब, सफरचंद, फणस, तुतें, कदंबाचे समूह, तर कित्येक ठिकाणीं सुपारी, ताड, तमाल, हिंताल (कांटेताड) इत्यादि गगनचुंबित वृक्ष लागून राहिले आहेत. कुठें अमृतापेक्षांही मधुर व रसाळ फळें असणारे आम्रवृक्ष आहेत. (२१)

पुन्नाग कहुँ कहुँ नागकेसरि कतहुँ बकुल असोक हैं ।
कहुँ ललित अगर गुलाब पाटल पटल बेला थोक हैं ।
कितहूँ नेवारी माधवी सिंगारहार कहूँ लसैं ।
जहँ भाँति भाँतिन रंग रंग बिहंग आनँद सों रसैं ॥ २२ ॥

कुठें जायफळें तर कुठें नागचाफे, बकुल, अशोक इत्यादि पुष्पवृक्ष आहेत; तर कुठें सुंदर व सुवासिक अगर, गुलाब, पाटल यांचे आणि मोगऱ्याच्या फुलांचे ताटवे लागून राहिले आहेत; कुठें नेवारी, चंद्रवल्लि, शृंगारहार इत्यादि लता शोभत आहेत. अशा ह्या बागेंतून नानाप्रकारचे रंगी बेरंगी पक्षी आनंदानें (फळपुष्पांतून) रसपान करीत आहेत. (२२)

षट्पद

लसत बिहंगम बहु लवनित बहु भाँति बाग महँ ।
कोकिल कीर कपोत केलि कलकल करंत तहँ ॥
मंजुल महरि मयूर चटुल चातक चकोर गन ।
पियत मधुर मकरंद करत झंकार भृंग घन ॥

भूषन सुबास फल फूलयुत छहूँ ऋतु बसत बसंत जहँ ।
इमि राजदुग्ग राजत रुचिर सुखदायक सिवराज कहँ ॥२३॥

नाना प्रकारचे असंख्य पक्षी फळांच्या पक्क दशेस येण्याच्या संधानास (स्वच्छंदानें) बागेंतून विहरत आहेत. कोकीळ, राघू, पारवे, मंजुळ बोल-णाऱ्या मैना, चपल मोर, चातक व चकोर यांचे थवेच्या थवे कलकल शब्द करीत क्रीडत आहेत. कृष्णवर्ण भ्रमर पुष्पांतून मधुर रसाचें पान करून गुंजारव करीत आहेत. भूषण म्हणतो, वसंतादि साही ऋतु येथें सुवासिक फलपुष्पादि सामग्रीसह नेहमीं राहतात; असा तो सुंदर व सुखदायी राजदुर्ग (रायगड) शिवराजाच्या निवासस्थानाला शोभूं लागला. (२३)

दोहा

तहँ नृप रजधानी करी जीति सकल तुरकान ।
सिव सरजा रुचिदान में, कीन्हों सुजस जहान ॥ २४ ॥

तेथें (रायगडास) राजा (शिवाजी)नें सर्व यवनांना जिंकून राजधानी केली; आणि लोकांचें इच्छित पुरवून जगतांत उत्तम यश संपादन केलें.(२४)

कविवंश—वर्णन

देसन देसन ते गुनी आवत जाचन ताहि ।
तिनमें आयो एक कवि भूषन कहियतु जाहि ॥ २५ ॥
दुज कन्नौज कुल कस्यपी रतनाकर सुत धीर ।
बसत त्रिविक्रमपुर सदा तरनि तनूजा तीर ॥ २६ ॥
बीर बीरबल से जहाँ उपजे कवि अरु भूप ।
देव बिहारीश्वर जहाँ विश्वेश्वर तद्रूप ॥ २७ ॥

(शिवरायाची रुचिदानामुळें सर्वत्र ख्याति झाली). त्या प्रसिद्धीवर देशांतराहून गुणी लोक त्याकडे याचना करण्याकरितां येऊं लागले; त्यांतच 'भूषण' म्हणविला जाणारा एक कवि आला. (२५)

तो कनोजी ब्राह्मण, काश्यप गोत्री, यमुना कांठीं असलेल्या त्रिविक्रम-पूरगांवीं सदा वास्तव्य असलेल्या 'रत्नाकरा'चा मुलगा होय. (२६)

त्या त्रिविक्रमपूर गांवीं बीरबलासारखे शूर राजे आणि कवि उत्पन्न झाले व तेथेंच काशीविश्वेश्वरासदृश 'बिहारीश्वर' नामक देवता आहे.(२७)

कुल सुलंक चितकूटपति साहस सील समुद्र ।
कवि भूषन पदवी दई हृदयराम सुत रुद्र ॥२८॥
सिव चरित्र लखि यों भयो कवि भूषन के चित्त ॥
भाँति भाँति भूषननि सों भूषित करौं कवित्त ॥ २९ ॥
सुकविन हूं की कछु कृपा समुझि कविन को पंथ ।
भूषन भूषनमय करत शिवभूषन सुभ ग्रंथ ॥३०॥

साहस आणि शील यांचा केवळ समुद्रच अशा सुलंकी वंशस्थ रुद्र (शहा) यांचे पुत्र हृदयराम यांनीं 'कवि -भूषण' ही पदवी दिली, (२८)

शिवाजीचें (उज्वल) चरित्र पाहतांच भूषण कवीला असें वाटूं लागलें कीं, तें चरित्रपर कवित्त नाना प्रकारच्या (शब्द-अर्थ) अलंकारांनीं सजवावें. (२९)

उत्तमोत्तम कवींच्या थोड्याबहुत कृपेनें त्यांचा (कवींचा) पंथ समजून घेऊन भूषणानें शिव–भूषण ग्रंथ अलंकारमय केला. (३०)

भूषन सब भूषननि मैं उपमहि उत्तम चाहि ।
याते उपमहि आदि दे बरनत सकल निबाहि ॥३१॥

भूषण म्हणतो, सर्व अलंकारांत उपमा अलंकार श्रेष्ठ समजून कवि-संप्रदायानुसार त्याचेंच प्रथम वर्णन करतों. (३१)

---

# अलंकार-वर्णन-प्रारंभ

## १ उपमा-लक्षण, दोहा

जहाँ दुहुन की देखिए सोभा बनति समान।
उपमा भूषन ताहि को भूषन कहत सुजान ॥३२॥

जेथें दोन वस्तूंची शोभा एकसारखी दिसून येते—गुणधर्मांत साम्य आढळून येतें-तेथें 'उपमा' अलंकार होतो. (३२)

जा को बरनन कीजिए सो उपमेय प्रमान।
जाकी सरबरि कीजिए ताहि कहत उपमान ॥३३॥

ज्या वस्तूचें वर्णन केलें जातें तीस 'उपमेय', व जिची उपमा देण्यांत येते तीस 'उपमान' असें म्हणतात. (३३)

उदाहरण—मनहरण दंडक.

मिलतहि कुरुख चकत्ता को निरखि कीन्हों सरजा सुरेस ज्यों दुचित ब्रजराज को। भूषन कुमिस गैरमिसिल खरे किए को किए म्लेच्छ मुरछित करि कै गराज को॥ अरे ते गुसुलखाने बीच ऐसे उमराय लै चले मनाय महराज सिवराज को। दाब-दार निरखि रिसानो दीह दलराय जैसे गड्दार अड्दार गज-राज को ॥३४॥

भूषण म्हणतो, इंद्रानें ज्याप्रमाणें व्रजराज श्रीकृष्णास क्रुद्ध केलें होतें त्याचप्रमाणें औरंगजेबास पाहून सरजा (शिवाजी) रागानें संतप्त झाला. कपटानें अयोग्यस्थानीं उभें केल्यामुळें गर्जून शिवरायानें म्लेंच्छांस मूर्च्छित केलें. दरबारांतील अमीरउमराव शिवाजीला परोपरीनें समजावून (औरंगजेबाच्या भेटीसाठीं) स्नानागाराकडे घेऊन चालले, त्या वेळीं असें वाटूं लागलें कीं, जणों काय सैन्याच्या अग्रभागीं असलेल्या एकाद्या धिप्पाड, व रागावलेल्या हत्तीस मस्तावलेला पाहून माहूत लोक चुचकारून चुचकारून त्यास पुढें नेण्याचा प्रयत्न करित आहेत. (३४)

## दुसरें उदाहरण

मालती सवैया

सासता खाँ दुरजोधन सो औ दुसासन सो जसवंत निहाऱ्यो।
द्रोन सो भाऊ करन्न करन्न सो और सबै दल सो दल भाऱ्यो॥
ताहि बिगोय सिवा सरजा भनि भूषन औनिछता यों पछाऱ्यो।
पारथ के पुरुषारथ भारथ जैसे जगाय जयद्रथ माऱ्यो॥३५॥

औरंगजेबाकडील सरदार शाहिस्तेखान दुर्योधनाप्रमाणें, जसवंतसिंग दु:शासनाप्रमाणें, भाऊसिंह द्रोणाचार्यांप्रमाणें व करणसिंह कर्णाप्रमाणें, तसेंच सर्व सैन्य कौरवसैन्याप्रमाणें होतें; पण शूर शिवराजानें, ज्याप्रमाणें अर्जुनानें महान् पराक्रम करून जयद्रथास मारिलें, आणि भारतांत आपली कीर्ति जागृत ठेविली, त्याचप्रमाणें वरील सरदारांच्या हातावर तुरी देऊन अवनीछत्र आपण स्वत: हस्तगत केलें. (३५)

## २ लुप्तोपमा–लक्षण, दोहा

उपमा वाचक पद, धरम, उपमेयो उपमान।
जामैं सो पूर्णोपमा लुप्त घटत लौं मान॥३६॥

ज्या उपमेंत उपमेय, उपमान, वाचक आणि धर्म ह्या पदांचें वर्णन असतें तेथें 'पूर्णोपमा' व वरील चार पदांपैकीं एक अथवा अनेक पदांचा जेथें बोध होत नाहीं तेथें 'लुप्तोपमा' अलंकार जाणावा. (३६)

उदाहरण—मालती सवैया

पावक* तुल्य अमीतन को भयो, मीतन को भयो धाम सुधा को।
आनँद भो गहिरो समुदै कुमुदावलि तारन को बहुधा को॥
भूतल माँह बली सिवराज भो भूषन भाखत शत्रु सुधा को।
बंदन तेज त्यों चंदन कीरति सोंधे सिंगार बधू बसुधा को॥३७॥

* या छंदांतील उक्ति चंद्रास अनुलक्षून आहे.

## दुसरें उदाहरण—मनहरण छंद

आप दरबार बिललाने छरीदार देखि जापता करनहार नेक हू न मनके। भूषन भनत भौंसिला के आय आगे ठाढे बाजे भए उमराय तुजुक करन के॥ साहि रह्यो जकि सिव साहि रह्यो तकि और चाहि रह्यो चकि बने ब्योंत अनबन के। ग्रीषम के भानु सो खुमान को प्रताप देखि तारे सम तारे गए मूंदि तुरकन के॥३८॥

शिवराज शत्रूंना अग्नीप्रमाणें तापदायक तर मित्रांना अमृताप्रमाणें सुखदायक झाला. ह्या शिवचंद्राच्या प्रकाशानें कुमुदिनींना व बहुतेक ताऱ्यांना अतिशय आनंद झाला. भूषण म्हणतो, भूतलावर बलिष्ठ व असत्याचा शत्रु एक शिवरायच आहे. त्या शिवरायामुळें भरतभूमी रूपी वधूची कांति इंगळाप्रमाणें व कीर्ति चांदणीप्रमाणें शोभूं लागली. (३७)

शिवाजी दरबारांत येताच भालदार चोपदार ललकारणें सोडून अगदीं स्तब्ध झाले. भूषण म्हणतो, त्या (शिवाजी) भोंसल्यापुढें कित्येक अदबीनें वागणारे उमराव विनयानें येऊन उभे ठाकले. बादशहा आपल्या जिवास सांभाळूं लागला व शिवराय आपलें वर्चस्व गाजवावें व कांहींतरी चकमक उडावी ह्या इच्छेनें बादशहाकडे निरखून पाहूं लागला. ग्रीष्म ऋतूंतील सूर्याप्रमाणें शिवाजीचा प्रताप पाहून तुर्कांचे तारे (पुढारी सरदार) नक्षत्राप्रमाणें निस्तेज झाले. (३८)

## ३ अनन्वय—लक्षण, दोहा

जहाँ करत उपमेय को उपमेयै उपमान।
तहाँ अनन्वै कहत हैं भूषन सकल सुजान॥३९॥

जेथें उपमेयच उपमान असतें तेथें 'अनन्वय' अलंकार होतो. (३९)

## उदाहरण, मालती सवैया

साहि तनै सरजा तव द्वार प्रतिच्छन दान कि दुंदुभि बाजै।
भूषन भिच्छुक भीरन को अति भोजहु ते बढि मौजनि साजै॥

राजन को गन, राजन ! को गनै ? साहिन में न इती छबि छाजै ।
आजु गरीबनेवाज महीपर तो सो तुही सिवराज बिराजै ॥४०॥

भूषण म्हणतो, हे शहाजीपुत्र शिवाजी! तुझ्या दारावर दानाच्या दुंदुभि अहर्निश झडत आहेत. आकंठ भोजन झाल्यामुळें भिक्षुकांच्या झुंडींची मोठी मौज दिसत आहे. हे राजन्! राजांची गोष्ट काय सांगावी? सार्वभौम बादशहांच्या येथें देखील अशी शोभा दिसून येणार नाहीं. शिवराज! आज पृथ्वीवर तुजसारखा दीनवत्सल तूंच आहेस. (४०)

४ प्रथम प्रतीप—लक्षण, दोहा

जहँ प्रसिद्ध उपमान को, करि बरनत उपमेय ।
तहँ प्रतीप उपमा कहत भूषन कविता प्रेय ॥४१॥

उपमानाचें वर्णन जेथें उपमेयाप्रमाणें केलें जातें तेथें प्रतीपालंकार होतो. (४१)

उदाहरण—मालती सवैया

छाय रही जितही तितही अतिहि छबि छीरधि रंग करारी ।
भूषन सुद्ध सुधान के सौधनि सोधति सी धरि ओप उज्जारी ॥
यों तम तोमहि चाबिकै चंद चहूं दिसि चाँदनि चारु पसारी ।
ज्यों अफजल्लहि मारि महीपर कीरति श्री सिवराज बगारी ॥४२॥

ज्याप्रमाणें क्षीर समुद्रांत जिकडे दृष्टि फेंकावी तिकडे शुभ्रच शुभ्र छबि पसरलेली दिसते किंवा चंद्रानें अंधकारास ग्रासून शुभ्र चांदणें पसरावें व त्या प्रकाशांत शुभ्र चुनेगच्ची प्रासादांची जशी सुंदर शोभा दिसावी त्याप्रमाणें शिवाजीनें अफ़ज़ल्खानास मारून पृथ्वीवर आपली उज्वल कीर्ति पसरली. (४२)

द्वितीय प्रतीप—लक्षण, दोहा

करत अनादर बर्न्य को पाय और उपमेय ।
ताहु कहत प्रतीप जे भूषण कविता प्रेय ॥४३॥

निराळेंच उपमेय मिळाल्यामुळें उपमानाचा जेथें अनादर करण्यांत येतो तेथेंही 'प्रतीपालंकार' होतो. ( प्रतीपालंकाराचें दुसरें लक्षण ) (४३)

उदाहरण—दोहा

**शिव ! प्रताप तव तरनिसम, अरि पानिप हर मूल।**
**गरब करत केहि हेत, है बड़वानल तो तूल ॥४४॥**

हे शिवराज ! तुझा प्रताप शत्रुरूप समुद्रास समूळ हरण करणाऱ्या सूर्याप्रमाणें आहे; मग वडवानला (प्रमाणें असणाऱ्या औरंगजेबा)नें गर्व काय म्हणून करावा ? (४४)

तृतीय प्रतीप—लक्षण, दोहा

**आदर घटत अबर्न्य को जहाँ बर्न्य के जोर।**
**तृतिय प्रतीप बखानहीं तहँ कविकुल सिरमौर ॥४५॥**

उपमेयासमोर उपमान जेथें कमी प्रतीचें लेखण्यांत येतें तेथें देखील प्रतीपालंकार होतो. ( प्रतीपाचें हें तिसरें लक्षण ). (४५)

उदाहरण—दोहा

**गरब करत कत चाँदनी हीरक छीर समान।**
**फैली इती समाज गत कीरति सिवा खुमान ॥४६॥**

त्या चिरंजीव शिवाजीची कीर्ति समाजांत इतकी पसरली आहे कीं, चांदणें, हिरा आणि दूध यांना आपल्या शुभ्रतेचा गर्व करण्याचें कारण नाहीं. (४६)

चतुर्थ प्रतीप—लक्षण, दोहा

**पाय बरन उपमान को जहाँ न आदर और।**
**कहत चतुर्थ प्रतीप है भूषन कबि सिरमौर ॥४७॥**

उपमान उपमेयाच्या योग्यतेपेक्षां कमी प्रतीचें आहे असें वर्णन होतें तेथें हि 'प्रतीपालंकार' होतो. ( प्रतीपाचें चौथें लक्षण ). (४७)

उदाहरण—कवित्त मनहरण

**चंदन मैं नाग, मदभऱ्यो इंद्रनाग, विषभरो सेसनाग कहै उपमा अबस को? । भोर ठहरात, न कपूर बहरात, मेघ सरद उड़ात बात लागे दिसि दस को ॥ शंभु नीलग्रीव, भौंर पुंडरीक ही बसत, सरजा सिवाजी सन भूषन सरस को?। छीरधि मैं पंक, कलानिधि मैं कलंक, याते रूप एक टंक ए लहै न तव जस को ॥४८॥**

या छंदांत चंदन, ऐरावत, शेष, कमल, चंद्र आदि उपमित पदार्थांत कांहींना कांहीं दोष दाखवून शिवराजयश अनुपमेय आहे असें कवीनें दाखविलें आहे:—

चंदन सुवासिक खरा, पण सर्पांनीं वेष्टिलेला; इंद्राचा ऐरावत थोर, परंतु मस्तावलेला; शेष पृथ्वी धारण करणारा परंतु विषारी; अरुणसमय नितांत रमणीय, परंतु न टिकणारा; कापूर शुभ्र व सुवासिक, परंतु उडून जाणारा; मेघ जगतावर उपकार करणारे परंतु शरद्वायु लागतांच दश-दिशांस फांकून जाणारे; महादेव सर्वांगीं गौर, पण विषपानानें कंठ नील, वर्ण झालेले; भ्रमर कृष्णवर्ण, पण शुभ्रकमलावरच बसणारा; एवढा मोठा क्षीरसागर, परंतु चिखलानें भरलेला; शांत व रमणीय प्रकाशदायी चंद्र परंतु कलंकित; सारांश, भूषण म्हणतो, मी विवश होऊन ( निरुपाय म्हणून ) वरील उपमा शिवराजयशाला दिल्या आहेत, त्या सदोष असल्यामुळें यत्किंचित् देखील शिवराज-यशाशीं तुलत नाहींत. (४८)

पंचम प्रतीप—लक्षण, दोहा

**हीन होय उपमेय सों नष्ट होत उपमान ।**
**पंचम कहत प्रतीप तेहि भूषन सुकवि सुजान ॥४९॥**

उपमेयामुळेंच उपमान हिणकस ठरतें किंबहुना नष्ट होतें; असें वर्णन जेथें होतें तेथें प्रतीपालंकार होतो. (हें प्रतीपाचें पांचवें लक्षण ). (४९)

उदाहरण—कवित्त मनहरण

**तो सम हो सेस सो तो बसत पताल, लोक ऐरावत गज सो तो इंद्रलोक सुनियै। दुरे हंस मानसर ताहि मैं कैलासधर, सुधा सुरवर सोऊ छोडि गयो दुनियै। सूर दानी सिरताज महाराज सिवराज रावरे, सुजस सम आजु काहि गुनियै?। भूषन जहाँ लौं गनौं तहाँ लौं भटकि हाऱ्यो लखियै कछू न केती बातैं चित चुनियै ॥५०॥**

हे शिवराज! तुमच्या सुयशास शेषाची उपमा देऊं तर तो पाताळांत राहणारा. बरें, ऐरावताची देऊं म्हटलें तर तो इंद्रलोकीं, हंसाची द्यावयास जाऊं तर तो दुर्गम अशा कैलास पर्वतावर मानससरोवरीं राहणारा, अमृताची उपमा देऊं म्हटलें तरी तें देवलोकांत देवांजवळ. हे दानशूर शिवराज! तुमच्या सुयशाशीं मी आतां कोणाची तुलना करूं? भूषण म्हणतो, शिवराज! तुझ्या सुकीर्तीस साजेलशी उपमा शोधण्याचा पुष्कळसा प्रयत्न केला, मनानें कित्येक (उपमा) निवडूनही काढल्या; परंतु (योग्य तुलना न झाल्यामुळें) अखेर मलाच हार खावी लागली. (५०).

उदा० २ रें—मालती सवैया

**कुंद कहा पय वृंद कहा अरु चंद कहा सरजा जस आगे?।
भूषन भानु कृसानु कहाऽब खुमान प्रताप महीतल पागे? ॥
राम कहा द्विजराम कहा बलराम कहा रन मैं अनुरागे?।
बाज कहा मृगराज कहा अति साहस मैं सिवराज के आगे ॥५१॥**

कुंद, दूध आणि चंद्र यांची शुभ्रता शिवरायाच्या यशासमोर काय होय? पृथ्वीवर पसरलेल्या (चिरंजीव) शिवरायाच्या प्रखर प्रतापापुढें सूर्य व अग्नि यांच्या तेजाचा काय पाड? समरप्रियतेमध्यें दाशरथी राम, परशराम आणि बलराम हे देखील शिवरायाच्या मागेंच होत; व धाडस पाहिलें असतां बाज (बहिरी ससाणा-पक्ष्यांवर झडप घालणारा) व सिंह हे शिवरायापुढें तुच्छ होत. (५१)

उदाहरण तिसरें

यों सिवराज को राज अडोल कियो सिव जोऽब कहा ध्रुव ध्रू है?।
कामना दानि खुमान लखे न कछू सुर-रूख न देव-गऊ है ॥
भूषन भूषन मैं कुलभूषन भौंसिला भूप धरे सब भू है।
मेरु कछू न कछू दिगदंति न कुंडलि कोल कछू न कछू है॥५२॥

महादेवांनीं शिवरायाचें राज्य ध्रुवनक्षत्रापेक्षांहि अधिक अढळ केलें. इच्छितदान देण्यांत कल्पवृक्ष किंवा कामधेनु यांची आयुष्यमान (खुमान) अशा शिवरायापुढें कांहीं किंमत नाहीं. भूषण म्हणतो, भोंसले-वंशाचें भूषण अशा शिवरायानें सर्व पृथ्वी धारण केली आहे. पृथ्वी धारण करण्यांत शिवरायासमोर शेष, कूर्म, वराह, मेरु, दिग्गज यांची कांहीं मातब्बरी नाहीं. (५२)

५ उपमेयोपमा—लक्षण, दोहा

जहँा परस्पर होत है उपमेयो उपमान।
भूषन उपमेयोपमा ताहि बखानत जान ॥५३॥

जेथें उपमेय आणि उपमान हीं परस्परांचीं उपमान आणि उपमेयें होतात तेथें 'उपमेयोपमा' अलंकार होतो. (५३)

उदाहरण—कवित्त मनहरण

तेरो तेज, सरजा समत्थ! दिनकर सो है, दिनकर सोहै तेरे तेज के निकर सो। भौंसिला भुवाल! तेरो जस हिमकर सो है, हिमकर सोहै तेरे जस के अकर सो ॥ भूषन भनत तेरो हियो रतनाकर सो, रतनाकरौ है तेरे हिय सुखकर सो। साहि के सपूत सिव साहि दानि! तेरो कर सुरतरु सो है, सुरतरु तेरे कर सो ॥५४॥

हे शूर समर्थ शिवराज! तुझें तेज सूर्याप्रमाणें देदिप्यमान आहे; किंबहुना तो सूर्य तुझ्या तेजोनिधीपासून प्रकाशित होतो. हे भोंसलेकुलावतंस! तुझें यश चंद्राप्रमाणें निष्कलंक आहे; किंबहुना चंद्रच तुझ्या यशोनिधीनें

शोभत आहे. भूषण म्हणतो, तुझें हृदय समुद्राप्रमाणें गंभीर आहे; किंबहुना समुद्रच तुझ्या सुखकर हृदयापासून आहे. हे शहाजीपुत्र दानशूर शिवाजी! तुझा हात कल्पवृक्षाप्रमाणें शोभतो; किंबहुना कल्पवृक्षच तुझ्या हातामुळें शोभा पावतो. (५४)

## ६ मालोपमा—लक्षण, दोहा

जहाँ एक उपमेय के होत बहुत उपमान।
ताहि कहत मालोपमा भूषन सुकबि सुजान॥५५॥

एकाच उपमेयाचें अनेक उपमांनीं जेथें वर्णन केलें जातें तेथें 'मालोपमा' अलंकार जाणावा. (५५)

### उदाहरण—कवित्त मनहरण

इंद्र जिमि जंभ पर, बाडव सुअंभ पर, रावन सदंभ पर रघुकुल राज है। पौन बारिबाह पर, संभु रतिनाह पर, ज्यों सहसबाह पर राम द्विजराज है॥ दावा द्रुमदंड पर, चीता मृगझुंड पर, भूपन बितुंड पर जैसे मृगराज है। तेज तम अंस पर, कान्ह जिमि कंस पर त्यों मलिच्छ बंस पर, सेर सिवराज है॥५६॥

जृंभासुरास जसा इंद्र, समुद्रास वडवानळ, गर्विष्ठ रावणास रामचंद्र, मेघास वायु, मदनास शिव, सहस्रार्जुनास परशराम, वृक्षास दावाग्नि, हरिणांच्या कळपावर वाघ, हत्तीस सिंह, अंधकारास प्रकाश, कंसास श्रीकृष्ण त्याप्रमाणें म्लेंच्छकुळास सिंहवत् शिवराज होय. (५६)

## ७ ललितोपमा—लक्षण, दोहा

जहँ समता को दुहुन की लीलादिक पद होत।
ताहि कहत ललितोपमा सकल कबिन के गोत॥५७॥

दोन वस्तूंचें साम्य लीलादिक पदांनीं जेथें जाणविलें जातें तेथें 'ललितोपमा' अलंकार होतो. (५७)

बिहसत, निदरत, हँसत जहँ, छबि अनुहरत बखानि।
सत्रु मित्र इमि औरऊ लीलादिक पद जानि ॥५८॥

संवाद, निरादर, हास्य, शोभावलोकन, तसेंच शत्रु, मित्र इत्यादींचें व त्याचप्रमाणें इतर विषयांचें वर्णन ज्या पदांनीं केलें जातें त्यांस लीलादिक पदें म्हणतात. (५८)

उदाहरण—कवित्त मनहरण

साहि तनै सरजा सिवा की सभा जामधि है मेरु वारी सुर की सभा को निदरति है। भूषन भनत जाके एक एक सिखर ते केते धौं नदी नद की रेल उतरति है॥ जोन्ह को हँसति जोति हीरा मनि मंदिरन कंदरन मैं छबि कुहू कि उछरति है। ऐसो ऊँचो दुरग महाबलि को जामैं नखतावली सों बहस दिपावली धरति है ॥५९॥

शहाजीपुत्र शिवाजीची ( रायगडावरील ) सभा मेरुपर्वतावरील देवसभेला तुच्छ लेखणारी अशी आहे. भूषण म्हणतो, ह्या ( रायगडा )च्या एकेका शिखरापासून कित्येक नदीनदांचे प्रवाह धों धों वाहत आहेत. ( किल्ल्यावरील ) मंदिरांतील हिरेमाणिकादि रत्नांची प्रभा चंद्रप्रकाशास लाजविणारी आहे. कारण, ह्या प्रभेनें ( गडावरील व भोंवतालील ) दऱ्याखोऱ्यांतील अमावास्येचा अंधार पार घालवून दिला आहे. महाबलिष्ट अशा शिवरायाचा ( रायगड ) किल्ला इतका उंच आहे कीं ( आकाशांतील चमकणाऱ्या ) तारांगणामुळें त्यावर नेहमीं दीपावलीची शोभा विराजत आहे. (५९)

८ रूपक—लक्षण, दोहा

जहाँ दुहुन को भेद नाहिं बरनत सुकबि सुजान।
रूपक भूषन ताहि को भूषन करत बखान ॥६०॥

उपमेय आणि उपमान यांत जेथें अभेद वर्णन करण्यांत येतो तेथें 'रूपकालंकार' होतो. (६०)

उदाहरण—छप्पय

कलिजुग जलधि अपार उद्ध अधरम्म उम्मिमय।
लच्छनि लच्छ मलिच्छ कच्छ अरु मच्छ मगर चय॥
नृपति नदीनद वृंद होत जाको मिलि नीरस।
भनि भूषन सब भुम्मि घेरि किन्निय सुअप्प बस॥
हिन्दुवान पुन्य गाहक बनिक तासु निबाहक साहि सुब।
बर बादवान किरवान धरि जस जहाज सिवराज तुव॥६१॥

अधर्मरूप उंच उंच लाटा उसळणाऱ्या कलियुगरूपी अगाध समुद्रांत म्लेंच्छरूपी लक्षावधि कांसवें, मासे, सुसरी यांचे समुदाय आहेत. नृपतिरूप नदी आणि नद या समुद्रांत मिसळून निस्तेज होत आहेत. भूषण म्हणतो, (शिवाजीनें) सर्व पृथ्वी घेरून आपल्या आधीन करून घेतली आहे. हिन्दुत्वाचें पुण्य संपादन करूं इच्छिणाऱ्या ग्राहकांना पुण्याचा संचय (निर्वाह करणारा) करून देणारा शहाजीपुत्र शिवराज वणिक्-रूप आहे. हे शिवराज! ह्या समुद्रांतून पार उतरण्यास कृपाणरूपी उंच शीड असलेलें तुझें यशोरूपी जहाजच समर्थ आहे. (६१)

उदाहरण दुसरें

साहिन मन समरत्थ जासु नवरंग साहि सिरु।
हृदय जासु अब्बास साहि बहुबल विलास थिरु॥
एदिलसाहि कुतुब्ब जासु जुग भुज भूषन भनि।
पाय म्लेच्छ उमराय काय तुरकान आन गनि॥
यह रूप अवनि अवतार धरि जेहि जालिम जग दंडियव।
सरजा सिव साहस खग्ग गहि कलिजुग सोइ खल खंडि-यव॥६२॥

(पुढील छंदांत कवीनें यवन-साम्राज्यास एक देह कल्पून निर-निराळ्या बादशहांस त्यांच्या योग्यतेनुरूप वेगवेगळ्या अवयवांच्या उपमा दिल्या आहेत):—

भूषण म्हणतो, ह्या यवन-साम्राज्यरूप विराट् कायेचें शूर बादशहा 'मन' होत; औरंगजेब बादशहा 'मस्तक', ज्याच्या बाहुबलाचा पराक्रम स्थिर असा अब्बासशहा हा 'हृदय', आदिलशहा आणि कुतुबशहा हे ज्याचे 'उभय बाहु', यवन सरदार हे 'पाय' व इतर तुर्क हे शेष 'अवयव'; अशा ह्या जुलुमी कायेनें पृथ्वीवर अवतार धारण करून जगाला शासन केलें. कलियुगांतील त्या दुष्ट कायेचें सिंहसमान शूर शिवाजीनें साहसरूपी खड्ग घेऊन खंडन केलें. (६२)

### उदाहरण ३ रें—कवित्त मनहरण

सिंह थरि जाने बिन जावली जँगल भठी हठी गज एदिल पठाय करि भटक्यो। भूषन भनत देखि भभरि भगाने सब हिम्मति हिये मैं धारि काहुवै न हटक्यो। साहि के सिवाजी गाजी सरजा समत्थ महा मदगल अफजलै पंजा बल पटक्यो। ता बिगिरि व्है करि निकाम निजधाम कहँ आकुत महाउत सुआँकुस लै सटक्यो॥ ६३॥

जावळीच्या जंगलांत सिंह राहण्याची गुहा आहे हें न समजून दुराग्रही आदिलशहानें (अफजलरूपी) हत्तीस पाठवून चूक केली. भूषण म्हणतो, (त्या अफजलखानास पाहून) सर्व भयभीत होऊन पळून गेले. कोणी-देखील मनांत धैर्य धरून त्याला अडवूं शकला नाहीं; पण शहाजीच्या धर्मवीर समर्थ शिवाजी सरजानें मदोन्मत्त अफजलखानास पंजाच्या जोरानें पटकलें (मारिलें). त्या अफजलरूप हत्तीवांचून या फूतखान रूपी माहूत अंकुश घेऊन तुसताच आपल्या ठिकाणीं पळून गेला. (६३)

### न्यूनाधिक रूपकाचे प्रकार—कवित्त मनहरण

घटि बढि जहँ बरनन करै करिकै दुहुन अभेद।
भूषन कवि औरौ कहत द्वै रूपक के भेद॥ ६४॥

उपमेय व उपमान यांचा अभेद न्यूनाधिक भावानें जेथें वर्णन केला जातो तेथें 'रूपकालंकार' होतो. (६४)

उदा०—कवित्त मनहरण

साहि तनै सिवराज भूषन सुजस तव बिगिर कलंक चंद
उर आनियतु है। पंचानन एकही वदन गनि तोहि
गजानन गजबदन विना बखानियतु है॥ एक सीस ही सहस–
सीस कला करिबे को दुहूँ दृग सों सहसदृग मानियतु
है। दुहूँ कर सों सहसकर मानियतु तोहि दुहूँ बाहु सों
सहसबाहु जानियतु है ॥६५॥

भूषण म्हणतो, हे शहाजी पुत्र शिवराज! तुझें सुयश निष्कलंक चंद्रा-प्रमाणें भासतें, एक मुखी असून (तुला) पंचानन (महादेव) व गज-मुखावांचून गजानन म्हणतात. एक मस्तक असूनही कुशलतेच्या कामीं तुला सहस्रशीर्ष, व दोनच डोळे असून सहस्रनेत्री (इंद्र) मानतात; तसेंच दोन हात असून सहस्रकर (सूर्य), व दोन बाहू असून सहस्रबाहू–(सहस्रा-र्जुन) मानतात. (६५)

उदा० २ रें

जेते हैं पहार भुव माहिं† पारावार तिन सुनि के अपार
कृपा गहे सुख फैल है। भूषन भनत साहि तनै सरजा के
पास आइबे को चढी उर हौंसनि की ऐल है॥ किरवान
वज्र सों विपच्छ करिबे के डर आनिकै कितेक आए सरन
की गैल है। मघवा मही मैं तेजवान सिवराज बीर कोट
करि सकल सपच्छ किए सैल है ॥६६॥

भूतलावर जेवढे म्हणून पर्वत आहेत ते तुझा पराक्रम ऐकून तुझी कृपा संपादन करून सुखानें फैलावले आहेत. भूषण म्हणतो, शहाजीपुत्र शिव-रायाच्याजवळ (आश्रयास) येण्याकरितां (या पर्वतांच्या) मनांत हौसांची रेलचेल होते. कृपाणरूपी वज्रानें पंखरहित करण्याच्या भीतीनें कित्येक पर्वत यास शरण आले आहेत. ह्या तेजस्वी व पराक्रमी (पृथ्वीवरील)

[† पाठ भेद (जेते हैं पहार भुव पारावार माहिं) पृथ्वीवर व समुद्रांत जेवढे म्हणून पर्वत आहेत.]

इंद्रानें किल्ले बांधून सर्व पर्वत सपक्ष केले आहेत. (पर्वतास गडरूप पंख लाविले आहेत. सुरपति इंद्र पर्वताचे पंख आपल्या वज्रानें छेदीत असे तर शिवाजीरूप इंद्र पर्वतावर किल्ले बांधून त्यांना पंख लावीत आहे.) (६६)

## ९ परिणाम—लक्षण, दोहा

जहँ अभेद करि दुहुन सों करत और स्वे काम।
भनि भूषन सब कहत हैं तासु नाम परिनाम ॥६७॥

उपमेयद्वारां केली जाणारी क्रिया जेथें उपमानकृत समजली जाते तेथें 'परिणाम' अलंकार जाणावा. (६७)

### उदाहरण—मालती-सवैया

भौंसिला भूप बली भुव को भारी भुजंगम सों भरु लीनो। भूषन तीखन तेज तरन्नि सों बैरिन को कियो पान्निप हीनो॥ दारिद दौ करि बारिद सों दलि त्यों धरनीतल सीतल कीनो। साहि तनै कुल चन्द सिवा जसचन्द सों चन्द कियो छबि छीनो ॥६८॥

बलाढ्य भोंसले राजानें आपल्या जबरदस्त भुजांनीं शेषाप्रमाणें पृथ्वीचा भार उचलला आहे. भूषण म्हणतो, सूर्याप्रमाणें आपल्या प्रखर तेजानें शत्रूंस तेजहीन केलें; दारिद्यरूप वणव्यास मेघाप्रमाणें विझवून सर्व धरणीतल शीतल करून टाकलें. शहाजीपुत्र व कुलचंद्र अशा शिवाजीनें आपल्या कीर्तिरूप चंद्राच्या योगें ह्या (नैसर्गिक) चंद्राची प्रभा क्षीण केली आहे.(६८)

### उदा० २ रें—कवित्त मनहरण

वीर विजैपुर के उजीर निसिचर गोलकुण्डा वारे घूघू ते उडाए हैं जहान सों। मन्द करी मुखरुचि चन्द चकता की, कियो भूषन भूषित द्विज चक्र खानपान सों॥ तुरकान मलिन कुमुदिनी करी है हिन्दुवान नलिनी खिलायो विविध विधान सों। चारु सिवनाम को प्रतापी सिव साहि-सुव तापी सब भूमि यों कृपान भासमान सों ॥६९॥

विजापूरच्या आणि गोवळकोंडयाच्या शूर वीर वजीररूप निशाचरांस घुबडाप्रमाणें जगांतून ह्या शिवप्रभूनें उडवून लाविलें; चक्रवर्ती औरंगजेबरूपी चंद्राची मुखकान्ति निष्प्रभ केली. भूषण म्हणतो, ब्राह्मणरूप चक्रवाकास अन्नदानादि करून संतृप्त केलें; तुर्करूप कुमुदिनींना हीनतेज करून नाना-प्रकारें हिन्दुत्वरूप कमलांना विकसित केलें. अशा प्रकारें सुंदर व शंकराचें नांव धारण करणाऱ्या ह्या प्रतापी शहाजीपुत्र शिवाजीच्या खड्गरूपी सूर्यानें सर्व पृथ्वी तळपत आहे. (६९)

## १० उल्लेख—लक्षण, दोहा

कै बहुतै कै एक जहँ, एक वस्तु को देखि ।
बहु विधि करि उल्लेख हैं, सो उल्लेख उलेखि ॥७०॥

एकाच वस्तूचें अनेक प्रकारांनीं जेथें वर्णन केलें जातें तेथें 'उल्लेख' अलंकार समजावा. (७०)

### उदा०—मालती सवैया

एक कहैं कलपद्रुम है इमि पूरत है सबकी चित चाहै ।
एक कहैं अवतार मनोज को यों तन मैं अति सुन्दरता है ॥
भूषन एक कहैं महि इन्दु यों राज विराजत बाढ्यो महा है
एक कहैं नरसिंह है संगर एक कहैं नरसिंह सिवा है ॥ ७१ ॥

सर्वांचे मनोरथ पूर्ण होतात म्हणून या (शिवाजी)स कोणी 'कल्पद्रुम' असें म्हणतात. सौंदर्यसंपन्न असल्यामुळें कोणी यास मदनाचा अवतार आहे असें म्हणतात. भूषण म्हणतो, कोणी यास पृथ्वीवरील चंद्रच म्हण-तात. कारण, ( चंद्रकलेप्रमाणें दिवसेंदिवस ) याचें राज्य विस्तार पावत आहे. युद्धांत मनुष्य असूनही यास (शूरत्वामुळें) सिंह म्हणतात; तर कोणी शिवाजीस प्रत्यक्ष 'नृसिंह भगवानच म्हणतात. (७१)

### उदा० २ रें—मनहरण दंडक

कवि कहैं करन, करनजीत कमनैत, अरिन के उर माँहिं कीन्हो इमि छेव है । कहत धरेस सब धराधर सेस

ऐसो और धराधरन को मेट्यो अहमेव है ॥ भूषन भनत महाराज सिवराज तेरो राजकाज देखि कोऊ पावत न भेव है। कहरी यदिल, मौज लहरी कुतुब कहै, बहरी निजामके जितैया कहैं देव है ॥ ७२ ॥

कवि तुला ( दानशूरपणामुळें ) कर्ण म्हणतात, तर धनुर्विद्येंत प्रवीण असलेले वीर तुला कर्णजित् ( अर्जुन ) म्हणतात. कारण, शत्रूंच्या हृदयांत अर्जुनाप्रमाणेंच ( त्वां ) घाव केले आहेस. तुला सर्व धरेश ( राजे ) शेषा-प्रमाणें 'धराधर' म्हणतात. ( त्वां ) इतर धराधरांची-राजेमहाराजांची अहमहमिका जिरविली आहे. भूषण म्हणतो, हे शिवराज! तुझ्या राज-कारणाचा कोणालाही अन्त लागत नाहीं. तुला आदिलशाह 'कहरी' म्हणतो तर कुतुबशाह 'लहरी' आणि देवता, निजामास जिंकणारा 'बहरी' (बहिरी-ससाणा) म्हणतात. (७२)

उदाहरण ३ रें

पैज प्रतिपाल, भूमिभार को हमाल, चहुँ चक्क को अमाल भयो, दण्डक जहान को। साहिन को साल भयो, ज्वाल को जवाल भयो, हर को कृपाल भयो हार के विधान को॥ वीररस ख्याल सिवराज भुवपाल तुव हाथ को विसाल भयो भूषन बखान को? । तेरो करवाल भयो दच्छिन को ढाल, भयो हिन्दु को दिवाल भयो, काल तुरकान को ॥ ७३ ॥

शिवराज भूपाल-प्रतिज्ञा शेवटास नेणारा, भूमिभार शिरावर घेणारा, चहूं दिशांच्या राज्यांवर अम्मल गाजविणारा, जगतास शासन करणारा; तसेंच बादशहांस शल्याप्रमाणें बोंचणारा, (प्रजेची) पीडा हरण करणारा आणि नरमुण्डमाला अर्पण करण्याच्या विधीनें महादेवावरही कृपा करणारा असा झाला. भूषण म्हणतो, तुझी तरवार दक्षिणेला ढालीप्रमाणें व हिन्दूंना भिंतीप्रमाणें रक्षण करणारी झाली; आणि यवनांना मात्र प्रत्यक्ष काळ झाली. वीररसप्रिय अशा शिवरायाच्या विशाल भुजांचें (ज्या

स्वतः शक्तिसंपन्न असून इतरांनाही शक्ति देणाऱ्या अशा आहेत त्यांचें) कोण वर्णन करूं शकेल? (७३)

### ११ स्मृति—लक्षण, दोहा

सम सोभा लखि आन की, सुधि आवत जेहि ठौर।
स्मृति भूषन तेहि कहत हैं, भूषन कवि सिरमौर ॥ ७४ ॥

समानगुणधर्मामुळें जेथें अन्य वस्तूची आठवण होते तेथें 'स्मृति' अलंकार जाणावा. (७४)

उदा०—कवित्त मनहरण

तुम सिवराज ब्रजराज अवतार आजु तुमहीं जगत काज पोषत भरत हौ। तुम्हैं छोडि याते काहि बिनती सुनाऊँ मैं तुम्हारे गुन गाऊँ तुम ढीले क्यों परत हौ? ॥ भूषन भनत वहि कुल मैं नयो गुनाह नाहक समुझि यह चित मैं धरत हौ। और बाँभनन देखि करत सुदामा सुधि मोहिं देखि काहे सुधि भृगु की करत हौ? ॥ ७५ ॥

हे शिवराज! तुम्ही ब्रजराज श्रीकृष्णाचे अवतार आहां, कारण सांप्रत जगताचें भरणपोषण-कार्य तुम्हीच करीत आहां; म्हणून तुम्हांला सोडून मी दुसऱ्याची विनवणी कशाला करूं? मी तुमचेंच गुणगान करितों पण तुम्ही असे शिथिल कां होतां? भूषण म्हणतो, मी त्याच कुलांतील (ब्राह्मण वंशांतील) एक नवीन अपराधी असा आपण विनाकारण गैर-समज करून घेतला आहे. कारण, (मला माहीत आहे कीं), इतर पुष्कळ ब्राह्मणांना पाहून आपणांस सुदामाची आठवण होते; पण मला पाहतांच आपणांस भृगु ऋषीची स्मृति होते याचें काय कारण? (७५)

### १२ भ्रम—लक्षण, दोहा

आन बात को आन मैं, होत जहाँ भ्रम आय।
तासों भ्रम सब कहत हैं, भूषन सुकवि बनाय ॥ ७६ ॥

एका वस्तूचे ठिकाणीं भिन्न अशा अन्य वस्तूचा भ्रम जेथें होतो तेथें 'भ्रम' अलंकार जाणावा. (७६)

उदा०—मालती सवैया

पीय पहारन पास न जाहु यों तीय बहादुर सों कहैं सोषैं। कौन बचै है नबाब तुम्हैं भनि भूषन भौंसिला भूप के रोषैं॥ बन्दि सइस्त खँहू को कियो जसवन्त से भाऊ करन्न से दोषैं?। सिंह सिवा के सुवीरन सों गो अमीर न बाँचि गुनीजन घोषैं॥ ७७॥

शूर शिपायांच्या स्त्रिया आपल्या पतींना शपथ घालून म्हणतात, तुम्ही डोंगरांकडे जाऊं नका. तुम्ही तिकडे (शिवाजीवर चाल करून) जाल तर त्या भोंसले राजाच्या रागाच्या तडाक्यांतून कोणता नबाब तुमचा बचाव करूं शकेल? कारण, शाहिस्तेखानासारख्यांस यानें कैद केलें; आणि जसवंतसिंग,भाऊसिंग,करणसिंग ह्यांसारख्यांस गुन्हेगारांप्रमाणें वागविलें. भूषण म्हणतो, गुणीजनांची हीच घोषणा चालली आहे कीं, शिवसिंहाच्या शूरवीरांपुढें कोणीही अमीर टिकला नाहीं. (७७)

## १३ सन्देह

कै यह कै वह यों जहाँ, होत आनि सन्देह।
भूषन सो सन्देह है, या मैं नहिं सन्देह॥ ७८॥

हें किंवा तें असा जेथें संशय उत्पन्न होतो तेथें 'सन्देह' अलंकार समजावा. (७८)

उदा०—कवित्त मनहरण

आवत गुसुलखाने ऐसे कछू त्योर ठाने जाने अवरङ्गजू के प्रानन को लेवा है। रस खोट भए ते अगोट आगरे मैं सातौ चौकी डाँकि आनि घर कीन्हीं हद रेवा है॥ भूषन भनत वह चहूँ चक्क चाहि कियो पातसाहि चकता की

छाती माहिं छेवा है। जान्यो न परत ऐसे काम है करत
कोऊ गंधरव देव है कि सिद्ध है कि सेवा है ॥७९॥

स्नानगृहाकडे येतांना शिवाजीनें जो क्रोधाविर्भाव दाखविला त्यावरून तो औरंगजेबाचा प्राणच घेतो कीं काय असें वाटूं लागलें. शिवाजी, वचन-भंग झाल्यामुळें आग्र्यांतील सात चौक्या ओलांडून पहाऱ्यांतून सुरक्षितपणें निसटून घराकडे आला; व त्यानें नर्मदा नदी ही आपल्या राज्याची सीमा केली. भूषण म्हणतो, त्या (शिवाजी)नें चहूं दिशांचें आधिपत्य (पादशाही) असावें अशी इच्छा केली; तेव्हां चगताई बादशहा (औरंगजेबा)च्या छातींत प्रहार केल्यासारखें झालें. शिवाजी आपलीं कामें अशा रीतीनें करतो कीं, तीं गंधर्व, देव अथवा सिद्ध यांनीं केलीं कीं शिवाजीनें केलीं असावीं हें समजून येत नाहीं. (७९)

## १४ शुद्धापन्हुति—लक्षण, दोहा

आन बात आरोपिए, साँची बात दुराय।
शुद्धापन्हुति कहत हैं, भूषन सुकवि बनाय ॥ ८० ॥

खरी गोष्ट (वस्तु) लपवून तिजवर दुसरीचा आरोप केला जातो तेथें 'शुद्धापन्हुति' अलंकार जाणावा. (८०)

### उदा०—कवित्त मनहरण

चमकतीं चपला न, फेरत फिरंगैं भट, इन्द्र को न
चाप रूप बैरष समाज को। धाए धुरवा न, छाए धूरि के
पटल, मेघ गाजिबो न बाजिबो है दुन्दुभि दराज को॥
भौंसिला के डरन डरानी रिपु रानी कहैं, पिय भजौ, देखि
उदौ पावस के साज को। घन की घटा न, गज घटनि,
सनाह साज भूषन भनत आयो सेन सिवराज को ॥ ८१ ॥

ही विजेची चमक नव्हे, तर वीर आपल्या तरवारी फिरवीत आहेत; हें इन्द्रधनुष्य नव्हे, हा सैन्याचा झेंडा आहे; हें ढग नव्हेत, तर (सैन्याच्या चालण्यानें उडालेली) धूळ आहे; ही मेघांची गर्जना नव्हे तर (सैन्या-

समोर वाजणाऱ्या ) मोठमोठ्या नगाऱ्यांचा भीषण ध्वनि आहे; हा मेघ-समुदाय नव्हे, तर कवचादि घालून सज्ज केलेले हत्ती आहेत. भूषण म्हणतो, पावसाच्या सुरवातीचीं वरील चिन्हें पाहून भोंसल्याच्या दराऱ्यानें गांगरून गेलेल्या शत्रुस्त्रिया आपल्या पतींना म्हणतात, 'पळा, हें शिवाजीचें सैन्य येऊं लागलें आहे'. (८१)

## १५ हेतु अपन्हुति—लक्षण, दोहा

जहँ जुगुति सों आन को, कहिए आन छपाय । हेतु अपन्हुति कहत हैं, ताकहँ कवि समुदाय ॥ ८२ ॥

जेथें युक्तीनें एकादी गोष्ट लपवून दुसरी आहे असें म्हटलें जातें, तेथें 'हेत्वपन्हुति' अलंकार समजावा. (८२)

उदा०—दोहा

सिव सरजा के कर लसै, सो न होय किरवान ।
भुज भुजगेस भुजंगिनी, भखति पौन अरि प्रान ॥ ८३ ॥

शूर शिवाजीच्या हातांत शोभणारी ( वस्तु ) तरवार नव्हे, तर त्याची भुजा हाच फणी भुजंग आणि तरवार ही भुजंगिनी होय; हीं शत्रूंच्या प्राणरूप वायूस भक्षून राहातात. (८३)

उदा० २ रें—कवित्त मनहरण

भाखत सकल सिवजी को करबाल पर भूषन कहत यह करि कै विचार को। लीन्हों अवतार करतार के कहे तें कलि म्लेच्छन हरन उद्धरन भुव भार को ॥ चंडी ह्वै घुमंडि अरि चण्ड मुण्ड चाबि करि पीवत रुधिर लावत न बार को। निज भरतार भूत भूतन की भूख मेटि भूषित करत भूतनाथ भरतार को ॥८४॥

भूषण म्हणतो, मी विचार करून हें सांगतों कीं, सर्व लोक शिवाजीस त्याच्या तरवारीवरून तो ईश्वरी अवतार आहे असें म्हणतात आणि हा अवतार त्यानें कलियुगांतील म्लेंच्छांचें हरण करून भूभार हलका करण्या-

करितां ईश्वरी अनुज्ञेनेंच ( करतार के कहे तें. ) घेतला. (ही तरवार) चंडी बनून शत्रूंचीं प्रचण्ड मुंडकीं चावून (लचके तोडून) विलंब न लावतां रक्तपान करिते आणि आपले स्वामी भूतनाथ महादेव यांच्या भूतप्रेत-गणांची भूक शमवून त्यांस-महादेवांस-मुंडमालेनें सुशोभित करिते. (८४)

१६ पर्यस्त अपन्हुति—लक्षण, दोहा

वस्तु गोय ताको धरम, आन वस्तु में रोपि।
पर्यस्तापन्हुति कहत, कवि भूषन मति वोपि ॥ ८५ ॥

एखाद्या वस्तूस छपवून तिचा धर्म अन्य वस्तूवर आरोपित करणें याला 'पर्यस्तापन्हुति' म्हणतात. (८५)

उदा०—दोहा

काल करत कलि-कालमें, नहिं तुरकन को काल।
काल करत तुरकान को, सिव सरजा करवाल ॥ ८६ ॥

कलियुगांत तुर्क मृत्यूनें मरत नाहींत, शूर शिवाजीची तरवार त्यांचा अंत करते. (८६)

उदा० २ रें—कवित मनहरण

तेरे ही भुजन पर भूतल को भार कहिबे को सेसनाग दिगनाग हिमाचल है। तेरो अवतार जग पोसन भरन हार कछु करतार को न तामधि अमल है॥ साहिन में सरजा समत्थ सिवराज कवि भूषन कहत जीवो तेरोई सफल है। तेरो करवाल करै म्लेच्छन को काल बिनकाज होत काल बदनाम धरातल है ॥८७॥

हे बादशहांत शूर आणि समर्थ शिवराज! ह्या भूतलाचा भार आतां तुझ्या बाहूंवरच आहे. शेष, दिग्गज, हिमालय हे नुसते नांवाचे आहेत. जगाच्या भरण-पोषणाकरितां तुझाच अवतार आहे. परमेश्वराचा ह्याशीं कांहीं संबंध नाहीं. भूषण म्हणतो, यामुळें तुझेंच जीवित सफल होय. तुझी तरवारच तुर्कांचा अंत करणारी आहे. मृत्यू मात्र विनाकारण बदनाम झाला आहे. (८७)

## १७ भ्रांतापन्हुति—लक्षण, दोहा

संक आन को होत हीं, जहँ भ्रम कीजै दूरि ।
भ्रान्तापन्हुति कहत हैं, तहँ भूषन कवि भूरि ॥८८॥

अन्य वस्तूची शंका होतांच ती शंका जेथें निरसन केली जाते तेथें भ्रान्तापन्हुति' अलंकार जाणावा.

उदा०—कवित्त मनहरण

साहि तनै सरजा के भय सों भगाने भूप मेरु मैं लुकाने ते लहत जाय ओत हैं। भूषन तहाऊँ मरहट्टपतिके प्रताप पावत न कल अति कौतुक उदोत हैं ॥ "सिव आयो सिव आयो" संकट के आगमन सुनि के परान ज्यों लगत अरि गोत हैं "सिव सरजा न यह सिव है महेस" करि योंही उपदेस जच्छ रच्छक से होत हैं ॥ ८९ ॥

शहाजीपुत्र शिवाजीच्या भयानें पळून गेलेले राजे मेरु पर्वतांत जाऊन लपून बसले. तेथेंच त्यांना आराम वाटूं लागला. भूषण म्हणतो, तेथें देखील त्या बिचाऱ्यांना आराम कोठून मिळणार? महाराष्ट्रपति शिवाजीच्या प्रतापामुळें येथें सुद्धां विलक्षण चमत्कार घडून येऊं लागले. 'शिव आला', 'शिव आला' असें शंकराचें आगमन ऐकतांच बिचारे शत्रूकडील वीर पळूं लागतात; पण हा 'सरजा शिवाजी' नव्हे, 'महेश शिव' आहे असें यक्ष त्या (लपलेल्या राजां)ना सांगून त्यांचें संरक्षण करितात. (८९)

उदा० २ रें—मालती सवैया

एक समै साजि कै सब सैन सिकार को आलमगीर सिधाए। "आवत है सरजा सम्हरौ" एक ओर ते लोगन बोल जनाए ॥ भूषन भो भ्रम औरंग के सिव भौंसिला भूप की धाक धुकाए। धायकै 'सिंह' कह्यो समुझाय करौलनि आय अचेत उठाए ॥ ९० ॥

एके वेळीं सर्व सैन्य सज्ज करून औरंगजेब शिकारीस निघाला असतां लोकांनीं एकीकडून 'सरजा ( सिंह ) येतो आहे, सांभाळा' असा गलबला केला; भूषण म्हणतो, औरंगजेब 'सरजा' म्हणजे शिवाजीच आला असें समजून मूर्च्छित झाला. तेव्हां शिकारी लोकांनीं धांवून येऊन 'शिवाजी नव्हे, सिंह' असें समजाविल्यावरून निश्चेष्ट झालेल्या औरंगजेबास उठाविलें. (९०)

### १८ छेकापन्हुति—लक्षण, दोहा

जहाँ और को संक करि, साँच छिपावत बात।
छेकापन्हुति कहत हैं, भूषण कवि अवदात ॥९१॥

अन्य वस्तूची शंका घेऊन खरी वस्तू लपविली जाते तेथें 'छेकापन्हुति' अलंकार जाणावा. (९१)

### उदा०—दोहा

तिमिर बंस हर अरुन कर, आयो सजनी भोर?।
सिव सरजा, चुप रहि सखी, सूरज कुल सिरमौर ॥९२॥

दोन मैत्रिणींचें परस्पर संभाषणः—

पहिली दुसरीस म्हणतेः—हे साजणी! अंधःकाराचा नाश करणारा हा अरुणोदय होत आहे.

दुसरी पहिलीस म्हणतेः—अग, चुप बैस; हा अरुणोदय नव्हे, तैमूर-वंशाचें निर्दलन करणारा सूर्यकुलमणी सरजा शिवाजी आहे. (९२)

### उदा० २ रें—दोहा

दुरगहि बल पंजन प्रबल, सरजा जिति रन मोहिं।
औरँग कहै देवान सों, सपन सुनावत तोहि ॥९३॥

सुनि सु उजीरन यों कह्यो, "सरजा सिव महराज?।"
भूषन कहि चकता सकुचि, "नाहिं, सिकार मृगराज" ॥९४॥

औरंगजेब आपल्या वजिरास रात्रीं पडलेलें स्वप्न सांगूं लागलाः— "किल्ल्यांच्या (अथवा दुर्गाभवानीच्या ?) आणि बलिष्ठ पंजाच्या जोरावर सरजानें मला रणांत जिंकिलें." वजिरानें विचारलें, "'सरजा' म्हणजे कोण ? शिवाजीमहाराज कीं काय ?" भूषण म्हणतो, वजिराचें हें म्हणणें ऐकुन औरंगजेब लाजून चूर झाला व म्हणूं लागला, "तसें नव्हे, 'सरजा' म्हणजे सिंह (व शिकार खेळत असतांना सिंहानें मला, जिंकिलें.") (९३,९४)

## १९ कैतवापन्हुति–लक्षण, दोहा

जहँ कैतव, छल, व्याज मिसि, इन सों होत दुराव ।
कैतव पन्हुति ताहि सों, भूषन कहि सतिभाव ॥ ९५ ॥

एकादी वस्तू कपट, प्रतारणा, व्याज यांच्या मिषानें जेथें लपविली जाते तेथें 'कैतवापन्हुति' अलंकार जाणावा. (९५)

उदा०–मनहरण दंडक

साहिन के सिच्छक सिपाहिन के पातसाह संगर मैं सिंह कैसे जिनके सुभाव हैं । भूषन भनत सिव सरजा की धाक ते वै काँपत रहत चित गहत न चाव हैं ॥ अफजल की अगति सासता की अपगति बहलोल विपति सों डरे उमराव हैं ॥ पक्का मतो करि कै मलिच्छ मनसब छोडि मक्का ही के मिसि उतरत दरियाव हैं ॥ ९६ ॥

भूषण म्हणतो, सर्जा शिवाजी बादशहांचा शासक, शिपायांचा राजा आणि समरांगणांत सिंहाप्रमाणें निर्धास्त वावरणारा आहे; त्यामुळें ते (शहा व शिपाई) थरथरां कांपतात. त्यांच्या ठिकाणीं उत्साह कसा तो रहातच नाहीं. अफजलखान व शायस्तेखान यांची झालेली दुर्गति व बहलोलखानावर कोसळलेली विपत्ति पाहून सरदार लोक भयभीत झाले आहेत. म्लेंच्छांनीं आतां पक्का निश्चय करून आपल्या मनसबी सोडून मक्केस जाण्याच्या मिषानें समुद्रपार होण्यास सुरवात केली आहे. (९६)

साहि तनै सरजा खुमान सलहेरि पास कीन्हों कुरुखेत खीझि मीर अचलन सों। भूषन भनत बलि करी है अरीन धर धरनी पै डारि नभ प्रान दै बलन सों॥ अमर के नाम के बहाने गो अमरपुर चन्दावत लरि सिवराज के दलन सों। कालिका प्रसाद के बहाने ते खवायो महि बाबू उमराव राव पसु के छलन सों॥९७॥

शहाजीपुत्र शिवाजी सर्जानें सालेरी जवळ (मोगलाच्या) धुरंधर सरदारांशीं मोठें घनघोर युद्ध केलें. भूषण म्हणतो, शत्रूंचीं धडें पृथ्वीस आणि प्राण आकाशास बलि दिले. अमरसिंह नांवाचा चन्दावत सरदार शिवाजीच्या सैन्याशीं लढून आपल्या नांवाच्या मिषानें अमरपुरास (वैकुंठास) गेला. कालिकेच्या प्रसादाच्या मिषानें बाबु उमराव आणि इतर कित्येक रावरूपी पशूंचे बलि पृथ्वीस खाऊं घातले. (९७)

## २० उत्प्रेक्षा—लक्षण, दोहा

आन बात को आन मैं जहँ सम्भावन होय।
वस्तु हेतु, फल युत कहत, उत्प्रेक्षा है सोय॥९८॥

एका वस्तूंत अन्य वस्तूची सम्भावना करून वस्तूचा हेतू फलासुद्धां सांगितला जातो तेथें 'उत्प्रेक्षा' अलंकार जाणावा. (९८)

### उदा०—वस्तूत्प्रेक्षा, मालती सवैया

दानव आयो दगा करि जावली दीह भयारो महामद भार्‍यो।
भूषन बाहुबली सरजा तेहि भेंटिबे को निरसंक पधार्‍यो॥
बीछू के घाय गिरे अफजलहि ऊपरही सिवराज निहार्‍यो।
दाबि यों बैठो नरिन्द अरिन्दहि मानो मयन्द गयन्द पछार्‍यो॥९९॥

मदोन्मत्त आणि अतिभयंकर असा अफजलरूपी राक्षस दगा करण्या-साठीं जावळीस आला. भूषण म्हणतो, बाहुबली सर्जा शिवाजी त्या (अफजलखाना)च्या भेटीस निःशंकपणें गेला. विछव्याच्या (वाघनखाच्या)

घावानें घायाळ होऊन पडलेल्या अफजलखानावर, चीत केलेल्या हत्तीवर बसलेल्या सिंहाप्रमाणें, हा नरेंद्र ( शिवाजी ) त्या अरीन्द्रास ( शत्रुश्रेष्ठ अफजलखानास ) दाबून आपण त्यावर बसला. (९९)

साहि तनै सिव साहि निसा मैं निसाँक लियो गढ़सिंह सोहानौ।
राठिवरो को संहार भयो लरिकै सरदार गिन्यो उदैभानौ॥
भूषन यों घमसान भो भूतल घेरत लोथिन मानो मसानौ।
ऊँचे सुछज्ज छटा उच्चटी प्रगटी परभा परभात की मानौ॥१००॥

शहाजीपुत्र शिवाजीनें सुंदर व शोभिवंत असा सिंहगड ( किल्ला ) निःशंकपणें रात्रींच सर केला. राठोडांचा संहार झाला आणि उदयभानू सरदार लढून मरण पावला. भूषण म्हणतो, त्यावेळीं भू-तल प्रेतांनीं भरल्यामुळें स्मशानाप्रमाणें भीषण दिसत होतें. अरुणोदयकालीन प्रभा फांकावी त्याप्रमाणें किल्ल्याच्या उंच सौधावरून ( सज्जांवरून ) उजेड दिसूं लागला. (१००)

उदा० २ रें–मनहरण

दुरजन दार भजि भजि बेसम्हार चढीं उत्तर पहार डरि सिवजी नरिन्द ते। भूषन भनत बिन भूषन बसन, साधे भूखन पियासन हैं नाहन को निन्दते॥ बालक अयाने बाट बीचही बिलाने कुम्हिलाने मुख कोमल अमल अरविन्द ते। दृगजल कज्जल कलित बढ्यो कढ्यो मानो दूजा सोत तरनि तनूजा को कलिन्द ते॥१०१॥

भूषण म्हणतो. त्या नरवीर शिवाजीच्या भीतीनें शत्रुस्त्रिया आपलीं वस्त्रें भूषणें टाकून उपाशींतापाशीं नवऱ्यांच्या निंदा करीत अनिवारपणें धांवून उत्तरेकडील पहाडां-( पर्वतां )वर चढूं लागल्या आहेत. अज्ञान बालकांचीं निर्मळ कमलाप्रमाणें असलेलीं कोमल मुखें कोमेजून गेलीं. मुलें वाट चुकून भलतीकडेच निघून गेलीं; त्यामुळें त्यांच्या मातांच्या काजळ घातलेल्या

डोळ्यांतून अश्रूंचा जो प्रवाह सुरू झाला तो कलिन्द पर्वतापासून निघालेल्या यमुनेचाच दुसरा ओघ आहे कीं काय असें वाटूं लागलें. (१०१)

उदा० ३ रें—दोहा

महाराज सिवराज तव, सुघर धवल धुव किर्त्ति।
छवि छटान सों छुवति सी, छिति अंगन दिग भित्ति ॥१०२॥

हे शिवाजी महाराज, तुमची अढळ आणि उज्ज्वल कीर्ति हेंच एक सुंदरसें घर होय. त्याची प्रभा पृथ्वीरूप अंगणावर आणि दिशारूप भिंतीवर पडली आहे. सारांश, तुमची कीर्ति पृथ्वींत चहूंकडे पसरली आहे. (१०२)

हेतूत्प्रेक्षा २—कवित्त मनहरण

लूट्यो खानदौरा जोरावर सफजंग अरु लूट्यो कारतलबखाँ मनहुँ अमाल है । भूषन भनत लूट्यो पूना में सइस्तखान गढ़न मैं लूट्यो त्यों गढ़ोइन को जाल है ॥ हेरि हेरि कूटि सलहेरि बीच सरदार घेरि घेरि लूट्यो सब कटक कराल है। मानो हय हाथी उमराव करि साथी अवरंग डरि सिवाजी पै भेजत रिसाल है ॥ १०३ ॥

भूषण म्हणतो, खानदौरा, जोरावर सफजंग आणि तलबखां यांस लुटलें पुण्यांत शायस्तेखानास व इतर लहान लहान किल्लेदारांस त्यांच्या किल्ल्यांतून लुटलें. सालेरीच्या युद्धांत निवडक सरदारांस ठोकून काढलें आणि सर्व सैन्यास घेरून लुटलें तेव्हां जणुं हत्ती, घोडे सरदारांबरोबर देऊन औरंगजेब शिवाजीकडे खंडणीच पाठवीत आहे कीं काय असें वाटलें. (१०३)

फलोत्प्रेक्षा ३—मनहरण दंडक

जाहि जात पास सो तौ राखि ना सकत याते तेरे पास अचल सुप्रीति नाधियतु है। भूषन भनत सिवराज तव किर्त्ति सम और की न किर्त्ति कहिबे को काँधियतु है ॥ इन्द्र कौ

अनुज तैं उपेन्द्र अवतार याते तेरो बाहुबल लै सलाह साधि-
यतु है। पायतर आय नित निडर बसायबे को कोट बाँधियतु
मानो पाग बाँधियतु है ॥ १०४ ॥

भूषण म्हणतो, हे शिवराज, तुझ्या कीर्तीप्रमाणें इतरांच्या कीर्तीचें वर्णन करण्यास मन तयार होत नाहीं; कारण बिचारे पर्वत (इंद्राच्या धाकानें) ज्या कोणापाशीं आश्रय मागावयास जात तेथें त्यांस आश्रय मिळेनासा झाल्यामुळें ते तुझ्याजवळ येऊन मोठ्या प्रेमानें स्थिर झाले आहेत (बसले आहेत). तूं इंद्राचा धाकटा भाऊ म्हणजे उपेंद्राचा अवतार आहेस; यामुळें (वडील भावाची) सम्मति घेऊन तुझ्या बाहुबळानें पायाशीं शरण आलेल्यांना नित्य निर्भय राहण्याकरितां कोट (किल्ले) बांधले आहेत; जणुं त्या पर्वतांना पागोटें बांधून त्यांचा गौरव केला आहे. (१०४)

दोहा

दुवन सदन सबके वदन, सिव सिव आठौ याम।
निज बचिबे को जपत जनु, तुरकौ हरकौ नाम ॥ १०५ ॥

शत्रूंच्या घरांतून सर्वांच्या तोंडीं अष्टौप्रहर 'शिव शिव' शब्दाचा उच्चार होत आहे. जणुं तुर्क आत्मरक्षणाकरितां महादेवाच्या नांवाचाच जप करीत आहेत. (१०५)

गम-गुप्तोत्प्रेक्षा ४ (गम्योत्प्रेक्षा)—लक्षण, दोहा

मानो इत्यादिक बचन, आवत नहिं जेहि ठौर।
उत्प्रेक्षा गम गुप्त सो, भूषन कहत अमौर ॥ १०६ ॥

जेथें 'जणुं', 'कांहीं' इत्यादिक पदें येत नाहींत तेथें 'गमगुप्तोत्प्रेक्षा' अलंकार जाणावा. (१०६)

उदा०—मनहरण

देखत उँचाई उदरत पाग, सूधी राह द्योस हू मैं चढैं ते
जे साहस निकेत हैं। सिवजी हुकुम तेरो पाय पैदलन सल-

हेरि परनालो ते वै जीते जनु खेत हैं ॥ सावन भादौं की भारी कुहू की अँध्यारी चढि दुग्ग पर जात मावली दल सचेत हैं। भूषन भनत ताकी बात मैं विचारी तेरे परताप रवि की उज्यारी गढ़ लेत हैं ॥ १०७ ॥

किल्ल्याची उंची पाहूं गेलें असतां पागोटें गळून पडतें, धाडसी लोक फक्त दिवसां व तेही सरळ रस्त्यानें वर चढूं शकतात; पण हे शिवाजी! तुझी आज्ञा होतांच सालेरी आणि पन्हाळगड यांसारखे अवघड किल्ले तुझ्या पायदळानें (सपाट) शेताप्रमाणें जिंकले. तुझें मावळे सैन्य इतकें दक्ष आहे कीं, श्रावणभाद्रपदांतील अमावास्येच्या काळ्याकुट्ट अंधाऱ्या रात्रीं देखील असे किल्ले चढून वर जातें. भूषण म्हणतो, मी या गोष्टीचा विचार केला तेव्हां मला असें आढळून आलें कीं, तें मावळे सैन्य तुझ्या-प्रताप-सूर्याच्या उजेडामुळेंच किल्ले घेऊं शकतें. (१०७)

उदा० २ रें—दोहा

और गढोई नदीनद, सिव गढपाल दर्याव।
दौरि दौरि चहुँ ओर ते, मिलत आनि यहि भाव ॥ १०८ ॥

दुर्गाधिपति शिवाजी हा समुद्राप्रमाणें; व इतर लहान लहान किल्लेदार नदीनदांप्रमाणें होत. नदीनद चहूंकडून धांवत येऊन जसे समुद्रांत मिसळतात तद्वतच इतर किल्लेदार शिवाजीस येऊन मिळाले. (१०८)

## २१ रूपकातिशयोक्ति—लक्षण, दोहा

ज्ञान करत उपमेय को, जहँ केवल उपमान।
रूपकातिशय उक्ति सो, भूषन कहत सुजान ॥ १०९ ॥

जेथें उपमानावरूनच उपमेयाचें ज्ञान होतें तथें 'रूपकातिशयोक्ति' अलंकार जाणावा. (१०९)

उदाहरण—कवित्त मनहरण

बासव से बिसरत विक्रम की कहा चली, बिक्रम लखत बीर बखत-बिलन्द के। जागे तेजवृन्द सिवाजी नरिन्द मस-

नन्द माल मकरन्द कुलचन्द साहिनन्द के॥ भूषन भनत देस देस बैरि नारिन मैं होत अचरज घर घर दुख दंद के। कनकलतानि इन्दु इन्दु माँहिं अरबिन्द, झरे अरबिन्दन ते बुन्द मकरन्द के ॥ ११० ॥

भाग्यवान् वीर शिवाजीचा पराक्रम पाहून इंद्रासारखे स्वतःस विसरले मग विक्रमादित्याची कथा काय? माल मकरन्द कुलाचा (मालोजीच्या घराण्याचा) चंद्र जो शहाजी त्याचा पुत्र सिंहासनाधिष्ठित शिवाजी याचा पराक्रम सदैव जागृत आहे. भूषण म्हणतो ह्या पराक्रमामुळें देशोदेशींच्या शत्रुस्त्रिया अतोनात दुःखित झाल्या आहेत. त्यांच्या सोन्यासारखी कांति असलेल्या शरीरांवर व चंद्रासारख्या मुखांवरून कमळासारख्या नेत्रांतून परागरूपी अश्रूंचा वर्षाव होत आहे. (११०)

## २२ भेदकातिशयोक्ति—लक्षण, दोहा

जेहि थर आनहि भाँति की, बरनत बात कछूक।
भेदकातिसय–उक्ति सो, भूषन कहत अचूक ॥ १११ ॥

एकाद्या वस्तूचें अन्य प्रकारानें जेथें वर्णन केलें जातें तेथें 'भेदकातिशयोक्ति' अलंकार जाणावा. (१११)

उदा०—कवित्त मनहरण

श्रीनगर नयपाल जुमिला के छितिपाल भेजत रिसाल चौरगढ कुही बाज की। मेवार ढुँढार मारवाड और बुंदेल–खंड झारखंड बाँधौ–धनी चाकरी इलाज की ॥ भूषन जे पूरब पछाँह नरनाह ते वै ताकत पनाह दिलीपति सिरताज की। जगत को जैतवार जीत्यो अवरंगजेब न्यारी रीत भूतल निहारी सिवराजकी ॥ ११२ ॥

श्रीनगर (काश्मीर), नेपाळ, मेवाड, जयपूर, बुंदेलखंड, झारखंड, रीवाँ इत्यादि संस्थानांचे राजे महाराजे औरंगजेबास करभार देत. किंबहुना त्याची चाकरी पत्करीत. भूषण म्हणतो, इतकेंच नव्हे तर पूर्वेपासून

पश्चिमेपावेतों जे जे राजे होते ते दिल्लीपतीच्या आश्रयाची वांछा करून होते; पण जग जिंकणाऱ्या ह्या (अलमगीर) औरंगजेबास शिवाजीनें जिंकिलें: शिवाजीची ही निराळीच रीत जगतांत दिसून आली. (११२)

## २३ अक्रमातिशयोक्ति—लक्षण, दोहा

जहाँ हेतु अरु काज मिलि, होत एक ही साथ।
अक्रमातिसय-उक्ति सो, कहि भूषन कविनाथ॥ ११३॥

जेथें कारण आणि कार्य एकत्र होतात तेथें 'अक्रमातिशयोक्ति' अलंकार होतो. (११३)

उदा०—कवित्त मनहरण

उद्धत अपार तव दुंदुभी धुकार साथ लंघै पारावार बाल-वृन्द रिपु गन के। तेरे चतुरंग के तुरंगन के रँगे रज साथ ही उडात रजपुंज हैं परन के॥ दच्छिन के नाथ सिवराज! तेरे हाथ चढ़ैं धनुष के साथ गढ़ कोट दुरजन के। भूषण असीसैं, तोहिं करत कसीसैं पुनि बानन के साथ छूटैं प्रान तुरकन के॥ ११४॥

तुझ्या रणभेरींचा प्रचंड भीषण ध्वनि ऐकतांच शत्रूंचीं कुटुंबें (बायका-मुलें) समुद्रपार होऊं लागतात. तुझ्या चतुरंग सैन्यांतील घोडे धुळीनें भरतांच शत्रूंची राज-श्री उडून जाते. हे दक्षिणाधिपति शिवराज! तुझ्या हातांत धनुष्य येण्याचा अवकाश कीं, शत्रूंचे किल्ले हस्तगत झाले म्हणून समजावें. भूषण म्हणतो, तूं बाण (आकर्ण) ओढतांच (लोक तुला) आशीर्वाद देतात व तुझ्या हातून बाण सुटतांच तिकडे तुर्कांचे प्राण सुटतात. (११४)

## २४ चंचलातिशयोक्ति—लक्षण, दोहा

जहाँ हेतु चरचाहि मैं, काज होत तत्काल।
चंचलातिसय-उक्ति सो, भूषन कहत रसाल॥ ११५॥

कारणाचें वर्णन होत असतांच जेथें कार्य होऊन जातें तेथें 'चंचला-ातिशयोक्ति' अलंकार जाणावा. (११५)

उदा०—दोहा

आयो आयो सुनत ही, सिव सरजा तुव नाँव !
बैरि नारि दृग-जलन सों, बूडि जात अरिगांव ॥ ११६ ॥

हे सर्जा शिवाजी ! तूं 'आलास' असें तुझें नांव ऐकतांच शत्रुस्त्रियांच्या नेत्रांतील अश्रुप्रवाहांनीं शत्रूंचीं गांवें बुडून जातात. (११६)

उदा० २ रें—कवित्त मनहरण

गढ़नेर गढ़ चाँदा भागनेर बीजापुर नृपन की नारी रोय हाथन मलति हैं। करनाट हबस फिरंग हू बिलायत बलख रूम अरि तिय छतियाँ दलति हैं॥ भूषन भनत साहि तनै सिवराज एते मान तव धाक आगे दिसा उबलति हैं। तेरी चमू चलिबे की चरचा चले ते चक्रवर्तिन की चतुरंग चमू बिचलीत है ॥ ११७॥

नगरगड, चांदा, हैद्राबाद, विजापूर येथील राजांच्या स्त्रिया रडून रडून हात चोळतात; तर कर्नाटक, हबसाण व फिरंगाण (फिरंगी-युरोपियनांचा देश ) विलायत (तुर्कस्तान, इराण, अफगाणिस्तान इत्यादि यावनी देश ), बलख, रूम येथील शत्रुस्त्रिया ऊर बडवून घेतात; भूषण म्हणतो, शहाजी पुत्र शिवराज ! ह्याप्रमाणें तुझ्या धाकानें सर्व दिशा गडबडून गेल्या आहेत. तुझ्या सैन्याच्या हालचालीची चर्चा ऐकतांच चक्रवर्ती औरंगजेबाच्या सैन्याची गाळण उडून जाते ( फाटाफूट होते ). (११७)

## २५ अत्यन्तातिशयोक्ति—लक्षण, दोहा

जहाँ हेतु ते प्रथमही, प्रगट होत है काज।
अत्यन्तातिसयोक्ति सो, कहि भूषन कविराज ॥ ११८ ॥

कारणापूर्वींच कार्य प्रकट होतें तेथें 'अत्यंतातिशयोक्ति' अलंकार समजावा. (११८)

उदा०—कवित्त मनहरण

मंगन मनोरथके प्रथमहि दाता तोहिँ कामधेनु, कामतरु सो गनाइयतु है। याते तेरे गुन सब गाय को सकत कवि, बुद्धि अनुसार कछु तऊ गाइयतु है॥ भूषन भनत साहि तनै सिवराज निज बखत बढ़ाय करि तोहि ध्याइयतु है। दीनता को डारि औ अधीनता बिडारि दीह दारिदको मारि तेरे द्वार आइयतु है॥११९॥

तुला कामधेनू, कल्पवृक्ष याप्रमाणें (किंबहुना त्याहूनही अधिक) मानतात; कारण याचकांना त्यांची इच्छा होण्यापूर्वींच तूं देणारा आहेस; भूषण म्हणतो, यामुळें तुझे सर्व गुण कोणता कवि वर्णन करूं शकेल? तरी (कोणी कोणी) यथामति गातातच. हे शहाजीपुत्र शिवराज! आपलें नशीब उघडावें म्हणून कोणी तुझें ध्यान करितात तर कोणी भयंकर गरिबी टाकून, कोणी परवशता सोडून व दारिद्र्य करून तुझ्या दारापाशीं पोंचतात. (११९)

उदा०—२ रें, दोहा

कवि तरुवर सिव सुजसरस, सींचे अचरज मूल।
सुफल होत है प्रथम ही, पीछे प्रगटत फूल॥१२०॥

कविरूप वृक्षांना शिवाजीच्या यशोरूपी पाण्यानें सिंचन केलें असतां (एक नवीनच) आश्चर्य होतें. त्या वृक्षांना अगोदर फळें व नंतर फुलें येतात. (१२०)

## २६ सामान्य विशेष—लक्षण, दोहा

कहिबे जहँ सामान्य है, कहै जु तहाँ विशेष।
सो सामान्य विशेष है, बरनत सुकवि अशेष॥१२१॥

वस्तूचें वर्णन सामान्यत्वें कर्तव्य असतां विशेषेंकरून केलें जातें तेथें 'सामान्य विशेष' अलंकार जाणावा. (१२१)

उदाहरण—दोहा

और नृपति भूषन कहैं, करैं न सुगमौ काज।
साहि तनै सिव सुजस तो, करै कठिनऊ आज॥ १२२॥

भूषण म्हणतो, अत्यंत सोपें असें काम असलें तरी इतर राजे करूं शकत नाहींत; पण हे शहाजीपुत्र शिवराज ! तुझें सुयश कठिणांतलें कठिण काम तात्काल करितें. (१२२)

उदा० २ रें—मालती सवैया

जीत लई वसुधा सिगरी घमसान घमंडकै बीरन हू की।
भूषन भौंसिला छीन लई जगती उमराव अमीरन हू की॥
साहि तनै सिवराज की धाकनि छूटि गई धृति धीरन हू की।
मीरन के उर पीर बढी यों जु भूलि गई सुधि पीरन हू की॥१२३॥

भूषण म्हणतो, शिवाजीनें मोठमोठ्या वीरांशीं लढून सर्व पृथ्वी जिंकून घेतली; आणि त्यांचा (वीरांचा) अभिमान देखील नाहींसा केला. ह्या भोसल्यानें सर्व अमीरउमरावांचीं (जगती) संस्थानें हिसकावून घेतलीं. शहाजी पुत्र शिवाजीच्या धाकानें मोठमोठ्या धैर्यशाली पुरुषाचें धैर्य गळून गेलें. (सर्व) सरदारांचीं मनें इतकीं दुःखित होऊन गेलीं आहेत कीं, त्यांना आपल्या पीरां-पैगंबरांचें देखील स्मरण राहिलें नाहीं. (१२३)

२७ तुल्ययोगिता—लक्षण, दोहा

तुल्य जोगिता तहँ धरम, जहँ बरन्यन को एक।
कहूँ अवरन्यन को कहत, भूषन बरनि विवेक॥ १२४॥

अनेक उपमेयें आणि उपमान यांचा एकच धर्म जेथें सांगितला जातो तेथें 'तुल्ययोगिता' अलंकार जाणावा. (१२४)

मनहरण

चढ़त तुरंग चतुरंग साजि सिवराज चढ़त प्रताप दिन दिन अति अंग मैं। भूषन चढ़त मरहट्टन के चित्त चाव खग्ग

खुलि चढत हैं अरिनके अंग मैं॥ भौंसिलाके हाथ गढ़ कोट हैं चढत अरि जोट हैं चढ़त एक मेरु गिरि सृंग मैं। तुरकान गन व्योमयान हैं चढ़त बिनुमान है चढ़त बद्‌रंग अवरंग मैं॥

चतुरंग सैन्य सज्ज करून शिवराज घोड्यावर स्वार होतांच त्याचा प्रताप दिवसेंदिवस (समरंगणांत) वाढतो आहे; भूषण म्हणतो, (इकडे) मराठ्यांच्या मनांत उत्साह वाढूं लागतो, (तों तिकडे) उपसलेल्या तरवारी शत्रूच्या छातींत घुसत आहेत. भोसल्याचे हातीं (एकामागून एक) किल्ले येऊं लागले (वाढूं लागले), तर तिकडे शत्रूंच्या टोळ्या एकत्र होऊन मेरुपर्वताच्या शिखरावर चढूं लागल्या. तुर्कांचे समुदाय (युद्धांत मरण मिळाल्यामुळें) विमानांत बसून आकाशमार्गें जात आहेत (तों इकडे) अवमान झाल्यामुळें अवरंगजेब निस्तेज होत आहे. (१२५)

उदा० २ रें—दोहा

सिव सरजा भारी भुजन, भुव भरु धर्‍यो सभाग।
भूषन अब निहचिंत है, सेसनाग दिग नाग॥ १२६॥

भूषण म्हणतो, भाग्यवान् सर्जा शिवाजीच्या बाहूंनीं पृथ्वीचा भार उचलला आहे, त्यामुळें, शेष आणि दिग्गज हे निश्चिंत झाले आहेत. (१२६)

२७ द्वितीय लक्षण रें—दोहा

हित अनहित को एक सो, जहँ बरनत व्यवहार।
तुल्यजोगिता और सो, भूषन ग्रन्थ विचार॥ १२७॥

हित आणि अनहित यांचें जेथें समानत्व दाखविलें जातें तेथें 'तुल्य-योगिता' अलंकार जाणावा (हें दुसरें लक्षण होय). (१२७)

गुनन सों इनहूँ को बाँधि लाइयतु पुनि गुनन से उनहूँ को बाँधि लाइयतु है। पाय गहि इनहूँ को रोज ध्याइयतु अरु पाय गहि उनहूँ को रोज ध्याइयतु है॥ भूषन भनत महाराज सिवराज रस रोस तो हिये मैं एक भाँति

पाइयतु है। दोहाई कहे ते कवि लोग ज्याइयतु अरु दोहाई कहे ते अरि लोग ज्याइयतु है ॥ १२८ ॥

हे शिवराज! तुम्ही आपल्या सद्गुणांनीं यांना (सज्जनांना) बद्ध करिता, तर त्यांना (शत्रूंना) दोरांनीं बांधून आणता. यांचे (सज्जनांचे) पाय धरून रोज ध्यान करता, तर त्यांना (शत्रूंना) शोधून पकडून आणता; भूषण म्हणतो, हे शिवाजी महाराज! तुमच्या ठिकाणीं स्नेह आणि क्रोध हीं दोन्ही एक सारखींच दिसून येतात. दोहाई (कविता) म्हणणारांना (कवींना) वांचविता (आश्रय देता) आणि दुहाई (शरण) म्हणतांच शत्रूंना वांचविता. (१२८)

## २८ दीपक—लक्षण, दोहा

वर्न्य अवर्न्यन को धरम, जहँ बरनत है एक।
दीपक ताको कहत हैं, भूषन सुकवि विवेक ॥ १२९ ॥

उपमेय उपमानांचा एकच धर्म जेथें वर्णन केला जातो, तेथें 'दीपक' अलंकार जाणावा. (१२९)

### उदा०—मालती सवैया

कामिनि कंत सों जामिनि चन्द सों दामिनि पावस मेघ घटा सों। कीरति दान सों सूरति ज्ञान सों प्रीति बड़ी सनमान महा सों ॥ भूषन भूषन सों तरुनी नलिनी नव पूषन देव प्रभा सों। जाहिर चारिहु ओर जहान लसै हिन्दुवान खुमान सिवा सों ॥ १३० ॥

भूषण म्हणतो, ज्याप्रमाणें स्त्री पतीच्या योगानें, रात्र चंद्रानें, बीज वर्षाकालीन मेघपटलानें, कीर्ति दानानें, रूप (किंवा श्रुति) ज्ञानानें, प्रीति सन्मानानें, तरुणी भूषणानें, कमलिनी सूर्याच्या नवप्रभेनें जशी शोभते, त्याप्रमाणें जगांत (हा) हिंदूंचा समुदाय खुमान (आयुष्मान्) शिवाजीमुळें चहूंकडे शोभत आहे. (१३०)

## २९ दीपकावृत्ति—लक्षण, दोहा

**दीपक पद के अरथ जहँ फिर फिर करत बखान।**
**आवृति दीपक तहँ कहत, भूषण सुकवि सुजान ॥१३१॥**

एकाच अर्थाच्या शब्दांची ( पदांची )जेथें वारंवार आवृत्ति होते, तेथें 'दीपकावृत्ति' अलंकार जाणावा. (१३१)

उदा०—दोहा

**सिव सरजा तव दान को, करि को सकत बखान।**
**बढ़त नदीगन दान-जल उमड़त नद गजदान ॥१३२॥**

हे सर्जा शिवाजी! तुझ्या दानाचें वर्णन कोण करूं शकेल? त्वां जलदान केल्यानें नद्यांना पूर येतो व गजदानानें ( त्याच्या गंडस्थलांतून स्रवणाऱ्या मदानें ) मोठमोठे नद भरून जातात. (१३२)

उदा० २ रें—मालती सवैया

**चक्रवती चकता चतुरंगिनि चारिउ चापि लई दिसि चक्का।**
**भूप दरीन दुरे भनि भूषन एक अनेकन बारिधि नक्का ॥**
**औरँग साहि सौं साहि को नन्द लरो सिव साहि बजाय के डंका।**
**सिंह की सिंह चपेट सहै गजराज सहै गजराज को धक्का ॥१३३॥**

चक्रवर्ती चगताई वंशज औरंगजेबानें आपल्या चतुरंग सैन्यानें चारी दिशा काबीज केल्या, त्यामुळें कित्येक राजे दऱ्याखोऱ्यांतून लपून बसले, तर कित्येक समुद्रपार झाले; भूषण म्हणतो, तरीपण अशा ( दिग्विजयी ) औरंगशहाशीं शहाजी पुत्र शिवाजी डंका वाजवून लढला. सिंहाची चपेट सिंह आणि हत्तीचा धक्का हत्तीच सहन करूं शकतो. (१३३)

उदा० ३ रें—कवित्त मनहरण

**अटल रहे हैं दिग अंतन के भूप धरि रैयति को रूप निज देस पेस करिकै। राना रह्यो अटल बहाना करि चाकरी को बाना तजि भूषन भनत गुन भरि कै॥ हाडा रायठौर**

कछवाहे गौर और रहे अटल चकत्ता को चमाऊ धरि डरि कै। अटल सिवाजी रह्यो दिल्ली को निदरि धीर धरि ऐंड धरि तेग धरि गढ धरिकै॥ १३४॥

देशोदेशींचे राजे आपापले देश औरंगजेबास देऊन व स्वतः त्याची प्रजा बनून निश्चिंत झाले. भूषण म्हणतो, (उदेपूरचा) राणा आपला क्षत्रियत्वाचा बाणा सोडून औरंगजेबाची चाकरी पत्करून सुरक्षित राहिला. हाडा, राठोड, कछवाहे, गौर व आणखी कित्येक राजे औरंगजेबास भिऊन त्याजवर चंवऱ्या ढाळीत स्वस्थ बसले; पण शिवाजी दिल्लीपतीला तुच्छ लेखून धैर्य धारण करून आपला बाणा संभाळून किल्ले हस्तगत करून निरामय झाला. (१३४)

## ३० प्रतिवस्तूपमा—लक्षण, दोहा

वाक्यन को जुग होत जहँ, एकै अरथ समान।
जुदो जुदो करि भाषिए, प्रतिवस्तूपम जान॥ १३५॥

उपमान आणि उपमेय वाक्यांचा निरानिराळ्या शब्दांनीं एकच भाव जाणविला जातो तेथें 'प्रतिवस्तूपमा' अलंकार जाणावा. (१३५)

### उदाहरण—लीलावती छंद

मद जल धरन द्विरद बल राजत, बहुजल धरन जलद छवि साजै। पुहुमि धरन फनिनाथ लसत अति, तेज धरन ग्रीषम रवि छाजै॥ खरग धरन सोभा तहँ राजत, रुचि भूषन गुन धरन समाजै। दिल्ली दलन दक्खिन दिसि थम्भन, ऐंड़ धरन सिवराज विराजै॥ १३६॥

हत्तीचें बळ त्याच्या गंडस्थळांतून मदस्राव होतो तेव्हां शोभतें; मेघ पाण्यानें गच्च भरलेले असतां त्यांची शोभा आहे. पृथ्वी धारण केल्यामुळें शेष आणि प्रखर तेजामुळें ग्रीष्मऋतूंतील सूर्य शोभा पावतो. भूषण म्हणतो, गुणग्राहक समाजांत (शिवाजीचे दरबारांत) खड्ग धारण करणाऱ्याची-

शूराची-शोभा आहे. शिवाजीची शोभा, दिल्लीचें निर्दलन, दक्षिणेचें संरक्षण आणि क्षात्रोचित अभिमान धारण करण्यामुळें आहे. (१३६)

### ३१ दृष्टान्त—लक्षण, दोहा

जुग वाक्यन को अरथ जहँ, प्रतिबिम्बित सो होत।
तहाँ कहत दृष्टान्त हैं, भूषन सुमति उदोत॥ १३७॥

उपमेय आणि उपमान वाक्यांचा अर्थ जेथें बिंब-प्रतिबिंबभावानें जाणविला जातो तेथें 'दृष्टान्त' अलंकार होतो. (१३७)

### उदाहरण—दोहा

शिव औरंगहि जिति सकै, और न राजा राव।
हत्थि मत्थ पर सिंह बिनु, आन न घालै घाव॥ १३८॥
चाहत निरगुन सगुन को, ज्ञानवन्त गुनधीर।
यही भाँति निरगुन गुनिहि, सिवा नेवाजत वीर॥१३९॥

औरंगजेबाला शिवाजीच जिंकूं जाणे; इतर रावराजांची बिशाद नाहीं. हत्तीच्या मस्तकावर सिंहावांचून इतर कोण घाव करूं शकेल? (१३८)

ज्ञानी आणि गुणी पुरुष जसे अवगुणरहित सगुणाची वांछा करितात; तद्वतच वीर शिवाजी अवगुणरहित गुणी जनांवर कृपा करतो. (१३९)

### उदा० २ रें—मालती सवैया

देत तुरी गन गीत सुने बिनु देत करी गन गीत सुनाए।
भूषन भावत भूप न आन जहान खुमान कि कीरति गाए॥
मंगन को भुवपाल घने पै निहाल करै सिवराज रिझाए।
आन ऋतैं बरसै सरसैं उमडैं नदियाँ ऋतु पावस पाए॥१४०॥

शिवाजी गीत ऐकल्याखेरीज; अश्वसमुदाय देतो व गीत ऐकविलें असतां हत्तींचा कळप देतो. भूषण म्हणतो, शिवाजीचें यशोगान केलें असतां भूतलावरील इतर राजांचें गुणगान करावेंसें वाटत नाहीं. याचना करण्यास राजे पुष्कळच आहेत; पण संतुष्ट होऊन इच्छापूर्ति करणारा एक

शिवराजच आहे. अन्य ऋतूंतही पाऊस पडतो; परंतु नद्या भरून जाण्यास वर्षाऋतूच लागतो. (१४०)

## ३२ निदर्शना-लक्षण, दोहा

सदृश वाक्य जुग अरथ को, करिए एक अरोप।
भूषन ताहि निदर्शना, कहत बुद्धि दै ओप ॥१४१॥

दोन सदृश पदांच्या अर्थावरून दोन्ही एकच आहेत असा भाव जेथें जाणविला जातो तेथें 'निदर्शन' अलंकार होतो. (१४१)

उदा०-मालती सवैया

मच्छहु कच्छ मैं कोल नृसिंह मैं बावन मैं भनि भूषन जो है।
जो द्विजराम मैं जो रघुराम मैं जोब कह्यो बलरामहु को है॥
बौद्ध मैं जो अरु जो कलकी महँ बिक्रम हूबे को आगे सुनो है।
साहस भूमि अधार सोई अब श्री सरजा सिवराज मैं सोहै १४२

भूषण म्हणतो, जो (पराक्रम) मच्छ, कच्छ, वराह, नारसिंह, वामन, तसेंच परशराम, रघुराम, बलराम, बौद्ध आणि कलंकी (कलि) ह्या अवतारांत होता व जो पुढें होणार असें ऐकिवांत आहे, तोच भूतलाचा आधार पराक्रम, आतां श्री शिवरायाच्या ठिकाणीं शोभतो आहे. (१४२)

उदा० २ रें-कवित्त मनहरण

कीरति सहित जो प्रताप सरजा मैं वर मारतंड मध्य तेज चाँदनी सो जानी मैं। सोहत उदारता और सीलता खुमान मैं सो कंचन मैं मृदुता सुगंधता बखानी मैं। भूषन कहत सब हिन्दुन को भाग फिरै चढे तें कुमति चकता हू की निसानी मैं। सोहत सुवेस दान कीरति सिवा मैं सोई निरखी अनूप रुचि मोतिन के पानी मैं ॥ १४३ ॥

सरजा शिवाजीचा कीर्तियुक्त पराक्रम चांदण्यासारखा व सूर्यतेजाप्रमाणें, तसेंच त्याच्या ठिकाणीं असलेली उदारता आणि सौजन्य हीं सोन्यांतील

मार्दव आणि सुगंधाप्रमाणें मला वाटतात. भूषण म्हणतो; औरंगजेबाची दुर्बुद्धि डंक्यावर चढली (प्रसिद्ध झाली) तेव्हांपासूनच सर्व हिंदूंचें भाग्य फिरलें. मोत्याच्या पाण्यांत जी अनुपम शोभा आहे तीच शिवाजीच्या दानकीर्तीच्या वेषास साजते. (१४३)

उदा० ३ रें—दोहा

औरन को जो जनम है, सो वाको यक रोज।
औरन को जो राज सो, सिव सरजा की मौज ॥१४४॥

इतरांचा जो सर्व जन्म तो ह्याचा एक दिवस (इतरांनीं जन्मभर खपून केलेलें काम शिवाजीच्या एक दिवसाच्या कामाबरोबर होय). इतरांचें राज्य आणि ह्या सर्जा शिवाजीची मौज सारखीच. (१४४)

साहिन सों रन मँडिबो, कीबो सुकवि निहाल।
सिव सरजा को ख्याल है औरन को जंजाल ॥ १४५ ॥

बादशहाशीं युद्ध मांडणें म्हणजे चांगल्या कवींना संतुष्ट करण्यासारखेंच आहे. सर्जा शिवाजीचा नुसता विचार इतरांना (शत्रूंना) विपत्तिकारक वाटतो. (१४५)

## ३३ व्यतिरेक—लक्षण, दोहा

सम छबिवान दुहून में, जहँ बरनत बढि एक।
भूषन कवि कोविद सबै, ताहि कहत व्यतिरेक ॥१४६॥

समान शोभेच्या दोन वस्तूंपैकीं एकीस जेथें महत्त्व दिलें जातें, तेथें 'व्यतिरेक' अलंकार समजावा. (१४६)

उदाहरण—छप्पय

त्रिभुवन में परसिद्ध एक अरिबल वह खंडिय। यह अनेक अरिबल बिहंडि रन मंडल मंडिय॥ भूषन वह ऋतु एक पुहुमि पानिपहि बढावत। यह छहु ऋतु निसिदिन अपार पानिप सरसावत॥ सिवराज साहि सुव सत्थ नित

हय गज लक्खन संचरइ । यकइ गयन्द यकइ तुरँग किमि सुरपति सरवरि करइ ॥१४७॥

त्रिभुवनांत हें प्रसिद्ध आहे कीं, त्यानें (इंद्रानें) एकाच शत्रूचा (वृत्रासुराचा) नाश केला; पण ह्या (शिवाजी)नें अनेक शत्रूंचा पराभव करून युद्धक्षेत्र शोभिवंत केलें. भूषण म्हणतो, तो (इंद्र) एकाच ऋतूंत पृथ्वीची शोभा वाढवितो; पण हा (शिवाजी) सहाही ऋतूंत रात्रंदिवस तिची शोभा अपार वाढवीत आहे. शहाजी पुत्र शिवाजीच्या बरोबर नेहमीं लाखों हत्ती, घोडे वावरत असतात; मग एकच हत्ती ( ऐरावत ) आणि एकच घोडा (उच्चैश्रवा) बाळगणारा बापडा इंद्र ह्या (शिवाजी)ची साम्यता कशी पावूं शकेल ? (१४७)

उदा० २ रें—कवित्त मनहरण

दारुन दुगुन दुरजोधन ते अवरंग भूषन भनत जग राख्यो छल मढ़ि कै। धरम धरम, बल भीम, पैज अरजुन, नकुल अकिल, सहदेव तेज, चढ़ि कै॥ साहि के सिवाजी गाजी, करयो दिली माँहि चंड पांडवन हू ते पुरुषारथ सुबढि कै। सूने लाख भौन ते कढे वै पांच राति, तैं जु द्योस लाख चौकी ते अकेलो आयो कढ़ि कै ॥ १४८ ॥

भूषण म्हणतो, दुर्योधनापेक्षांही दुप्पट कठोर असलेल्या औरंगजेबानें सर्व जगास कपटानें फसविलें. शून्य लाक्षागृहांतून पांचही पांडव रात्रीचे वेळीं (धर्म आपल्या धर्माचरणाच्या, भीम बळाच्या, अर्जुन क्षात्रोचित बाण्याच्या, नकुल बुद्धीच्या व सहदेव आपल्या तेजाच्या प्रभावानें) सुटून गेले; पण शहाजी पुत्र धर्मवीर शिवाजी ! तूं दिल्लींत पांडवांपेक्षांही अधिक पराक्रम करून भर दिवसां शेंकडों चौक्या (पहारे) ओलांडून एकटा सुटून आलास ! (१४८)

## ३४ सहोक्ति—लक्षण, दोहा

वस्तुन को भासत जहाँ, जन रंजन सह भाव।
ताहि सहोक्ति बखानहिं, जे भूषन कविराव ॥१४९॥

एकाया वस्तूचा भाव जनमनरंजनासह जेथें प्रकट होतो तेथें 'सहोक्ति' अलंकार म्हणतात. (१४९)

उदा०—कवित्त मनहरण

छूट्यो है हुलास आम खास एक संग छूट्यो हरम सरम एक संग बिनु ढंग ही। नैनन ते नीर धीर छूट्यो एक संग छूट्यो सुख रुचि मुख रुचि त्योंही बिन रंग ही ॥ भूषन बखानै सिवराज मरदाने तेरी धाक बिललाने न गहत बल अंग ही। दक्खिन के सूबा पाय दिली के अमीर तजैं उत्तर की आस जीव आस एक संग ही ॥ १५० ॥

बादशहाच्या दरबारांतील आनंद आणि अन्तःपुरांतील (स्त्रियांची) लज्जा एकदम नाहींशी झाली. नेत्रांतून अश्रू व (हृदयांतून) धैर्य एकदम गळालें. तसेंच सुखोपभोग आणि मुखकांति एकदम फिक्की पडली. भूषण म्हणतो, हे मर्द शिवाजी ! तुझ्या धाकानें सर्व आक्रोश करीत फिरत आहेत, अंगांत शक्ति कशी ती रहात नाहीं. दिल्लीच्या अमिरांस दाक्षिणेची सुभेदारी मिळतांच ते उत्तरेची (परत जाण्याची) व जीवाची दोन्ही आशा सोडून देतात. (१५०)

## ३५ विनोक्ति—लक्षण, दोहा

विना कछू जहँ बरनिए, कै हीनो कै नीक।
ताको कहत विनोक्ति हैं, कवि भूषन मति ठीक ॥१५१॥

जेथें एकादी वस्तू दुसऱ्या एकाया वस्तूवांचून हीन अथवा उत्तम समजली जाते तेथें 'विनोक्ति' अलंकार होतो. (१५१)

उदा०—दोहा

**सोभमान जगपर किये, सरजा सिवा खुमान।**
**साहिन सो विनु डर अगड, बिन गुमान को दान ॥१५२॥**

सर्जा शिवाजीनें जगतास शोभायमान अशा दोन गोष्टी केल्या; एक बादशहाचें भय न बाळगतां मानानें राहणें व दुसरी अभिमानरहित दान करणें. (१५२)

उदा० २ रें—मालती सवैया

**को कविराज विभूषन होत विना कवि साहि तनै को कहाए? ।**
**को कविराज सभाजित होत सभा सरजा के विना गुन गाये? ॥**
**को कविराज भुवालन भावत भौंसिला के मन मैं विनु भाये? ॥**
**को कविराज चढ़ै गज वाजि सिवाजी की मौज मही विनु पाए? ॥**

'शिवाजीचा कवि' म्हणविल्यावांचून कोण कवि शिरोमणि होऊं शकेल? सर्जा शिवाजीचें गुणवर्णन केल्यावांचून कोण कवी सभाजित् होईल? भोंसल्याच्या मनाला आवडल्यावांचून कोण कवि राजप्रिय होऊं शकेल? पृथ्वीवर शिवाजीची कृपा संपादन केल्यावांचून कोण कवि हत्तीघोड्यां-वर बसूं शकेल? (१५३)

उदा० ३ रें—कवित्त मनहरण

**बिना लोभ को विवेक बिना भय युद्ध टेक साहिन सों सदा साहि तनै सिरताज के । बिना ही कपट प्रीति बिना ही कलेस जीति बिना ही अनीत रीति लाज के जहाज के ॥ सुकवि समाज बिन अपजस जस भनि भूषन भुसिल भूप गरीब नेवाज के । बिना ही बुराई ओज बिना काज घनी फौज बिना अभिमान मौज राज सिवराज के ॥ १५४ ॥**

शेंहाजी पुत्र शिवाजीची बादशहाशीं निःस्वार्थ बुद्धीनें व निर्भयपणें युद्ध करण्याची नेहमींची रीत आहे. ह्या विनयी शिवाजीचें प्रेम नि-ष्कपट आहे; व तो अनीति न करितां व कष्ट न देतां (शत्रूंस) जिंकितो.

भूषण म्हणतो, ह्या दीनरक्षक भोंसले राजाच्या आश्रयास सत्कवींची सभा आहे. ह्याचें यश निंदारहित, पराक्रम दुष्टतारहित आहे. तसेंच ह्याचे जवळ कारणावांचूनहीं पुष्कळ सैन्य आहे. ह्या शिवाजी राजाचा आनंद देखील अभिमानरहित आहे. (१५४)

उदा० ४ थें—कवित्त मनहरण

कीरति को ताजी करी बाजी चढ़ि लूटि कीन्ही भई सब सेन बिनु बाजी बिजैपुरकी । भूषन भनत भौंसिला भुवाल धाक ही सों धीर धरबी न फौज कुतुब के धुर की ॥ सिंह उदैभान बिन अमर सुजान बिन मान बिन कीन्ही साहिबी त्यौं दिलीसुर कीं । साहि सुव महाबाहु सिवाजी सलाह बिन कौन पातसाह की न पातसाही सुरकी ॥ १५५ ॥

घोड्यावर बसून शिवाजीनें लूटमार केली तेव्हां विजापूरचें सर्व सैन्य अश्वरहित झालें; (किंवा बाजी हरली. अर्थात् पराभव पावलें.) यामुळें शिवाजीच्या कीर्तींत भर पडली. भूषण म्हणतो, भोंसले राजाच्या धाकानेंच कुतुबशहाच्या किल्ल्यांतील फौजेनें दम धरला नाहीं. उदयभान सिंहगडावांचून व अमरसिंह सुजानगडावांचून केला; (अर्थात् सिंहगडचा सुभेदार उदयभानू व सुजानगडचा अमरसिंह हे मारले गेले, व दिल्लीश्वराचें आधिपत्य अपमानित केलें (दिल्लीपतींचें आधिपत्य झुगारून दिलें). शहाजीपुत्र महाबाहू शिवाजीशीं मेळ—तडजोड—न करितां कोणा बादशहाची बादशाही (राज्य) नाश पावली नाहीं? (१५५)

## ३६ समासोक्ति—लक्षण, दोहा

बरनन कीजै आन को, ज्ञान आन को होय ।
समासोक्ति भूषन कहत, कवि कोविद सब कोय ॥ १५६ ॥

जेथें ज्या वस्तूचें वर्णन केलें जातें, आणि बोध निराळ्याच वस्तूचा होतो तेथें 'समासोक्ति' अलंकार होतो. (१५६)

उदा०—दोहा

**बडो डील लखि पील को, सबन तज्यो बन थान ।**
**धनि सरजा तू जगत मैं, ताको हन्यो गुमान ॥ १५७ ॥**

(औरंगजेबरूप) हत्तीचा मोठा डामडौल पाहून सर्वांनीं (अन्य श्वापदांनीं) वनांतील आपलें राहण्याचें ठिकाण सोडलें (किंवा औरंगजेबास पाहून इतर रावराजांनीं आपल्या राजधान्या सोडल्या). पण हे शिवसिंहा! तुझी मात्र धन्य आहे! तूं त्याची घमेंडच जिरविलीस! (१५७)

उदा०—कवित्त मनहरण

**तुही साँच द्विजराज है, तेरी कला प्रमान ।**
**तो पर सिव किरपा करी, जानत सकल जहान ॥ १५८ ॥**

खरा चंद्र तूंच व तुझीच कला खरी आहे. तुझ्यावर महादेवानें कृपा केली हें सर्व जगास माहीत आहे. (१५८)

उदा० २ रें—कवित्त मनहरण

**उत्तर पहार बिधनोल खंडहर झारखंडहु प्रचार चारु केली है बिरद की । गोर गुजरात अरु पूरब पछाँह ठौर जन्तु जंगलीन की बिसती मारि रद की ॥ भूषन जो करत न जाने बिनु घोर सोर भूलि गयो आपनी उँचाई लखे क़द की । खोइयो प्रबल मदगल गजराज, एक सरजा सों बैर कै बड़ाई निज मद की ॥ १५९ ॥**

उत्तरेस हिमालय, दक्षिणेस बिदनूर, पश्चिमेस खंडहर आणि पूर्वेस झारखंड हीं (शिवाजीच्या) सुंदर यशाचीं क्रीडास्थळें आहेत. गोर, गुजरात आणि पूर्व व पश्चिम या बाजूंची रानटी (हत्तींची) वस्ती (शिवाजीनें) नष्ट भ्रष्ट केली. भूषण म्हणतो, (शिव) सिंहाचा डामडौल पाहून (औरंगरूप) हत्ती आपली उंची (आपलें सामर्थ्य) विसरून गेला. इतकेंच नव्हे, त्याला गर्जना देखील करितां येईना. आपल्या शक्तीची घमेंड ह्या (औरंगरूप) मस्त हत्तीनें (शिव) सिंहाशीं वैर करून गमविली. (१५९)

## ३७ परिकर-परिकरांकुर-लक्षण, दोहा

साभिप्राय विशेषननि, भूषन परिकर मान ।
साभिप्राय विशेष्य ते परिकर अंकुर जान ॥ १६० ॥

साभिप्राय विशेषण असतां 'परिकर' व साभिप्राय विशेष्य असतां 'परिकरांकुर' अलंकार होतो. (१६०)

उदा० परिकराचें—कवित्त मनहरण

बचैगा न समुहाने बहलोल खाँ अयाने भूषण बखाने दिल आनि मेरा बरजा । तुझ ते सवाई तेरा भाई सलहेरि पास कैद किया साथ का न कोई वीर गरजा ॥ साहिन के साहि उसी औरँग के लीन्हे गढ़ जिसका तू चाकर औ जिसकी है परजा । साहि का ललन दिली दलका दलन अफ़ज़लका मलन सिवराज आया सरजा ॥ १६१ ॥

भूषण म्हणतो, हे मूर्ख बहलोलखाँ! तूं त्या शिवाजीशीं सामना करून वांचणार नाहींस. मी जो तुझा निषेध करितो आहें तो तूं लक्ष्यांत धर (त्याचा विचार कर). तुझ्यापेक्षां सवाईनें चढ असलेला तुझा भाऊ सालेरी जवळ कैद केला. त्या वेळीं त्याच्याबरोबर असणाऱ्या एकाद्या वीरानेंदेखील त्या (शिवाजी)चा प्रतिकार केला नाहीं. तूं ज्या शाहिन-शाह औरंगजेबाचा चाकर आणि प्रजा आहेस, त्याचे किल्ले ह्या (शिवाजी)नें घेतले. असा तो शहाजीचा लाडका, दिल्लीच्या सैन्याचें पारिपत्य करणारा, अफजलखानाचें मर्दन करणारा, शिवाजी सिंह आला. (म्हणून त्यासमोर तूं उभा राहूं नकोस, वांचणार नाहींस.) (१६१)

[ खालील छंद श्रीमहादेव आणि शिवाजी ह्या उभयतांसही लागू होतो.]

जाहिर जहान जाके धनद समान पेखियतु पासवान यों खुमान चित चाय है। भूषन भनत देखे भूष (ख)न रहत सब आपही सों जात दुख दारिद बिलाय है॥ खीझे ते खलक

माहिं खलभल डारत है रीझे ते पलक माहिं कीन्हे रंक राय है। जंग जुरि अरिन के अंग को अनंग कीबो दीबो सिव साहिब को सहज सुभाय है॥ १६२॥

शिवाजीचें औदार्य असें आहे कीं, त्याच्या आश्रयास राहणारे कुबेरासारखे (धनकनकसम्पन्न) दिसतात. भूषण म्हणतो, त्या (शिवाजी)ला पाहतांच भूक हरपते; व दारिद्र्य आणि दुःख हीं आपोआप लयास जातात. शिवाजी कोपला असतां साऱ्या जगांत खळबळ उडवून देतो व प्रसन्न झाला असतां एका क्षणांत रंकाचा राव करितो. समरांगणांत शत्रूंना (अनंग करणें) मारणें, व (जीव) दान देणें हा त्या शिवाजीचा सहज स्वभाव आहे. (१६२)

उदा० २ रें—दोहा

सूर सिरोमनि सूर कुल सिव सरजा मकरंद।
भूषन क्यों औरँग जितै कुल मलिच्छ कुल चंद॥ १६३॥

शूरश्रेष्ठ सरजा शिवाजी सूर्यकुलाचा मकरन्द आहे. भूषण म्हणतो, मग त्याला (सूर्य-कुलोत्पन्न शिवाजीला) हा म्लेंच्छकुल-चंद्र औरंगजेब कसा जिंकूं शकेल? (१६३)

उदा०—परिकरांकुराचें, दोहा

भूषन भनि सब ही तबहि, जीत्यो हो जुरि जंग।
क्यों जीतै सिवराज सों अब अंधक अवरंग॥ १६४॥

भूषण म्हणतो, (मागें) युद्ध जुंपल्या वेळीं सर्वांना जिंकिलें आहे; मग तो अवरंगरूप अंधक दैत्य आतां शिवरायास कसा जिंकील? (शिवाजीनें-महादेवानें तर मागेंच सर्व दैत्यांना जिकून टाकिलें. मग महादेवानें मारलेला हा औरंगजेबाच्या रूपानें असलेला अंधक दैत्य, शिवाजीस थोडाच जिंकूं शकणार आहे?) (१६४)

## ३८ श्लेष–लक्षण, दोहा

एक वचन मैं होत जहँ बहु अर्थन को ज्ञान।
स्लेस कहत हैं ताहि को भूषन सुकवि सुजान ॥ १६५ ॥

एका शब्दानें जेथें अनेक अर्थांचें ज्ञान होतें, तेथें 'श्लेषालंकार' होतो. (१६५)

[ पुढील छंद श्रीराम व शिवाजी ह्या उभयतांस लागू होतो.]

उदा०–कवित्त मनहरण

सीता संग सोभित सुलच्छन सहाय जाके भूपर भरत नाम भाई नीति चारु है। भूषन भनत कुल सूर कुल भूषन हैं दासरथी सब जाके भुज भुव भारु है॥ अरि लंक तोर जोर जाके संग बानर हैं सिंधुर हैं बाँधे जाके दल को न पारु है। तेगहि कै भेंटै जौन राकस मरद जाने सरजा सिवाजी राम ही को अवतारु है॥ १६६ ॥

भूषण म्हणतो, सीता आणि लक्ष्मण ज्याचे बरोबर शोभत आहेत, भरत नांवाचा ज्याचा साहाय्यकारी भाऊ आहे, व जो सम्पन्न, सूर्यकुलभूषण दशरथाचा पुत्र असून ज्याच्या बाहूंवर सर्व पृथ्वीचा भार आहे, ज्यानें रावणाची लंका नष्टभ्रष्ट केली, ज्याच्याजवळ वानर सैन्य असून ज्यानें सेतु-बन्धन केलें, ज्याच्या दळाचा पार लागत नाहीं व जो राक्षसांचें मर्दन करणेंच जाणतो, अशा त्या श्रीरामाचा शिवाजी हा अवतार आहे.

भूतलावर जो लक्ष्मीनें (संपत्तीनें) शोभित आहे व ज्याचे सद्गुण त्यास सहाय असून त्याची कीर्ति वाढवितात व ज्यास नीति अतिशय आवडते (जो नीतिसम्पन्न आहे); भूषण म्हणतो, जो सूर्यकुलास भूषण असून मोठमोठे बलाढ्य योद्धे ज्याचें दास आहेत, व सर्व पृथ्वीचा भार ज्याचे बाहूंवर आहे, जो शत्रूंची कंबर मोडणारा (पराभव करणारा), ज्याचें बल बरोबर असणाऱ्या बाणांत आहे, ज्याच्या सैन्याची गणती नाहीं, जो मनुष्यजातीच्या शत्रूस तरवारीनें भेटतो (मारतो); असा तो शिवाजी रामाचा अवतार आहे. (१६६)

उदाहरण दुसरें

देखत सरूप को सिहात न मिलन काज जग जीतिबे की जामें रीति छल बल की । जाके पास आवै ताहि निधन करति वेगि भूषन भनत जाकी संगति न फल की ॥ कीरति कामिनी राच्यो सरजा सिवा की एक बस कै सकै न बस करनी सकल की । चंचल सरस एक काहू पै न रहै दारी गनिका समान सुबेदारी दिली दल की ॥ १६७ ॥

(वेश्येचें बाह्य) स्वरूप पाहून कोणाला तिला आलिंगन देण्याची इच्छा होत नाहीं ? कपटाचे बलावर जग जिंकणें हा तिचा (वेश्येचा) व्यवसायच आहे. ती ज्या जवळ जाते त्यास तत्काल निर्धन करून सोडते. भूषण म्हणतो, तिची संगत फलदायी नाहीं. पण शिवाजीवर अनुरक्त असलेली कीर्तिरूप कामिनी मात्र एकट्या शिवाजीच्याच कह्यांत आहे. सर्वांना ती वश करूं शकत नाहीं. (वेश्या) चंचल असल्यामुळें जशी एका जवळ राहत नाहीं, तशी दिल्ली-दलाची सुभेदारी ही कोणा एकाच्या घरांत राहिली नाहीं. (१६७)

३९ अप्रस्तुति प्रशंसा–लक्षण, दोहा

प्रस्तुति लीन्हे होत जहँ, अप्रस्तुति परसंस ।
अप्रस्तुति परसंस सो कहत सुकवि अवतंस ॥ १६८ ॥

एकाद्या वस्तूचें वर्णन स्पष्ट शब्दांनीं न करितां मूळ वस्तुज्ञान होईल अशा अन्य रीतीनें करण्यांत येतें तेथें 'अप्रस्तुत प्रशंसा' अलंकार होतो.(१६८)

उदा०–दोहा

हिन्दुनि सो तुरकिनि कहैं, तुम्हैं सदा सन्तोष ।
नाहिन तुम्हरे पतिन पर, सिव सरजा कर रोष ॥ १६९ ॥

यवन स्त्रिया हिन्दु-स्त्रियांना म्हणतात, बायांनों ! तुम्ही नेहमीं संतुष्ट असतां; (कां असणार नाहीं ? कारण,) तुमच्या नवऱ्यांवर सरजा शिवाजी-चा रोष (कधींच) होत नाहीं. (१६९)

अरितिय भिल्लिनि सों कहैं, घन बन जाय इकन्त।
सिव सरजा सों बैर नहिं, सुखी तिहारे कन्त ॥ १७० ॥

शत्रुस्त्रिया भिल्लिणींस म्हणतात, तुमच्या पतींशीं शिवाजी सर्जाचें वैर नाहीं म्हणून तुम्ही घोर वनांत एकट्या जातां, व तुमचे पतीही सुखांत आहेत. (१७०)

उदा० २ रें—मालती सवैया

काहू पै जात भूषन जे गढ़पाल की मौज निहाल रहे हैं। आवत हैं जु गुनी जन दच्छिन भौंसिला के गुन गीत लहे हैं॥ राजन राव सबै उमराव खुमान की धाक धुके यों कहे हैं। संक नहीं सरजा सिवराज सों आजु दुनी में गुनी निरभे हैं॥ १७१ ॥

शिवाजीच्या कृपेचा आनंद उपभोगणारे इतर कोठेंही जात नाहींत दक्षिणेंत येणाऱ्या गुणी जनांस भोंसल्याचें गुणगान करावयास मिळतें. रावराजे, अमीर उमराव, सर्वच शिवाजीच्या धाकानें घाबरून जाऊन म्हणतात, आजकाल दुनियेंत सर्जा शिवाजीमुळें गुणीजन निर्भय आहेत. (१७१)

४० पर्यायोक्ति—लक्षण, दोहा

बचनन की रचना जहाँ, वर्णनीय पर जानि।
परजायोकति कहत हैं, भूषन ताहि बखानि ॥ १७२ ॥

पदांची रचना जेथें उपमेयपर असते तेथें 'पर्यायोक्ति' अलंकार होतो. (१७२)

उदा०—कवित्त मनहरण

महाराज सिवराज तेरे वैर देखियतु घन वन व्है रहे हरम हबसीन के। भूषन भनत तेरे वैर रामनगर जवारि परबाह

बहे रुधिर नदीन के ॥ सरजा समत्थ वीर तेरे बैर बीजापुर वैरी बैयरनि कर चीन्ह न चुरीन के। तेरे रोस देखियत आगरे दिली में बिन सिन्दुर के बिन्दु मुख इन्दु जमनीन के॥ १७३ ॥

हे शिवराज महाराज! तुमच्या वैरामुळें हबशांचीं अंतःपुरें घोर वनें बनूं लागलीं (ओसाड पडूं लागलीं). भूषण म्हणतो, तसेंच रामनगर जवारि येथें रक्ताच्या नद्यांचे पाट वाहूं लागले. हे समर्थ सरजा शिवाजी! तुमच्या वैमनस्यामुळें विजापुराकडील शत्रुस्त्रियांच्या हातांत (सौभाग्य चिन्ह) कांकणें दिसत नाहींत; इतकेंच नव्हे तर तुमच्या रोषामुळें आग्रा; दिल्ली येथील चंद्रमुखी यवनस्त्रियांचे कपाळीं सिन्दूरबिन्दु (उत्तरेकडील सौभाग्य तिलक) दिसूं लागले आहेत. (मुसलमान स्त्रिया सुरक्षित राहण्याकरितां हिन्दुस्त्रियांप्रमाणें सेंदुराचे टिकले लावूं लागल्या.) (१७३)

## ४१ व्याजस्तुति—लक्षण, दोहा

स्तुति में निन्दा कढ़ैं, निन्दा में स्तुति होय।
व्याजस्तुति ताको कहत, कवि भूषन सब कोय ॥१७४॥

स्तुतींत निन्दा आणि निन्देंत स्तुति जेथें केली जाते तेथें 'व्याजस्तुति' अलंकार होतो. (१७४)

### उदा०—कवित्त मनहरण

पीरी पीरी हुन्ने तुम देत हो मँगाय हमैं सुवरन हम सों परखि करि लेत हो। एक पलही में लाख रूखन सों लेत लोग तुम राजा व्है के लाख दीबे को सचेत हो ॥ भूषन भनत महाराज सिवराज बडे दानी दुनी ऊपर कहाए केहि हेत हौ?। रीझि हँसि हाथी हमैं सब कोऊ देत कहा रीझि हँसि हाथी एक तुमहियै देत हौ ? ॥ १७५ ॥

भूषण म्हणतो, हे शिवाजीमहाराज! तुम्ही दुनियेंत आपणांस मोठें

दानशूर म्हणवून घेतां तें कशामुळें ? आमच्याकडून सुवर्ण पारखून घेतां-चांगल्या चांगल्या कविता म्हणवून घेतां-तेव्हां कुठें पिंवळे होन देतां. तुम्ही राजे असून लाख ( रुपये ) देण्याची सज्जता दाखवितां तर लोक एका क्षणांत झाडांपासून ( कितीतरी ) लाख काढून घेतात. संतुष्ट होऊन आम्हांस हाथी ( हत्ती ) एक तुम्हीच देतां असें नाहीं तर कोणीही खुशींत येऊन हंसून आम्हांस हाथी ( टाळी ) देतात. (१७५)

तू तो रात दिन जग जागत रहत वेऊ जागत रहत रातौ दिन बन रत हैं। भूषन भनत तू विराजै रज भरो वेऊ रज भरे देहिन दरी मैं विचरत हैं ॥ तू तौ सूरगन को विदारि विहरत सूर मंडलै विदारि वेऊ सुर लोक रत हैं। काहे ते सिवाजी गाजी तेरोई सुजस होत तोसों अरिवर सरिवर सी करत हैं ॥ १७६ ॥

भूषण म्हणतो, हे धर्मवीर शिवाजी ! तूंही रात्रंदिवस आपल्या ( प्रासादांत ) जागत राहातोस तर तिकडे ते देखील ( शत्रू ) रानावनांत फिरून रात्री आणि दिवस जागून काढतात. तूं राजश्रीनें शोभतोस तर ते देखील रजश्री ( धुळीनें )नें भरलेल्या शरीरांनीं दऱ्याखोऱ्यांतून फिरताहेत. तूं शूरांच्या समुदायाचें विदारण करीत फिरतोस, तर ते देखील सूर्यमंडलाचा भेद करून देवलोकांत रमत आहेत. अशा प्रकारें तुझे शत्रू तुझ्याशीं आपली तुलना करीत आहेत; तरी तुझीच कीर्ति कां होते समजत नाहीं.

## ४२ आक्षेप—लक्षण, दोहा

पहिले कहिये बात कछु, पुनि ताको प्रतिषेध।
ताहि कहत आच्छेप हैं, भूषन सुकवि सुमेध ॥ १७७ ॥

अगोदर एखाद्या वस्तूचें वर्णन करून पुन्हा तिजविषयीं जेथें निषेध प्रकट केला जातो, तेथें 'आक्षेप' अलंकार होतो. (१७७)

उदा०—मालती सवैया

जाय भिरौ न भिरे बचिहौ भनि भूषन भौंसिला भूप सिवा सों। जाय दरीन दुरौ दरिऔ तजि कै दरियाव लँघो लघुता सों॥ सीछन काज वजीरन को कहै बोल यों एदिल साहि सभा सों। लूटि गयो तौ गयो परनालो सलाह की राह गहौ सरजा सों॥ १७८॥

भूषण म्हणतो, आदिलशहानें आपल्या दरबारांत वजिरांना उद्देशून असे उद्गार काढले कीं, तुम्ही राजा शिवाजी भोंसल्याशीं जाऊन लढा; पण नको, लढाल तर वांचणार नाहीं; दऱ्याखोऱ्यांतून लपून बसणेंच बरें; पण दऱ्याखोऱ्या सोडून गरिबीनें समुद्रपार होणेंच चांगलें. पन्हाळगड हातचा गेला तरी बेहेत्तर, पण त्या सर्जाशीं संधीच करा. (१७८)

'आक्षेपा'चें दुसरें लक्षण—दोहा

जेहि निषेध अभ्यास ही, भनि भूषन सो और।
कहत सकल आच्छेप हैं, जे कविकुल सिरमौर॥ १७९॥

अगोदर एखाद्या वस्तूचा निषेध करून पुन्हा अन्य प्रकारानें तिलाच स्थापन करणें यालाही 'आक्षेप अलंकार' म्हणतात. (१७९)

उदा०—कवित्त मनहरण

पूरब के उत्तर के प्रबल पछाँह हू के सब बादसाहन के गढ़ कोट हरते। भूषन कहैं यों अवरंग सों वजीर जीति लीबे को पुरतगाल सागर उतरते॥ सरजा सिवा पर पठावत मुहीम काज हजरत हम मरिबे को नाहिं डरते। चाकर हैं उजुर कियो न जाय नेक पै कछू दिन उबरते तौ घने काज करते॥ १८०॥

भूषण म्हणतो, औरंगजेबास त्याचे वजीर म्हणतात, आम्ही पूर्व, उत्तर आणि पश्चिमेकडील सर्व बादशहांचे किल्ले हस्तगत करून घेऊं; इतकेंच

नव्हे, तर पोर्तुगाल ( सारखा दूरचा ) देश जिंकण्याकरितां समुद्र उतरून जाऊं. सर्जा शिवाजीशीं लढण्याकरितां आम्हांला पाठवितां. आम्ही बोलून चालून आपले नौकर, कांहीं तरी निमित्त करून आम्ही टाळाटाळी करितों असेंहि नाहीं; किंवा मरणाला आम्ही भितों असेंहि नाहीं. पण हजरत! कांहीं दिवस आम्ही जगलों असतों तर आम्हांला पुष्कळ कामें करतां आलीं असतीं. (१८०)

### ४३ विरोध (द्वितीय विषम)—लक्षण, दोहा

**द्रव्य क्रिया गुन में जहाँ, उपजत काज विरोध।**
**ताको कहत विरोध हैं, भूषन सुकवि सुबोध॥ १८१॥**

द्रव्य, क्रिया आणि गुण ह्यांत जेथें साम्य दिसून येत नाहीं, विरोध असतो, तेथें 'विरोध'अलंकार जाणावा. (१८१)

उदा०—मालती सवैया

**श्री सरजा सिव तो जस सेत सों होत हैं बैरिन के मुँह कारे।**
**भूषन तेरे अरुन्न प्रताप सपेद लखे कुनबा नृप सारे॥**
**साहितनै तव कोप कृसानु ते बैरि गरे सब पानिप वारे।**
**एक अचम्भव होत बड़ो तिन ओंठ गहे अरि जात न जारे॥१८२॥**

हे सर्जा शिवाजी ! तुझ्या शुभ्र व निष्कलंक यशानें शत्रूंचीं तोंडें काळीं होतात. भूषण म्हणतो, तुझ्या प्रतापरूप अरुणानें (लालप्रभेनें) सर्व नृपसमुदाय पांढराफेक (निस्तेज) दिसत आहे.

हे शहाजी पुत्रा! तुझ्या क्रोधाग्नीपुढें सर्व तेजस्वी शत्रू निस्तेज झाले; पण मोठें आश्चर्य हें कीं, दांतीं तृण धरणारे शत्रू तुझ्या क्रोधाग्नीनें जळत नाहींत ! (१८२)

### ४४ विरोधाभास—लक्षण, दोहा

**जहाँ विरोध सो जानिए, साँच विरोध न होय।**
**तहाँ विरोधाभास कहि, बरनत हैं सबकोय॥ १८३॥**

जेथें विरोधाची नुसती जाणीव होते, वस्तुत: विरोध असत नाहीं, तेथें 'विरोधाभास' अलंकार म्हणतात. (१८३)

उदा०— मालती सवैया

दच्छिन नायक एक तुही, भुव भामिनि को अनुकूल व्है भावै।
दीनदयाल न तो सो दुनी पर म्लेच्छ के दीनहिं मारि मिटावै॥
श्री सिवराज भनै कवि भूषन तेरे सरूप को कोउ न पावै।
सूर सुबंस मैं सूर सिरोमनि व्है करि तू कुलचन्द कहावै ॥१८४॥

हे दक्षिणनाथ! एकपत्नीव्रती तूंच ह्या पृथ्वीरूप वधूला आवडतोस. जगांत तुझ्यासारखा दीनदयाल कोणी नाहीं;पण म्लेच्छांना मारून त्यांचा जो दीन (धर्म) त्यास मात्र तूं नष्ट केलास. भूषण म्हणतो, हे श्रीशिवराय! तुझ्या स्वरूपाची बरोबरी कोणी करूं शकत नाहीं. तूं उत्तम सूर्यकुलांत शूर-शिरोमणि होऊनहि (रघु)कुलचंद्रच म्हणवितोस. (१८४)

## ४५ विभावना—लक्षण, दोहा

भयो काज बिन हेतुही, बरनत हैं जेहि ठौर।
तहँ विभावना होत है, कवि भूषन सिरमौर ॥ १८५॥

कारणावांचून होणाऱ्या कार्याचें जेथें वर्णन केलें जातें, तेथें 'विभावना' अलंकार होतो. (१८५)

उदा०—मालती सवैया

बीर बड़े बड़े मीर पटान खरो रजपूतन को गन भारो।
भूषन आय तहाँ सिवराज लयो हरि औरंगजेब को गारो॥
दीन्हों कुज्वाब दिलीपति को अरु कीन्हों वजीरन को मुँह कारो।
नायो न माथहि दक्खिननाथ न साथ मैं फौज न हाथ हथ्यारो॥

भूषण म्हणतो, मोठमोठ्या शूरवीर पठाण आणि रजपूत सरदारांच्या झुंडी उभ्या असतां तेथें शिवरायानें येऊन औरंगजेबाचा गर्व हरण केला; दिलीपतीला दुरुत्तरें करून वजिरांचीं तोंडें काळीं ठिकर पाडलीं; आणि

बरोबर फौजफाटा व हातांत हत्यार नसतांहि ह्या दक्षिणनाथानें त्या औरंगजेबापुढें मान वाकविली नाहीं. (१८६)

उदा० २ रें—दोहा

साहितनै सिवराज की, सहज टेव यह ऐन ।
अनरीझे दारिद हरै, अन खीझे अरि सैन ॥१८७॥

शहाजीपुत्र शिवरायाचा हा सहज स्वभाव आहे कीं, प्रसन्न न होतां दारिद्र्य हरण करतो व न रागावतां शत्रुसैन्याचा पराजय करितो. (प्रसन्न झाल्यावर वा रागावल्यावर काय करील कोण जाणे!) (१८७)

दुसरी विभावना—लक्षण, दोहा

जहँा हेतु पूरन नहीं, उपजत है पर काज ।
कै अहेतु ते और यों, द्वै विभावना साज ॥ १८८ ॥

जेथें अपूर्ण कारणापासून कार्योत्पत्ति होते तेथें 'हेतु विभावना'; व जेथें कारणावांचून कार्योत्पत्ति होते तेथें 'अहेतु विभावना' अलंकार जाणावा. (१८८)

उदा०—कवित्त मनहरण

दच्छिन को दाबि करि बैठो है सइस्तखान पूना मांहिँ दूना करि जोर करवार को । हिन्दुवान खम्भ गढ़पति दल-थम्भ भनि भूषन भरैया कियो सुजस अपार को ॥ मनस-बदार चौकीदारन गंजाय महलन में मचाय महाभारत के भार को । तो सो को सिवाजी जेहि दो सौ आदमी सों जीत्यो जंग सरदार सौ हजार असवार को ॥ १८९ ॥

शायस्ताखान दक्षिण हस्तगत करून पुण्यास ठाणें देऊन बसला; तेव्हां हिन्दूच्या आधारस्तंभ व सेनानायक अशा शिवाजी किल्लेदाराच्या तरवारीस दुप्पट जोर चढला; व त्यानें त्या वेळीं अपार सुकीर्ति मिळविली. (ती अशी) मोठमोठ्या मनसबदारांस व चौकीदारांस जखमी करून

महालांत शिरून शिवाजीनें तेथेंच महाभारत (युद्ध) करण्यास सुरवात केली! भूषण म्हणतो, हे शिवाजी! तुझ्यासारखा पराक्रमी कोण आहे? ज्यानें फक्त दोनशें मनुष्यांनिशीं लाख स्वार असणाऱ्या सरदारास जिंकिलें! (१८९)

उदा०—कवित्त मनहरण

ता दिन अखिल खलभलैं खल खलक हैं जा दिन सिवाजी गाजी नेक करखत है। सुनत नगारन अगार तजि अरिन की दारगन भाजत न बार परखत है॥ छूटे बार बार छूटे बारन ते लाल देखि भूषन सुकवि बरनत हरखत है। क्यों न उतपात होहिँ बैरिन के झुण्डन में कारे घन उमडि अँगारे बरखत हैं॥ १९०॥

ज्या दिवशीं धर्मवीर शिवाजी किंचित् क्रुद्ध होतो त्या दिवशीं जगांतील सर्व दुष्टांची दाणादाण होऊन जाते. (शिवाजीच्या) नगाऱ्यांचा आवाज ऐकतांच शत्रुस्त्रिया कुंपणें न पाहतां पळत सुटतात. भूषण म्हणतो, वारंवार होणाऱ्या तोफांच्या बारांनीं त्यांच्या केशपाशांतून गळणाऱ्या लालांचें वर्णन करण्यास कवींना मोठा आनंद होतो. काळ्याकुट्ट मेघांतून अग्निवर्षाव होत असलेला पाहून शत्रुसैन्यांत उत्पात कां होणार नाहींत? (१९०)

विभावनेचा आणखी एक प्रकार—दोहा

जहाँ प्रगट भूषन भनत, हेतु काज ते होय।
सो विभावना औरऊ, कहत सयाने लोय॥ १९१॥

कार्यापासून कारणाची उत्पत्ति जेथें वर्णिली जाते तोहि एक विभावनेचाच प्रकार होय. असें शहाणे लोक म्हणतात. (१९१)

अचरज भूषन मन बढ्यो, श्री सिवराज खुमान।
तव कृपान धुव धूम ते, भयो प्रताप कृसान॥ १९२॥

भूषण म्हणतो, हे आयुष्मान् शिवराज! तुझ्या कृपाणरूप धुरापासून प्रतापरूप अग्नि उत्पन्न झालेला पाहून मला मोठें आश्चर्य वाटलें. (१९२)

उदा०—कवित्त मनहरण.

साहि तनै सिव! तेरो सुनत पुनीत नाम धाम धाम सब ही को पातक कटत है। तेरो जस काज आज सरजा निहारी कवि मन भोज विक्रम कथा ते उचटत है॥ भूषन भनत तेरो दान संकलप जल अचरज सकल मही मैं लपटत है। और नदी नदन ते कोकनद होत तेरो कर कोकनद नदी नद प्रगटत है॥ १९३॥

शहाजी पुत्र शिवराज! तुझे पवित्र नांव ऐकतांच ठिकठिकाणच्या सर्व लोकांचें पातक नाहींसें होतें. हे सरजा! आज तुझ्या यशाचा विचार केला असतां कवींचें मन भोज विक्रमासारख्यांच्या कथांतून उच्चाटण पावतें. भूषण म्हणतो, तुझ्या दानाच्या संकल्पोदकानें सर्व पृथ्वीस आश्चर्यचकित केलें आहे. कारण, इतर नदीनदांतून कमलें उत्पन्न होतात; पण तुझ्या हस्तकमळापासून (संकल्पजलानें) नदीनदच उत्पन्न होतात. (१९३)

४६ विशेषोक्ति—लक्षण, दोहा

जहाँ हेतु समरथ भयहु, प्रगट होत नहिं काज।
तहाँ बिसेसोकति कहत, भूषन कवि सिरताज॥ १९४॥

कारण समर्थ असूनहि जेथें कार्योत्पत्ति होत नाहीं तेथें 'विशेषोक्ति' अलंकार समजावा. (१९४)

उदा०—मालती सवैया

दै दस पाँच रुपैयन को जग कोऊ नरेस उदार कहायो।
कोटिन दान सिवा सरजा के सिपाहिन साहिन को बिचलायो॥
भूषन कोऊ गरीबन सौं भिरि भीमहुँ ते बलवन्त गनायो।
दौलति इन्द्र समान बढ़ी पै खुमान के नेक गुमान न आयो॥१९५॥

दहापांच रुपये देऊन एकादा राजा जगांत आपणास उदार म्हणवून घेईल; पण कोट्यवधि रुपयांचें, सर्जा शिवाजीनें, दान करून शिपायांस व

बादशहांस भांबावून सोडलें ( बादशहांच्या शिपायांस दान देऊन बादशहापासून त्यांचीं तोंडें फिरविलीं; अर्थात् आपलेसें केलें ). तरी पण त्यास उदार म्हणवून घेण्याची इच्छा झाली नाहीं. भूषण म्हणतो, गरिबांशीं झगडून कोणी आपणास भीमापेक्षां अधिक बलवान समजतो (पण, आमच्या शिवाजीचें तसें नाहीं. ); इंद्रासारखी संपत्ति वाढली तरी गर्वाचा लवलेशहि त्या ( शिवाजी )च्या ठिकाणीं उत्पन्न झाला नाहीं ! (१९५)

## ४७ असंभव—लक्षण, दोहा

अन हूबे की बात कछु, प्रगट भई सी जानि ।
तहाँ असम्भव बरनिए, सोई नाम बखानि ॥१९६॥

न होणारी वस्तू जेथें प्रगट झाल्यासारखी वाटते तेथें 'असंभव' अलंकार जाणावा. (१९६)

उदा०—दोहा

औरंग यों पछितात मैं, करतो जतन अनेक ।
सिवा लेइगो दुरग सब, को जानै निसि एक ॥१९७॥

औरंगजेब दुःखित होऊन म्हणतो, मी अनेक प्रयत्न करून किल्ल्यांचें संरक्षण करितों आहें, पण शिवाजी हे सर्व किल्ले एकाद्या रात्रीं येऊन जिंकितो किं काय कोण जाणे ? (१९७)

उदा० २ रें—कवित्त मनहरण

जसन के रोज यों जलूस गहि बैठो जोब इन्द्र आवै सोऊ लागै औरंग की परजा । भूषन भनत तहाँ सरजा सिवाजी गाजी तिनको तुजुक देखि नेकहू न लरजा ॥ ठान्यो न सलाम भान्यो साहि को इलाम धूम धाम कै न मान्यो रामसिंहहू को बरजा ॥ जासों बैर करि भूप बचै न दिगन्त ताके दन्त तोरि तखत तरे ते आयो सरजा ॥१९८॥

एका धार्मिक उत्सवाचे प्रसंगीं औरंगजेब अशा राजैश्वर्यानें बसला होता कीं, त्या वेळीं इंद्र उतरून आला असता तर तो देखील औरंगजेबाची

प्रजाच शोभला असता. भूषण म्हणतो, पण तशा ठिकाणीं देखील सर्जा शिवाजी, त्याचें (औरंगजेबाचें) तें राजवैभव पाहून यत्किंचित् डगमगला नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या शिवाजीनें बादशहास सलाम सुद्धां केला नाहीं व त्याचें म्हणणें ऐकिलें नाहीं. रामसिंहानें असें न करण्याबद्दल सांगून पाहिलें. ज्या ( औरंगजेबा )शीं वैर केलें असतां जो देशोदेशींच्या राजांचे दांत पाडीत असे त्या ( औरंगजेबा ) च्या सिंहासनाखालूनच तो सरजा ( शिवाजी ) आला. (१९८)

## ४८ असंगति ( प्रथम )—लक्षण, दोहा

हेतु अनत ही होय जहँ, काज अनत ही होय ।
ताहि असंगति कहत हैं, भूषन सुमति समोय ॥१९९॥

कारण निराळें व कार्य निराळें असा भाव जेथें वर्णिला जातो, तेथें 'असंगति' अलंकार होतो. (१९९)

उदा०—कवित्त मनहरण

महाराज सिवराज चढ़त तुरंग पर ग्रीवा जात नै करि गनीम अतिबल की । भूषन चलत सरजा की सैन भूमि पर छाती दरकत है खरी अखिल खल की ॥ कियो दौरि घाव उमरावन अमीरन पै गई कटि नाक सिगरेई दिली दल की । सूरत जराई कियो दाह पातसाह उर स्याही जाय सब पात-साही मुख झलकी ॥ २०० ॥

शिवाजी महाराज घोड्यावर बसतांच अतिबलाढ्य अशा शत्रूची मान वाकूं लागते. भूषण म्हणतो, सरजा (शिवाजी)चें सैन्य भूमीवरून चाललें असतां सर्व दुष्टांच्या छात्या फाटून जातात. दिल्ली-दळावर चाल करून अमीरउमरावांवर घाव केल्यामुळें दिल्ली-सेनेचें नाक कापलें गेलें. सुरत शहर (इकडे) जाळल्यामुळें (तिकडे) बादशहाच्या उरांत दाह होऊं लागला व तोंडास काळोखी लागली. (२००)

## असंगति ( द्वितीय )–लक्षण, दोहा

आन ठौर करनीय सो, करै और ही ठौर ॥
ताहि असंगति और कवि, भूषन कहत सगौर ॥ २०१ ॥

एकाद्या ठिकाणीं कर्तव्य असलेलें काम भलत्याच ठिकाणीं ( दुसऱ्या कोठें ) घेलें असें वर्णन जेथें केलें जातें, तेथें हि 'असंगति' हा अलंकार होतो. (२०१)

उदा०—मनहरण दंडक

भूपति सिवाजी तेरी धाक सों सिपाहिन के राजा पातसाहिन के मन ते अहं गली। भौंसिला अभंग तू तौ जुरतो जहाँई जंग तेरी एक फते होत मानो सदा संग ली॥ साहि के सपूत पुहुमी के परहूत कवि भूषन भनत तेरी खरगउ दंगली। सत्रुन की सुकुमारी थहरानी सुन्दरं औ सत्रु के अगारन मैं राखे जंतु जंगली ॥ २०२ ॥

हे शिवाजी भूपाळ ! तुझ्या धाकानें शिपाई, राजे आणि बादशहा यांचा अहंकार पार गळून गेला. हे भोसलेराजा ! तूं तर नेहमीं अभंगच आहेस. जेथें जेथें म्हणून युद्ध जुंपलें जातें तेथें तेथें तुला यश हें ठेविलेलेंच असतें. जणों काय, यश हें नेहमीं जवळच बाळगिलेलें आहे. कवि भूषण म्हणतो, हे शहाजी सुपुत्र ! तुम्ही पृथ्वीवरील इंद्र आहां, तुमची तरवार मुळीं विजयी ( पैज जिंकणारी, ) आहे. ह्या तुमच्या तरवारीस पाहून शत्रूंच्या सुकुमार व सुंदर स्त्रिया थरथर कांपतात. तुम्हीं (ह्या तरवारीचे जोरावरच) शत्रूंच्या (भव्य) वाड्यांतून रानटी श्वापदें ठेविलीं ( अर्थात् शत्रूंचे वाडे ओसाड पाडले ). (२०२)

## असंगति ( तृतीय)–लक्षण, दोहा

करन लगै औरै कछु, करै औरई काज ।
तहाँ असंगति होत है, कहि भूषन कविराज ॥ २०३ ॥

एकादें कार्य करीत असतां दुसरेंच करण्यांत येतें तेथेंहि 'असंगति' अलंकार होतो. (२०३)

उदा०—मालती सवैया

साहि तनै सरजा सिव के गुन नेकहु भाषि सक्यो न प्रबीनो। उद्यत होत कछू करिबे को करै कछु बीर महारस भीनो॥ ह्याँ ते गयो चकतै सुख देन को गोसलखाने गयो दुख दीनो। जाय दिली दरगाह सुसाह को भूषन बैरि बनाय ही लीनो॥ २०४॥

शहाजी पुत्र शिवाजीच्या एकाद्या गुणाचें वर्णन निपुण कवि देखील करूं शकणार नाहीं. वीररसानें भरलेला तो शिवराज एकादें काम करण्यास प्रवृत्त होतो; पण तें (हातांतील काम) सोडून, करतो भलतेंच. येथून औरंगजेबास सुख देण्याकरितां म्हणून गेला व तेथें स्नान-गृहाशीं जाऊन त्यास त्रास दिला. भूषण म्हणतो, दिल्ली दरबारांत जाऊन त्या बादशहाला (औरंगजेबाला) ह्यानें (शिवाजीनें) शेवटीं आपला शत्रू केला. (२०४)

## ४९ विषम—लक्षण, दोहा

कहाँ बात यह कहँ वहै, यों जहँ करत बखान।
तहाँ विषम भूषन कहत, भूषन सुकवि सुजान॥ २०५॥

'कुठें हें आणि कुठें तें' असें वर्णन जेथें करण्यांत येतें तेथें 'विषम' अलंकार जाणावा. (२०५)

उदा०—मालती सवैया

जावलि बार सिंगारपुरी औ जवारि को राम के नैरि को गाजी। भूषन भौंसिला भूपति ते सब दूरि किए करि कीरति ताजी॥ बैर कियो सिवजी सों खवास खाँ डौंड़ियै सैन बिजैपुर बाजी। बापुरो एदिल साहि कहाँ कहाँ दिल्ली को दामनगीर सिवाजी?॥ २०६॥

ले परनालो सिवा सरजा करनाटक लौं सब देस बिगूँचे ।
बैरिन के भगे बालक वृन्द कहै कवि भूषन दूरि पहूँचे ॥
नाँघत नाँघत घोर घने बन हारि परे यों कटे मनो कूँचे ।
राजकुमार कहाँ सुकुमार कहाँ बिकरार पहार वे ऊँचे ॥ २०७ ॥

ह्या भोंसले राजानें नवीन कीर्ति संपादन केली. भूषण म्हणतो, खवास-खानानें शिवाजीशीं वैर मांडलें; पण त्याच्या विजापुरी सैन्यावर डंका वाजवून शिवाजीनें विजय मिळविला. कुठें बिचारा आदिलशहा आणि कुठें तो दिल्लीपतीशीं स्पर्धा करणारा शिवाजी ! पन्हाळगड घेतल्यानंतर शिवाजीनें कर्नाटकपर्यंतचा सर्व देश काबीज केला. भूषण म्हणतो, शत्रूंच्या पळालेल्या मुलांचा समुदाय दूरवर जाऊन पोहोंचला. घोर वनें ओलांडतां ओलांडतां पायांचे टांके ढिले झाल्यामुळें बिचारीं थकून गेलीं. कुठें हे नाजूक सुकुमार राजकुमार व कुठें ते अक्राळविक्राळ दुर्गम पर्वत. (२०६,२०७)

## ५० सम—लक्षण, दोहा

जहाँ दुहूँ अनुरूप को करिए उचित बखान ।
सम भूषन तासों कहत भूषन सकल सुजान ॥ २०८ ॥

दोन समान वस्तूंचें ( उपमान उपमेयांचें ) यथायोग्य वर्णन केलें जातें तेथें 'सम' अलंकार जाणावा. (२०८)

उदा०—मालती सवैया

पंच हजारिन बीच खड़ा किया मैं उसका कुछ भेद न पाया ।
भूषन यों कहि औरंगजेब उजीरन सों बेहिसाब रिसाया ॥
कम्मर की न कटारी दई इसलाम ने गोसलखाना बचाया ।
जोर सिवा करता अनरत्थ भली भई हत्थ हथ्यार न आया ॥२०९॥

भूषण म्हणतो, औरंगजेब आपल्या वजिरांस म्हणाला 'पांच हजारी सरदारांत उभें केलें यामुळें तो ( शिवाजी ) अतिशय रागावला; यांतील मर्म मला कांहीं समजलें नाहीं. ( शिवाजीचा संतप्त चेहरा पाहून ) त्या

मुसलमानानें ( औरंगजेबानें ) स्नान-गृहाचा आश्रय केला. कमरेची कट्यारहि दिली नाहीं. बरें झालें, ह्या वेळीं शिवाजीच्या हातांत हत्यार नव्हतें; नाहींतर त्यानें भयंकर अनर्थ केला असता! (२०९)

उदा०—२ रें, दोहा

कछु न भयो केतो गयो, हाऱ्यो सकल सिपाह।
भली करै सिवराज सौं, औरंग करै सलाह॥ २१०॥

कित्येक शिपाई गेले (खपले); कित्येक हरले, पण त्या शिवाजीचें कांहीं-एक झालें नाहीं; औरंगजेबानें शिवाजीशीं तडजोड करून घेतली म्हणून बरें झालें. (२१०)

### ५१ विचित्र—लक्षण, दोहा

जहाँ करत है जतन फल, चित्त चाहि विपरीत।
भूषण ताहि विचित्र कहि, बरनत सुकवि विनीत॥ २११॥

जेथें प्रयत्न एक प्रकारचा व फलाची अपेक्षा निराळ्याच प्रकारची केली जाते तेथें 'विचित्र' अलंकार होतो. (२११)

उदा०—दोहा

तैं जयसिंहहिं गढ़ दिये, सिव सरजा जस हेत।
लीन्हे कैयो बरस मैं, बार न लागी देत॥ २१२॥

हे सर्जा शिवाजी! त्वां जयसिंहाला आपल्या कीर्तीसाठीं म्हणून किल्ले दिलेस. कारण, हे किल्ले घेण्याला तुला कैक वर्षें लागलीं, पण देण्याला मात्र कांहींच वेळ लागला नाहीं. (२१२)

उदा० २ रें—कवित्त मनहरण

बेदर कल्यान दै परेंड़ा आदि कोट साहि एदिल गँवाय है नवाय निज सीस को। भूषन भनत भागनगरी कुतुब-साई दै करि गँवायो रामगिरि से गिरीस को॥ भौंसिला भुवाल साहि तनै गढ़पाल दिन दोऊ ना लगाए गढ़ लेत

पँचतीस को। सरजा सिवाजी जयसाह मिरजा को लीने सौगुनी बड़ाई गढ़ दीन्हे हैं दिलीस को ॥ २१३ ॥

आदिलशहानें शरण जाऊन बेदर, कल्याण, परांडा इत्यादि किल्ले देऊन टाकले; तसेंच, कुतुबशहानें भागानगर देऊन रामगिरीसारखा पहाडी प्रदेशहि गमावला. भूषण म्हणतो, हे शहाजीपुत्र शिवाजी! पसतीस किल्ले घेण्याला तुम्हांला दोन दिवसदेखील लागले नाहींत, पण शतपट कीर्ति मिळविण्याकरितां दिल्लीश्वरासाठीं म्हणून हे किल्ले तुम्ही जयसिंह मिर्जाला दिले. (२१३)

## ५२ प्रहर्षण—लक्षण, दोहा

जहँ मन वाँछित अरथ ते, प्रापीत कछु अधिकाय।
तहाँ प्रहरषन कहत हैं, भूषन जे कविराय ॥ २१४ ॥

इच्छेपेक्षां अधिक अर्थप्राप्ति जेथें वर्णिली जाते तेथें 'प्रहर्षण' अलंकार होतो. (२१४)

### उदा०—मनहरण, दंडक

साहि तनै सरजा कि कीरति सों चारों ओर चाँदनी वितान छिति छोर छाइयतु है। भूषन भनत ऐसो भूप भौंसिला है जाको द्वार भिच्छुकन सों सदाई भाइयतु है॥ महादानि सिवाजी खुमान या जहान पर दान के प्रमान जाके यों गनाइयतु है। रजत की हौंस किए हेम पाइयतु जासों हयन की हौंस किए हाथी पाइयतु है ॥ २१५ ॥

शहाजीपुत्र शिवाजीच्या कीर्तिरूप चांदणीचा मंडप पृथ्वीच्या चहूं-कडील टोंकापर्यंत पसरला आहे. भूषण म्हणतो, हा भोसलेराज असा आहे कीं, भिक्षुंना नेहमीं त्याच्या द्वाराशीं पडून रहावेसें वाटतें. ह्या भूतलावर शिवाजी महान दाता असून त्याच्या दानाचें प्रमाण ह्यावरूनहि समजून येतें; कीं, रुप्याची इच्छा केली असतां सोनें मिळतें व घोड्याची इच्छा केली असतां याजपासून हत्ती मिळतात. (२१५)

## ५३ विषादन–लक्षण, दोहा

जहँ चित चाहे काज ते, उपजत काज विरुद्ध।
ताहि विषादन कहत हैं, भूषन बुद्धि विसुद्ध ॥ २१६ ॥

इच्छित कार्याच्या विरुद्ध कार्योत्पत्ति जेथें होते तेथें 'विषादन' अलंकार होतो. (२१६)

उदा०—मालती सवैया

दारहि दारि मुरादहि मारि कै संगर साह सुजै बिच-लायौ। कै कर मैं सब दिल्ली की दौलति औरहु देस घनै अप-नायो ॥ बैर कियो सरजा सिव सों यह नौरँग के न भयो मन भायो। फौज पटाई हुती गढ़ लेन को गाँठिहुँ के गढ़ कोट गँवायो ॥ २१७ ॥

( औरंगजेबानें आपले भाऊ ) दारा, मुरादबक्ष यांना मारून व शहा-सुजाला युद्धांत जिंकून सर्व दिल्लीची दौलत हस्तगत करून घेतली आणि दुसरेहि पुष्कळसे देश जिंकले (व निष्कंटकपणें राज्य करूं लागला); पण सर्जा शिवाजीशीं वैर उत्पन्न झालें हें मात्र औरंगजेबाला आवडलें नाहीं. किल्ले हस्तगत करण्याकरितां म्हणून फौज पाठविली. तों किल्ले जिंकून घेणें एकीकडेच राहून, ती आपलेच किल्ले गमावून बसली! (२१७)

उदा० २ रें—दोहा

महाराज सिवराज तव, बैरी तजि रस रुद्र।
बचिबे को सागर तिरे, बूड़े सोक समुद्र ॥ २१८ ॥

हे शिवाजी महाराज! तुमचे शत्रू आपल्या बचावाकरितां वीरभाव सोडून समुद्रापार झाले; पण पुढें शोकसमुद्रांत बुडाले! (२१८)

## ५४ अधिक–लक्षण, दोहा

जहाँ बड़े आधार ते, बरनत बढ़ि आधेय।
ताहि अधिक भूषन कहत, जानि सुग्रन्थ प्रमेय ॥ २१९ ॥

आधारापेक्षां आधेयाचें वर्णन जेथें अधिक केलें जातें तेथें 'अधिक' अलंकार जाणावा. (२१९)

उदा०—दोहा

सिव सरजा तव हाथ को, नहिँ बखान करि जात।
जाको बासी सुजस सब, त्रिभुवन मैं न समात ॥ २२० ॥

हे सर्जा शिवाजी ! तुझ्या हाताचें वर्णन करितां येत नाहीं. ( कारण, ) ज्या हातांत वास्तव्य करणारें तुझें सुयश त्रिभुवनांत मावेनासें झालें आहे. (२२०)

उदा० २ रें—कवित्त मनहरण

सहज सलील सील जलद से नील डील पब्बय से पील देत नाहिँ अकुलात है। भूषन भनत महाराज सिवराज देत कंचन को ढेरु जो सुमेरु सो लखात है॥ सरजा सवाई कासों करि कविताई तव हाथ की बड़ाई को बखान करि जात है? जाको जस टंक सातो दीप नव खंड महिमंडल की कहा ब्रह्मंड ना समात है ॥ २२१ ॥

भूषण म्हणतो; शिवाजी महाराज पाण्यानें भरलेल्या नीलवर्ण मेघासारखे व पर्वताप्रमाणें धिप्पाड असे हत्ती देतांना घाबरत नाहींत. सोन्याचे जे ढीग शिवाजी दान करितो ते मेरु पर्वताप्रमाणें दिसतात. हे सवाई सर्जा ! तुझें कवित्व ( गुणगान ) कोण करूं शकेल ? नुसत्या तुझ्या दोनी हाताची प्रशंसा कोणी करूं शकणार नाहीं. तुझें वालभर ( यत्किंचित् ) यश भूतलावरील साती द्वीपांत, नऊहि खंडांत, इतकेंचसें काय पण ब्रह्मांडांतदेखील मावेनासें झालें आहे. (२२१)

५५ अन्योन्य—लक्षण, दोहा

अन्योन्य उपकार जहँ, यह बरनन ठहराय।
ताहि अन्योन्या कहत हैं, अलंकार कविराय ॥ २२२ ॥

जेथें दोन वस्तूंतील परस्परामुळें परस्परांच्या होणाऱ्या शोभेचें वर्णन केलें जातें, तेथें 'अन्योन्य' अलंकार होतो. (२२२)

उदा०—मालती सवैया

तो कर सों छिति छाजत दान है दान हू सों अति तो कर छाजै। तैंही गुनी की बड़ाई सजै अरु तेरी बड़ाई गुनी सब साजै ॥ भूषन तोहि सों राज बिराजत राज सों तू सिवराज बिराजै। तो बल सों गढ़ कोट गजैं अरु तू गढ़ कोटन के बल गाजै ॥ २२३ ॥

पृथ्वीवर तुझ्या हाताने दिल्यामुळें दान व दानामुळें तुझा हात शोभतो. तूं गुणी जनांचा सन्मान करतोस म्हणून सर्व गुणीजन तुझी प्रशंसा करतात. भूषण म्हणतो, तुझ्यामुळें राज्य व राज्यामुळें तूं शोभा पावतास. तुझ्या सामर्थ्यामुळें गड किल्ले आणि गडकिल्ल्यांमुळें तूं (पृथ्वीवर) गाजतोस. (२२३)

## ५६ विशेष—लक्षण, दोहा

बरनत है आधेय को, जहँ बिनही आधार।
ताहि बिसेष बखानही भूषन, कवि सरदार ॥ २२४ ॥

आधारावांचून आधेयाचें वर्णन जेथें केलें जातें, तेथें 'विशेष' अलंकार जाणावा. (२२४)

उदा०—दोहा

सिव सरजा सों जंग जुरि, चन्दावत रजवंत।
राव अमर गो अमरपुर, समर रही रज तंत ॥ २२५ ॥

सरजा शिवाजीशीं युद्ध करून अमरसिंह चन्दावत अमरपुरास (स्वर्गास) गेला. पण त्याच्या शूरत्वाची कीर्ति समरंगणांत राहिली. (२२५)

उदा० २—कवित्त मनहरण

सिवाजी खुमान सलहेरि मैं दिलीस दल कीन्हों कतलाम करवाल गहि कर मैं। सुभट सराहे चन्दावत कछवाहे ढाहे

मुगलौ पठान फरकत परे फर मैं ॥ भूषन भनत भौंसिला के भट उद्‌भट जीति घर आए धाक फैली घर घर मैं । मारु के करैया अरि अमर पुरै गे तऊ अजौं मारु मारु सोर होत है समर मैं ॥ २२६ ॥

शिवाजीनें सालेरीच्या लढाईंत हातीं तरवार धरून दिल्लीपतीच्या सैन्याची कत्तल केली; चन्दावत, कछवाहे इत्यादि बलाढ्य व प्रशंसनीय वीरांचा फडशा पाडला; मोगल पठाण मैदानावर फरफटत पडले. भूषण म्हणतो, भोंसल्याचे शूरवीर योद्धे युद्ध जिंकून घरीं आले,-पण त्यांचा दरारा मात्र घरोघर बसला. मारा करणारे शत्रू मरण पावले, तरी पण रणांगणावर अद्याप 'मारा मारा' असा ध्वनि निघत आहे. (२२६)

## ५७ व्याघात-लक्षण, दोहा

और काज करता जहाँ, करै औरई काज ।
ताहि कहत व्याघात हैं, भूषन कवि सिरताज ॥ २२७ ॥

एक कार्य करीत असतां दुसरेंच केलें जातें, असें वर्णन करण्यांत येतें तेथें 'व्याघात' अलंकार होतो. (२२७)

उदा०-मालती सवैया

ब्रम्ह रचै पुरुषोत्तम पोसत संकर सृष्टि सँहारन हारे ।
तू हरि को अवतार सिवा नृप काज सँवारे सबै हरि वारे ॥
भूषन यों अवनी यवनी कहैं "कोऊ कहै सरजा सों हहारे" ।
तू सबको प्रतिपालनहार बिचारे भतार न मारु हमारे ॥ २२८ ॥

ब्रह्मदेव सृष्टीची रचना करितो, पुरुषोत्तम (विष्णू) तिचें पोषण करितो आणि शंकर संहार करितो. हे शिवराज! तूं हरीचा अवतार असून सर्व हरीचींच कामें त्वां सांभाळिलीं आहेस (सृष्टीचें भरण पोषण करितोस.) भूषण म्हणतो (म्हणून), पृथ्वीवरील यवन स्त्रिया म्हणतात कीं, 'कोणी तरी सरजा शिवाजीस जाऊन सांगा कीं, तूं सर्वांचा प्रतिपाल करणारा आहेस; गरीब बापडे आमचे भ्रतार मारूं नकोस'. (२२८)

दुसरें उदा०—कवित्त मनहरण

कसत मैं बार बार वैसोई बुलन्द होत वैसोई सरस रूप समर भरत है। भूषन भनत महराज सिवराज मनि, सघन ‡सदाई जस फूलन धरत है॥ बरछी कृपान गोली तीर केते मान, जोरावर गोला बान तिनहू को निदरत है। तेरो करबाल भयो जगत को ढाल, अब सोई हाल म्लेच्छन के काल का करत है ॥ २२९ ॥

भूषण म्हणतो, हे राजश्रेष्ठ शिवाजी महाराज! सदाफुलीचीं फुलें वरचेवर तोडलीं असतांना तिला जशीं अधिकच दाट फुलें येऊं लागतात,तद्वतच तुझी तरवार समरांगणांत (बुलन्द) उन्नत होऊं लागली कीं, सरसरूप धारण करूं लागते (रक्तानें माखते); किंवा तुझी तरवार समरांगणांत वावरूं लागली कीं, सरस होते (रक्तपान करते) व तिला नेहमीं यशरूप फुलें येऊं लागतात. तुझ्या तरवारीसमोर इतरांच्या बरच्या, तरवारी, गोळ्या (बंदुकीच्या), तीर, तोफेचे जोरदार गोळे आणि बाण यांची काय बिशाद? तीच तुझी तरवार जगताला ढाल स्वरूप (संरक्षणकर्ती) आहे; पण साम्प्रत यवनांचा काळ करणारी झाली आहे. (२२९)

## ५८ (कारण–माला) गुंफ—लक्षण, दोहा

पूरब पूरब हेतु कै, उत्तर उत्तर हेतु।
या विधि धारा बरनिए गुम्फ कहावत नेतु ॥ २३० ॥

एकाद्या कारणापासून जेथें कार्य उत्पन्न होतें व तेंच कार्य पुन्हा दुसऱ्या कार्याचें कारण बनतें; आणि अशाच कार्य–कारणांची परंपरा जेथें वर्णन करण्यांत येते तेथें 'कारण-माला' किंवा 'गुम्फ' अलंकार समजला जातो. (२३०)

‡ सदाई=सदाफुली किंवा दुपारीचें झाड. ज्याला नेहमीं फुलें लागतात तें.

उदा० २ रें—मालती सवैया

शंकर की किरपा सरजा पर जोर बढ़ी कवि भूषन गाई।
ता किरपा सों सुबुद्धि बढ़ी भुव भौंसिला साहि तनै की सवाई॥ राज सुबुद्धि सों दान बढ़यो अरु दान सों पुन्य समूह सदाई। पुन्य सों बाढ़यो सिवाजी खुमान खुमान सों बाढ़ी जहान भलाई॥२३१॥

शंकराची कृपा शिवाजीवर फार झाली, तीच भूषण कवीनें गाइली आहे. त्या कृपेनें शहाजी पुत्र शिवाजीची सुबुद्धी सवाईनें वाढली; त्या शिवरायाच्या सुबुद्धीमुळें दान, आणि दानामुळें पुण्यराशी वाढल्या; व पुण्याईमुळें शिवाजी (त्याचें आयुष्य) व शिवाजीमुळें सर्व जगांतील भलाई वाढली. (२३१)

उदा० २ रें—दोहा

सुजस दान अरु दान धन, धन उपजै किरवान।
सो जग मैं जाहिर करी, सरजा सिवा खुमान॥२३२॥

सुयश दानामुळें, दान धनापासून व धन तरवारीच्या जोरावर उत्पन्न होतें; हें शिवाजीनें जगाच्या निदर्शनास आणिलें. (२३२)

५९ एकावली—लक्षण, दोहा

प्रथम बरनि जहँ छोड़िये, जहाँ अरथ की पाँति।
बरनत एकावलि अहै, कवि भूषन यहि भाँति॥२३३॥

प्रथम एकाद्या वस्तूचें वर्णन करावें व नंतर त्या वर्णनासंबंधीं अर्थ-परंपरा जेथें दाखविली जाते तेथें 'एकावली' अलंकार होतो. (२३३)

उदा०—हरिगीतिका छंद

तिहुँ भुवन मैं भूषन भनैं नरलोक पुन्य सुसाज मैं।
नरलोक मैं तीरथ लसै महि तीरथों की समाज मैं॥
महि मैं बड़ी महिमा भली महिमै महारज लाज मैं।
रज लाज राजत आजु है महराज श्री सिवराज मैं॥२३४॥

भूषण म्हणतो, तीन्ही लोकांत पुण्यवान् नरलोक होय. त्या नरलोकांत तीर्थें, तीर्थसमुदायांत पृथ्वी, व पृथ्वींत सुकीर्ति श्रेष्ठ होय; ही सुकीर्ति विनययुक्त (निरभिमान) राजश्रीमुळें आहे, व अशी निरभिमान राज-संपदा सांप्रत श्रीशिवरायासच शोभते. (२३४)

### ६० मालादीपक आणि सार-लक्षण, दोहा

दीपक एकावलि मिले, मालादीपक होय ।
उत्तर उत्तर उतकरष, सार कहत हैं सोय ॥ २३५ ॥

दीपक आणि एकावलि मिळून 'मालादीपक' व त्याचाच उत्तरोत्तर जेथें उत्कर्ष वर्णिला जातो तेथें 'सार' हा अलंकार होतो. (२३५)

उदा०—(मालादीपक) कवित्त मनहरण

मन कवि भूषन को सिव की भगति जीत्यो सिव की भगति जीत्यो साधु जन सेवा ने। साधु जन जीते या कठिन कलिकाल कलिकाल महावीर महाराज महिमेवाने ॥ जगत मैं जीते महाबीर महाराजन ते महाराज बावन हू पातसाह लेवा ने। पातसाह बावनौ दिली के पातसाह दिल्लीपति पातसाहै जीत्यो हिन्दूपति सेवा ने ॥ २३६ ॥

कवीच्या मनास शिवभक्तीनें, शिवभक्तीस साधुजनांच्या सेवेनें, साधु-जनास कलिकालानें, कलिकालास शूर आणि कीर्तिवान राजांनीं, या शूर आणि कीर्तिवान राजांस बावन बादशहांस जिंकणाऱ्या (औरंगजेबा) नें व त्या बावन बादशहांच्या बादशहास-दिल्लीपती औरंगजेबास हिन्दूपति शिवाजीनें जिंकिलें. (२३६)

उदा०—(सार) मालती सवैया

आदि बड़ी रचना है विरंचि की जामैं रह्यौ रचि जीव जड़ो है ।
ता रचना महँ जीव बड़ो अति काहे ते ता उर ज्ञान गड़ो है ॥
जीवन मैं नर लोग बड़े कवि भूषन भाषत पैंज अड़ो है ।
है नर लोग मैं राजा बड़ो सब राजन मैं सिवराज बड़ो है॥२३७॥

ब्रह्मदेवानें (नानाप्रकारच्या) जड जीवांची सर्वारंभीं रचना केली. त्यामुळें (ब्रह्मदेवकृत) रचना श्रेष्ठ आहे; त्या रचनेंत जीव हा पदार्थ श्रेष्ठ आहे; कारण त्याचे ठिकाणीं ज्ञान ठेविलें आहे. त्या जीवांत, भूषण प्रतिज्ञेवर सांगतो. कीं, मनुष्यजीव श्रेष्ठ आहे; मनुष्यलोकांत राजा श्रेष्ठ व सर्व राजांत शिवाजी श्रेष्ठ आहे. (२३७)

## ६१ यथासंख्य–लक्षण, दोहा

**क्रम सों कहि तिनके अरथ, क्रम सों बहुरि मिलाय ।**
**यथासंख्य ताको कहैं, भूषन जे कविराय ॥ २३८ ॥**

प्रथमतः कांहीं वस्तूंचें क्रमशः वर्णन करून त्याच क्रमानें त्यांजविषयींचें पुनरपि विवरण करण्यांत येतें तेथें ‘यथासंख्य’ अलंकार समजावा. (२३८)

उदा०–कवित्त मनहरण

**जेई चहौ तेई गहौ सरजा सिवाजी देस संके दल दुवन के जे वै बड़े उर के। भूषन भनत भौंसिला सों अब सनमुख कोऊ ना लरैया है धरैया धीर धुर के॥ अफजल खान रुस्तुमैजमान, फत्तेखान, कूटे लूटे ए उजीर बिजैपुर के। अमर सुजान मोहकम बहलोल खान खाँडे छाँडे डाँड़े उमराव दिली सुर के ॥२३९॥**

सरजा शिवाजीस जे जे देश घेण्याची इच्छा झाली ते ते त्यानें घेतले. (त्यामुळें) मोठमोठे हिम्मतवान् शत्रू (त्याला) भिऊं लागले. भूषण म्हणतो, (इतकेंच नव्हे) आतां शिवाजीसमोर कोणी धैर्य धरून लढणारा असा राहिला नाहीं. अफजलखान, रुस्तुमजमा, फत्तेखान ह्या विजापुरच्या सरदारांपैकीं, अफजलखानास मारलें, रुस्तुमजमास लुटलें आणि फत्तेखानानें शिवाजीशीं तह केला. तसेंच दिल्लीश्वर औरंगजेबाचे सरदार अमरसिंह, सुजानसिंह यांस मारलें, मोहकमसिंहास सोडून दिलें आणि बहलोलखानाकडून दंड घेतला. (२३९)

## ६२ पर्याय–लक्षण, दोहा

**एक अनेकन मैं रहै, एकहि मैं कि अनेक ।**
**ताहि कहत परयाय हैं, भूषन सुकवि विवेक ॥२४०॥**

एकांत अनेक व अनेकांत एक, असें वर्णन जेथें करण्यांत येतें तेथें 'पर्याय' अलंकार होतो. (२४०)

उदा०–दोहा

**जीत रही औरंग मैं, सवै छत्रपति छाँड़ि ।**
**तजि ताहू को अब रही, सिवसरजा कर माँड़ि ॥२४१॥**

सर्व छत्रपतींना ( राजांना ) सोडून विजय औरंगजेबासच मिळाला (सर्व राजांत औरंगजेब विजयी झाला); पण त्या विजयानें औरंगजेबासहि सोडलें व तो आतां सरजा शिवाजीच्या हातांत शोभूं लागला. (२४१)

उदा० २ रें–कवित्त मनहरण

**कोट गढ़ दै कै माल मुलुक मैं बीजापुरी गोलकुंडा वारो पीछे ही को सरकतु है । भूषन भनत भौंसिला भुवाल भुजबल रेवा ही के पार अवरंग हरकतु है ॥ पेसकसै भेजत इरान फिरगान पति उनहू के उर याकी धाक धरकतु है । साहितनै सिवाजी खुमान या जहान पर कौन पातसाह के न हिए खरकतु है ? ॥ २४२ ॥**

कोट आणि गड देऊन विजापूरकर व गोवळकोंडेवाले ( संपत्ति व देश या बाबतींत ) मागें हटले. त्यांचे जवळ शिवाजीपेक्षां माल आणि मुलूख कमी राहिला. भूषण म्हणतो, भोंसलेराज ! तुझ्या बाहूबलाच्या भीतीनें औरंगजेब रेवा नदीच्या पलीकडेच थबकून आहे. इराण आणि फिरंगान ( यूरोप )चे बादशहांच्या उरांत शिवाजीची धास्ती बसल्यामुळें ते नजराणा पाठवितात. हे शहाजी पुत्र शिवाजी ! तुझ्या धाकानें या जगांत कोणा बादशाहाची छाती धडधड करणार नाहीं ? (२४२)

उदा० ३ रें—कवित्त मनहरण

अगर के धूप धूम उठत जहाँई तहाँ उठत बगूरे अब अति ही अमाप हैं । जहाँई कलावंत अलापैं मधुर स्वर तहाँई भूत प्रेत अब करत विलाप हैं ॥ भूषन सिवाजी सरजा के बैर बैरिन के डेरन मैं परे मनो काहु के सराप हैं । बाजत हे जिन महलान मैं मृदङ्ग तहाँ गाजत मतंग सिंह बाघ दीह दाप हैं ॥ २४३ ॥

ज्या ठिकाणीं पूर्वी अगरबत्त्यांचा सुवासिक धूर निघत असे, त्या ठिकाणीं आतां धुळीच्या असंख्य वावटळी सुटत आहेत. जेथें पूर्वी कलावंतांचें मंजुळ व सुस्वर गायन होत असे तेथें आतां भुतें-प्रेतें रडत आहेत. भूषण म्हणतो, शिवाजीशीं वैर केल्यामुळें शत्रूंच्या डेऱ्याला कोणाचे तरी शाप लागले असावे असें वाटतें. तसेंच ज्या महालांतून पूर्वी मृदंगाचा घुमघुम शब्द निघत असे, तेथें हत्ती, सिंह आणि वाघ यांच्या गर्जना चालल्या आहेत. (२४३)

६३ परिवृत्त—लक्षण, दोहा

एक बात को दै जहाँ, आन बात को लेत ।
ताहि कहत परिवृत्त हैं, भूषन सुकवि सचेत ॥ २४४ ॥

एक वस्तु देऊन तिच्याऐवजीं दुसरी वस्तु घेतली जाते तेथें 'परिवृत्त' अलंकार जाणावा. (२४४)

उदा०—कवित्त मनहरण.

दच्छिन धरन धीर धरन खुमान गढ़ लेत गढ़ धरन सों धरम दुवारु दै । साहि नर नाह को सपूत महा बाहु लेत मुलुक महान छीनि साहन को मारु दै । संगर मैं सरजा सिवाजी अरि सैनन को सारु हरि लेत हिन्दुवान सिर सारु दै । भूषन भुसिल जय जस को पहारु लेत हरजू को हारु हरगन को अहारु दै ॥ २४५ ॥

दक्षिणाधिपती धैर्यधारी शिवाजी किल्लेदारांस धर्मद्वार देऊन—त्यांना धर्मशाळा दाखवून-आपण त्यांचे किल्ले घेतो. तसेंच हा शहाजीपुत्र शिवाजी बादशहांना मार देऊन त्यांचे मोठमोठे देश हिसकावून घेत आहे. युद्धांत शिवाजी, शत्रूसैन्याचें तेज हरण करितो. ( त्यांचीं हत्यारें हिसकावून घेतो ) आणि हिन्दूंचें वैभव वाढवितो. भूषण म्हणतो, भोसले-राजा, आपण यश संपादन करितो व महादेवास मुण्डमाला व त्याच्या गणांस आहार देतो. (२४५)

## ६४ परिसंख्या—लक्षण, दोहा

**अनत बरजि कछु वस्तु जहँ, बरनत एकहि ठौर।**
**तेहि परिसंख्या कहत हैं, भूषन कवि दिलदौर॥ २४६॥**

एकाद्या वस्तूचा इतरत्र अभाव दाखवून एकाच ठिकाणीं तिचें अस्तित्व वर्णन करण्यांत येतें तेथें 'परिसंख्या' अलंकार होतो. (२४६)

उदा०—मनहरण दंडक

**अति मतवारे जहाँ दुरदै निहारियत तुरगन ही मैं चंच-लाई परकीति है। भूषन भनत जहाँ पर लगैं बानन मैं कोक पच्छिनहि माहिँ बिछुरन रीति है। गुनि गन चोर जहाँ एक चित्त ही के, लोक बंधे जहाँ एक सरजा की गुनप्रीति है। कम्प कदली मैं, बारि बुन्द बदली मैं सिवराज अदली क राज मैं यों राजनीति है॥ २४७॥**

भूषण म्हणतो, ज्याच्या राज्यांत उन्मत्तपणा हत्तींतच आढळून येतो, चंचलता घोड्यांचे ठिकाणीं दिसून येते; जेथें पंख बाणाला, व वियोग चक्रवाक पक्ष्यांत दिसून येतो; तसेंच, गुणीजन आणि चोर एका विचारानें वागतात; कारण सर्व लोक एका शिवाजीच्या प्रेमरज्जूनें बांधले गेले आहेत, कम्प ( भय ) केळीस, पाण्याचे थेंब (अश्रू) मेघांतच दिसून येतात. त्या न्यायी शिवाजीची राजनीति ही अशा प्रकारची आहे. (२४७)

### ६५ विकल्प—लक्षण, दोहा

कै वह कै यह कीजिए, जहँ कहनावति होय ।
ताहि विकल्प बखानहीं, भूषन कवि सब कोय ॥ २४८ ॥

हें करावें किंवा तें, असें वर्णन जेथें करण्यांत येतें तेथें 'विकल्प' अलंकार होतो. (२४८)

उदा०—मालती सवैया

मोरँग जाहु कि जाहु कुमाऊँ सिरीनगरै कि कबित्त बनाए ।
बाँधव जाहु कि जाहु अमेरि कि जोधपुरै कि चित्तौरहि धाए ॥
जाहु कुतुब्ब कि एदिल पै कि दिलीस हु पै किन जाहु बोलाए ।
भूषन गाय फिरो महि मैं बनिहै चित्त चाह सिवाहि रिझाए २४९

भूषण म्हणतो, आपली काव्यकृति घेऊन मोरंग, कुमायून, श्रीनगर, बांधवगड, आमेर, जोधपूर, चितोडे येथील राण्यांकडे जा किंवा कुतुबशाह, आदिलशहा, दिल्लीपती औरंगजेब यांच्याकडे (निमंत्रणावरून) कां होईना, जा; इतकेंच नव्हे तर सर्व पृथ्वीवरील राजांचें व बादशहांचें गुणगान करीत फिरा, तरी मनांतील इच्छा शिवाजी संतुष्ट केल्यानेंच पूर्ण होतात. (इतरांच्यानें होत नाहींत). (२४९)

उदा० २ रें—मालती सवैया

देसन देसन नारि नरेसन भूषन यों सिख देहिं दया सों । मंगन ह्वै करि दन्त गहो तिन, कन्त तुम्हैं हैं अनन्त महा सों ॥ कोट गहौ कि गहौ बन ओट कि फौज की जोट सजो प्रभुता सों । और करौ किन कोटिक राह सलाह बिना बचिहौ न सिवा सों ॥ २५० ॥

भूषण म्हणतो, देशोदेशींच्या राजस्त्रिया आपल्या पतींना ( राजांना ) मोठ्या विनयानें म्हणतात कीं, 'हे कान्त, तुम्हांला शपथ आहे, तुम्ही याचक होऊन दातीं तृण धरा ( व त्या शिवाजीस शरण जा ). तुम्ही

किल्लेदार होऊन किल्ल्यांत बसा अथवा सेनापति होऊन मोठ्या थाटानें मिरवा किंवा अरण्यांतून रहा, ( असे ) शेंकडों उपाय जरी तुम्ही केले तरी शेवटीं शिवाजीशीं तडजोड केल्यावांचून वाचूं शकणार नाहीं'. (२५०)

## ६६ समाधि—लक्षण, दोहा

और हेतु मिलि कै जहाँ होत सुगम अति काज ।
ताहि समाधि बखानहीं, भूषन जे कविराज ॥ २५१ ॥

इतर कारणांमुळें जेथें कार्य सुलभ जातें तेथें 'समाधि' अलंकार जाणावा. ( २५१ )

उदा० —मालती सवैया

बैर कियो सिव चाहत हो तब लौं अरि बाह्यो कटार कठैठो । योंही मलिच्छहि छाँड़ै नहीं सरजा मन तापर रोस मैं पैठो ॥ भूषन क्यों अफजल्ल बचै अठपाव कै सिंह को पावँ उमैठो । बीछू के घाय धुकयोई धरक्क ह्वै तो लग धाय धराधर बैठो ॥ २५२ ॥

शिवाजीच्या ठिकाणीं द्वेषभाव उत्पन्न होतो न होतो तोंच शत्रूनें (अफजलखानानें ) कट्यार उपसली. एरवीं तर शिवाजी म्लेंच्छांना सोडीत नसे; त्यांतून ह्या वेळीं तो त्याजवर रागावलेला. भूषण म्हणतो, सिंहाचा पाय मुरगळण्याची आगळीक करून तो अफजल कसा जिवंत राहील ? बिचव्याच्या घावानें त्याचें काळीज कापलें व तो जमिनीवर पडला. (२५२)

## ६७ समुच्चय—लक्षण, दोहा

एक बारही जहँ भयो, बहु काजन को बंध ।
ताहि समुच्चय कहत हैं, भूषन जे मतिबंध ॥ २५३ ॥

एकाच वेळीं अनेक कार्यांचें जेथें वर्णन करण्यांत येतें तेथें 'समुच्चय' अलंकार जाणावा. (२५३)

उदा०—मालती सवैया

माँगि पठायो सिवा कछु देस वजीर अजानन बोल गहे ना। दौरि लियो सरजा परनालो यों भूषन जो दिन दोय लगे ना॥ धाक सों खाक बिजैपुर भो मुख आय गो खान खवास के फेना। भै भरकी करकी धरकी दरकी दिल एदिल साहि की सेना॥ २५४॥

शिवाजीनें कांहीं देश देण्याकरितां सांगून पाठविलें; परन्तु अडाणी वजिरांनीं शिवाजीचें हें म्हणणें मान्य केलें नाहीं; तेव्हां शिवाजीनें चाल करून पुरते दोन दिवस लागूं न देतां पन्हाळगड घेतला. भूषण म्हणतो, शिवाजीच्या धाकानें विजापुरकराचें मुख (जळून) खाक झालें आणि खवास-खानाच्या तोंडास फेंस आला. आदिलशहाच्या सैन्याची भीतीनें गाळण उडाली, व छातींत धडकी भरल्यानें ती फाटून गेली. (२५४)

द्वितीय समुच्चय—लक्षण, दोहा

वस्तु अनेकन को जहाँ, बरनत एकहि ठौर।
दुतिय समुच्चय ताहि को, कहि भूषन कविमौर॥२५५॥

अनेक वस्तूंचें एका ठिकाणींच जेथें वर्णन होतें तेथेंहि 'समुच्चय' हा अलंकार होतो. (२५५)

उदा०—मालती सवैया

सुन्दरता गुरुता प्रभुता भनि भूषन होत है आदर जामैं।
सज्जनता औ दयालुता दीनता कोमलता झलकै परजा मैं॥
दान कृपानहु को करिबो करिबो अभै दीनन को बर जामैं।
साहन सों रन टेक विवेक इते गुन एक सिवा सरजा मैं॥२५६॥

भूषण म्हणतो, सौंदर्य, गुरुत्व आणि प्रभुत्व हे गुण याच्या ठिकाणीं वसत असल्यामुळें आदरास पात्र झाले आहेत; तसेंच (याच्या ठिकाणीं) प्रजेविषयीं सौजन्य, दयालुता, कोमलता दिसून येते; (शत्रूंना) तरवारीचें-च दान व दीनांना अभय वर देण्याचें त्याच्या ठिकाणीं सामर्थ्य आहे;

बादशहांशीं पण लावून युद्ध करणें आणि कोणतेंहि काम विचारपूर्वक करणें हे इतके गुण एका सर्जा शिवाजीच्या ठिकाणीं आहेत. (२५६)

६८ प्रत्यनीक—लक्षण, दोहा

जहँ जोरावर सत्रु के, पच्छी पै कर जोर।
प्रत्यनीक तासों कहैं, भूषन बुद्धि अमोर ॥ २५७ ॥

शत्रूच्या बलाढ्यपणामुळें त्याला सोडून त्याचे जे पक्षपाती त्यांवर जुलूम होतो, असें वर्णन करण्यांत येतें तेथें 'प्रत्यनीक' अलंकार होतो. (२५७)

उदा०—अलसा सवैया

लाज धरौ सिवजू सौं लरौ सब सैयद सेख पठान पठाय कै। भूषन ह्याँ गढ़ कोटन हारे उहाँ तुम क्यों मठ तोरे रिसाय कै? ॥ हिन्दुन के पति सों न बिसात सतावत हिन्दु गरीबन पाय कै। लीजै कलंक न दिल्ली के बालम आलम आलमगीर कहाय कै ॥ २५८ ॥

भूषण म्हणतो, (हे अवरंगजेब!) तुम्ही शेख, सय्यद, पठाण इत्यादिकांस पाठवून शिवाजीशीं लढतां पण कांहींतरी लाज धरा; इकडे तर (दक्षिणेंत) गडावर गड व किल्ल्यावर किल्ले तुमच्या हातांतून जात चालले; पण तिकडे (उत्तर हिन्दुस्थानांत) देवालयांचा विध्वंस करूं लागला आहां! हिन्दुपती (शिवाजी) पुढें कांहीं न चालल्यामुळें गरीब हिन्दूंना मात्र सतावतां. हे दिल्लीपति! तुम्ही आपणांस आलमगीर (जग जिंकणारा) म्हणवून, अशा तऱ्हेनें कलंक लावून घेऊं नका. (२५८)

उदा० २ रें—कवित्त मनहरण

गौर गरबीले अरबीले राठवर गह्यो लोह गढ़ सिंहगढ़ हिम्मति हरष ते। कोट के कँगूरन मैं गोलन्दाज तीरन्दाज [illegible] लगाय, गोली तीरन बरषते ॥ कै के सावधान किरवान कसि कम्मरन सुभट अमान चहुँ ओरन करषते। भूषन

**भनत तहाँ सरजा सिवा तैं चढ़ो राति के सहारे ते अराति अमरष ते ॥ २५९ ॥**

गर्विष्ठ गौरानें व घमेंडखोर राठोडानें मोठ्या धैर्यानें व आनंदानें लोहगड व सिंहगड घेतला आणि त्यावर गोलंदाज व तीरंदाज (संरक्षणाकरितां) ठेवून दिले. भूषण म्हणतो, हे सर्जा! त्यांची (किल्लेदारांची) घमेंड जिरविण्याकरितां आपल्या शूरवीरांस एकत्र करून त्यांचेसह मोठ्या सावधगिरीनें कमरेस तरवारी लटकावून गोळ्यांचा व बाणांचा वर्षाव होत असतां रात्रीच्या वेळीं तूं हे किल्ले चढून गेलास ! (२५९)

## ६९ अर्थापत्ति ( काव्यार्थापत्ति )—लक्षण, दोहा

**" वह कीन्ह्यो तौ, यह कहा " यों कहनावति होय ।**
**अर्थापत्ति बखानहीं, तहाँ सयाने लोय ॥ २६० ॥**

'तें केलें मग याची काय कथा' असें वर्णन जेथें करण्यांत येतें तेथें 'अर्थापत्ति' अलंकार होतो. (२६०)

उदा०—कवित्त मनहरण

**सयन मैं साहन को सुन्दरी सिखावैं ऐसे सरजा सौं बैर जनि करौ महा बली है । पेसकसैं भेजत बिलायति पुरुतगाल सुनिकै सहमि जात करनाट थली है ॥ भूषन भनत गढ़ कोट माल मुलुक दै सिवा सौं सलाह राखिए तौ बात भली है । जाहि देत दंड सब डरिकै अखंड सोई दिल्ली दलमली तौ तिहारी कहा चली है ? ॥ २६१ ॥**

भूषण म्हणतो, रात्रीं निजतेवेळीं बादशहांच्या स्त्रिया त्यांना सांगतात, " त्या सर्जाशीं वैर करूं नका तो महाबलवान् आहे. विलायत आणि पोर्तुगाल (वाले) खंडणी पाठवितात; हें ऐकून कर्नाटक सर्द झाला. गड, किल्ले, माल, मुलूख देऊन शिवाजीशीं सलोखा ठेवण्यांतच कल्याण आहे. ज्याला भिऊन सर्व (राजेरजवाडे) दंड देत असत त्या (औरंगजेबाच्या) अखंड दिल्लीचें आसन देखील डळमळलें मग तुमची कथा काय ? " (२६१)

### ७० काव्यलिंग—लक्षण, दोहा

है दिढ़ाइबे जोग जो, ताको करत दिढ़ाव ।
काव्यलिंग तासों कहैं, भूषन जे कविराव ॥ २६२ ॥

दृढ करण्यायोग्य वस्तूचें समर्थन ज्या वर्णनानें होतें त्यास 'काव्यलिंग अलंकार' म्हणतात. (२६२)

उदा०—मनहरण दंडक

साइति लै लीजिए बिलाइति को सर कीजै बलख बिलायति को बन्दी अरि डावरे । भूषन भनत कीजै उत्तरी भुवाल बस पूरब के लीजिए रसाल गज छावरे ॥ दच्छिन के नाथ के सिपाहिन सों बैर करि अवरंग साहिजू कहाइए न बावरे । कैसे सिवराज मानु देत अवरंगै गढ़ गाढ़े गढ़पती गढ़ लीन्हें और रावरे ॥ २६३ ॥

मुहूर्त काढून विलायत (परराष्ट्रें) सर करा; बलख, विलायत येथील शत्रूंच्या मुलांस कैद करा; भूषण म्हणतो, उत्तरेचे सर्व राजे स्वाधीन करून घेऊन पूर्वेकडील राजांकडून हत्ती सुद्धां खंडणी घ्या; पण दक्षिणनाथाशीं वैर करून हे अवरंगशहा! तूं आपल्यास 'बावळट' म्हणून घेऊं नकोस. ज्या शिवाजीनें बलाढ्य किल्लेदारांचे तसेच तुमचे किल्ले हिसकावून घेतले तो तुम्हांस (अवरंगजेबास) कसें देईल? (२६३)

### ७१ अर्थान्तरन्यास—लक्षण, दोहा

कह्यो अरथ जहँ ही लियो, और अरथ उल्लेख ।
सो अर्थान्तरन्यास है, कहि सामान्य बिसेख ॥ २६४ ॥

वर्णित अर्थाबरोबर दुसऱ्या प्रकारच्या अर्थाचाहि जेथें उल्लेख होतो तेथें 'अर्थान्तरन्यास' अलंकार होतो. (२६४)

उदा०—(सामान्य भेद) कवित्त मनहरण

बिना चतुरंग संग बानरन लैकै बाँधि बारिधि को लंक रघुनन्दन जराई है । पारथ अकेले द्रोन भीषम से लाख

भट जीति, लीन्ही नगरी बिराट में बड़ाई है ॥ भूषन भनत है गुसुलखाने में खुमान अवरंग साहिबी हथ्याय हरि लाई है । तौ कहा अचम्भो महाराज सिवराज सदा बीरन के हिम्मतै हथ्यार होत आई है ॥ २६५ ॥

रघुनन्दन रामचंद्रानें बरोबर चतुरंग सैन्य न घेतां फक्त वानरेंच घेऊन समुद्रास सेतु बांधला व लंका जाळली. एकट्या अर्जुनानें द्रोणाचार्य, भीष्माचार्य ह्यांसारख्या लाखों वीरांस जिंकून विराटनगरींत कीर्ति मिळविली; भूषण म्हणतो, शिवाजीनें स्नानगृहांत (गुसलखान्यांत) घुसून औरंगजेबाचें वैभव हरण करून आणिलें; मग शिवाजीमहाराज वीरांना जी हिम्मत देतात तीच अस्त्ररूप होते यांत आश्चर्य तें कसलें? (२६५)

उदा०—(विशेष भेद) मालती सवैया

साहि तनै सरजा समरत्थ करी करनी धरनी पर नीकी ।
भूलिगे भोज से विक्रम से औ भई बलि बेनु की कीरति फीकी ॥
भूषन भिच्छुक भूप भए भलि भीख लै केवल भौंसिला ही की ।
नैसुक रीझि धनेस करै लखि ऐसियै रीति सदा सिवजी की ॥२६६॥

शहाजीपुत्र शिवाजीनें पृथ्वीवर फार उत्तम करणी केली; त्यामुळें लोक भोजविक्रमासारख्यांस विसरून गेले, व बलि आणि वेन राजाची कीर्ति फिकी पडली. भूषण म्हणतो, ह्या भोसल्याची भीक घेऊनच कित्येक राजे झाले आहेत. शिवाजी यत्किंचित् प्रसन्न झाला तरी तो कुबेर करून सोडतो, ही त्याची नेहमींचीच रीत आहे. (२६६)

### ७२ प्रौढोक्ति—लक्षण, दोहा

जहँ उतकरष अहेत को, बरनत हैं करि हेत ।
प्रौढ़ोकति तासों कहत, भूषन कवि बिरदेत ॥ २६७ ॥

जेथें कारण नसूनहि उत्कर्षाची कल्पना वर्णन करण्यांत येते तेथें प्रौढोक्ति अलंकार होतो. (२६७)

उदा०—कवित्त मनहरण

मानसर बासी हंस बंस न समान होत, चन्दन सों घस्यो घनसारऊ घरीक है। नारद की सारद की हाँसी मैं कहाँ सी आभ सरद की सुरसरी कौन पुण्डरीक है॥ भूषन भनत छक्यो छीरधि मैं थाह लेत फेन लपटानो ऐरा-वत को करी कहै?। कयलास ईस ईस सीस रजनीस वहौ अवनीस सिवा के न जस को सरीक है॥ २६८॥

मानस सरोवरावर राहतात म्हणून हंस कांहीं तितके शुभ्र नाहींत, तसेंच घासलेला कापूर, नारदाचें व शारदेचें हास्य, शरदृतूंमध्यें गंगानदींत उत्पन्न होणारें कमळ, हीं देखील अधिक शुभ्र नाहींत; क्षीरसमुद्रांत स्नान केलेला व फेंसानें माखलेला ऐरावत, (बर्फाच्छादित) कैलास पर्वतावर नित्य वास्तव्य करतात म्हणून महादेव आणि त्यांच्या मस्तकावर राहणारा चंद्र हे कोणी शिवाजीच्या यशाची तुलना करूं शकत नाहींत. (२६८)

७३ संभावना—लक्षण, दोहा

"जु यों होय तौ होय इमि" जहँ संभावन होय।
ताहि कहत सम्भावना, कवि भूषन सब कोय॥ २६९॥

'असें असतें तर असें झालें असतें' असा संभव जेथें वर्णिला जातो तेथें 'सम्भावना' अलंकार होतो. (२६९)

उदा०—कवित्त मनहरण

लोमस की ऐसी आयु होय कौन हू उपाय तापर कवच जो करनवारो धरिए। ताहू पर हूजिए सहस बाहु ता पर सहस गुनो साहस जो भीमहु ते करिए। भूषन कहै यों अव-रंगजू सों उमराव नाहक कहौ तौ जाय दच्छिन मैं मरिए। चलै न कछू इलाज भेजियत वे ही काज ऐसो होय साज तौ सिवा सों जाय लरिए॥ २७०॥

भूषण म्हणतो, औरंगजेबाचे सरदार त्यास म्हणतात, 'त्या शिवाजीशीं लढण्याकरितां लोमशऋषीसारखें आयुष्य, कर्णासारखें अभेद्य कवच, सहस्रबाहूसारखा पराक्रम आणि त्यापेक्षांहि सहस्रपट अधिक भीमासारखें साहस पाहिजे आहे'. आपण म्हणत असाल तर आम्ही दक्षिणेंत जाऊं; पण व्यर्थ मरून मात्र जाऊं. कारण, त्या (शिवाजी)च्या पुढें आमचा कांहीं एक इलाज चालत नाहीं. वरील साहित्य असेल तरच शिवाजीशीं जाऊन लढावें. (२७०)

## ७४ मिथ्याध्यावसित–लक्षण, दोहा

झूठ अरथ की सिद्धि को, झूठो बरनत आन ।
मिथ्याध्यवसित कहत हैं, भूषन सुकवि सुजान ॥२७१॥

असत्य वस्तूचें समर्थन करण्याकरितां पुन्हा असत्य वर्णन करण्यांत येतें तेथें 'मिथ्याध्यवसित' अलंकार होतो. (२७१)

उदा०–दोहा

पग रन मैं चल यों लसैं, ज्यों अंगद पग ऐन ।
ध्रुव सो भुव सो मेरु सो, सिव सरजा को बैन ॥ २७२ ॥

रणांगणांत शिवाजीचा पाय अंगदाप्रमाणेंच चलायमान आहे. (वस्तुतः अंगदानें रावणाच्या सभेंत आपला पाय इतका रोंवून धरला होता कीं कोणाहि राक्षसाच्यानें तो हलला नाहीं; अर्थात् अचल होता. त्या अचल पदाची उपमा शिवाजीच्या चलायमान पायाशीं केली आहे.) तसेंच शिवाजीचें वचन ध्रुव, पृथ्वी आणि मेरु ह्यांप्रमाणें अचल आहे. (२७२)

उदा०–कवित्त मनहरण

मेरु सम छोटो पन सागर सों छोटो मन धनद को धन
ऐसो छोटो जग जाहि को । सूरज सो सीरो तेज चांदनी
सी कारी कित्ति अमिय सो कटु लागै दरसन ताहि को ॥
कुलिस सो कोमल कृपान अरि भंजिबे को भूषन भनत भारी

भूप भौंसिलाहि को। भुव सम चल पद सदा महि मंडल में
धुव सो चपल धुव बल सिव साहि को ॥ २७३ ॥

जगांत ज्याची प्रतिज्ञा मेरूसारखी लहान, मन समुद्राप्रमाणें धाकटें व धन कुबेराप्रमाणेंच थोडेंसें आहे; ज्याचें तेज सूर्याप्रमाणें थंड, चांदण्यासारखी काळी कीर्ति व अमृतासारखें ज्याचें दर्शन कडू आहे; भूषण म्हणतो, अशा त्या भोसले राजाची शत्रूला मारणारी तरवार देखील वज्रासारखी मऊ आहे; तो पृथ्वीसारखा चलायमान आणि ध्रुवासारखा चपल व ध्रुवबालकासारखा शक्तिवान् आहे. (२७३)

### ७५ उल्लास–लक्षण, दोहा

एकहि के गुन दोष ते, औरै को गुन दोस।
बरनत हैं उल्लास सो, सकल सुकवि मतिपोस ॥ २७४ ॥

एकाच्या गुणदोषावरून (बरोबर) दुसऱ्याचेहि गुणदोष वर्णन केले जातात तेथें ‘उल्लास’ अलंकार होतो. (२७४)

उदा०(गुणेन दोष)–मालती सवैया

काज मही सिवराज बली हिन्दुवान बढ़ाइबे को उर ऊटै।
भूषन भू निरम्लेच्छ करी चहै, म्लेच्छन मारिबे को रन जूटै ॥
हिन्दु बचाय बचाय यहि अमरेस चँदावत लौं कोइ टूटै।
चन्द अलोक ते लोक सुखी यहि कोक अभागे को सोक न छूटै॥२७५॥

पृथ्वीचें कार्य अर्थात् हिन्दूंचा उत्कर्ष करण्याकरितां बलिष्ठ शिवरायाच्या मनांत नेहमीं वाढता उत्साह असतो. भूषण म्हणतो, पृथ्वी निम्लेंच्छ करावी अशी शिवरायाची इच्छा आहे व म्हणून म्लेंच्छांना मारण्याकरितां तो युद्ध करितो. (या युद्धांत) हिन्दूंचा बचाव करितां करितां अमरसिंहचंदावतासारखा एकाद दुसरा (हिन्दू) मरतोच. चंद्रप्रकाशानें सर्व जग सुखी होतें; पण चक्रवाकपक्ष्यासारखा कोणीना कोणी अभागी असतोच; त्याचा शोक नाहींसा होत नाहीं. (२७५)

उदा०–(दोषेण गुणो) कवित्त, मनहरण दंडक

देस दहपट्ट कीने लूटि कै खजाने लीने बचै न गढ़ोई काहू गढ़ सिरताज के। तोरादार सकल तिहारे मनसबदार डाँड़े, जिनके सुभाय जंग दै मिजाज के॥ भूषन भनत बादसाह को यों लोग सब वचन सिखावत सलाह की इलाज के। डावरे की बुद्धि है कै बावरे न कीजै बैरु रावरे के बैर होत काज शिवराज के॥ २७६॥

भूषण म्हणतो, बादशहा (औरंगजेबाला) सर्व लोक असें समजावीत आहेत कीं, 'तुझे सर्व देश (शिवाजीनें) हिसकावून घेतले, खजिने लुटले, तसेंच मोठमोठ्या किल्लेदारांचे लहान मोठे किल्ले घेतले, तुझे तोडेदार व मिजासखोर मनसबदार यांजबरोबर युद्ध करून त्यांना शिक्षा केल्या; याकरितां (हे अवरंगजेब!) पोरबुद्धि धरून शिवाजीशीं वैर करूं नको. तुझ्या वैरानें (तुला तर कांहीं लाभ होत नाहीं) उलट शिवाजीचाच कार्यभाग होतो मग तडजोडीचा रस्ता का सोडतोस? (२७६)

उदा०–(गुणे न गुणो) दोहा

नृप समान मैं आपनी, होन बड़ाई काज।
साहितनै सिवराज के करत, कवित कविराज॥ २७७॥

राजसभेंत आपली प्रतिष्ठा व्हावी म्हणून मोठमोठे कवी शहाजीपुत्र शिवरायाचीं कवनें करितात. (२७७)

उदा०–(दोषेन दोषो) दोहा

सिव सरजा के बैर को, यह फल आलमगीर।
छूटे तेरे गढ़ सबै, कूटे गये वजीर॥ २७८॥

हे आलमगीर! सर्जा शिवाजीशीं वैर केल्याचा परिणाम (पाहिलास ना?) तुझे सर्व किल्ले गेले आणि वजीर ठोकले गेले! (२७८)

उदा०—कवित्त, मनहरण दंडक

दौलति दिली कौ पाय कहाए अलमगीर बब्बर अकब्बर के बिरद बिसारे तैं। भूषन भनत लरि लरि सरजा सौं जंग निपट अभंग गढ़ कोट सब हारे तैं॥ सुधर्‍यो न एकौ साज भेजि भेजि बे ही काज बड़े बड़े बे इलाज उमराव मारे तैं। मेरे कहे मेर करु, सिवाजी सौं बैर करि गैर करि नैर निज नाहक उजारे तैं॥ २७९॥

भूषण म्हणतो, (हे औरंगजेब!) दिल्लीचें तख्त तुला मिळाल्यानें तूं 'आलमगीर' (जग जिंकणारा) म्हणवितोस, पण बाबरअकबरा-(तुझ्या पूर्वजा)चें ब्रीद तूं विसरलास; व शिवाजीशीं लढून लढून आपले गड, किल्ले सर्व गमावून बसलास. मोठमोठे सरदार शिवाजीवर पाठविलेस. त्यांच्याकडून तुझा कार्यभाग तर कांहीं झाला नाहीं, उलट बिचारे व्यर्थ आपल्या प्राणांस मुकले. शिवाजीशीं अनुचितपणें वैर करून तूं आपले देश विनाकारण उध्वस्त करून घेतलेस. (२७९)

७६ अवज्ञा—लक्षण, दोहा

औरे के गुन दोस ते, होत न जहँ गुन दोस।
तहाँ अवज्ञा होत है, भनि भूषन मति पोस॥ २८०॥

एकाच्या गुणदोषामुळें जेथें दुसर्‍याचे गुणदोष दिसून येत नाहींत तेथें 'अवज्ञा' अलंकार होतो. (हा उल्लासाच्या उलट आहे.) (२८०)

उदा०—मालती सवैया

औरन के अनबाढ़े कहा अरु बाढ़े कहा नहिं होत चहा है।
औरन के अनरीझे कहा अरु रीझे कहा न मिटावत हा है।
भूषन श्रीशिवराजहि माँगिए एक दुनी बिच दानि महा है।
मंगन औरन के दरबार गए तौ कहा न गए तौ कहा है॥२८१॥

इतरांच्या भाग्यवान् होण्यानें किंवा अभागी असल्यानें (आनचें) इच्छित कडेस जात नाहीं; तसेंच इतरांच्या अप्रसन्न किंवा प्रसन्न होण्यानें दुःख

नाहींसें होत नाहीं. भूषण म्हणतो, जगांत शिवराय हाच एक दाता आहे व जें कांहीं मागणें असेल तें त्यासच मागावें. इतरांच्या दरबारांत मागावयास गेल्यास न गेल्यासारखेंच आहे नाहींतर काय ? ( कारण इच्छेप्रमाणें मिळत नाहीं. ) (२८१)

७७ अनुज्ञा–लक्षण, दोहा

जहँ सरस गुन देखि कै, करे दोस की हौस ।
तहाँ अनुज्ञा होत है, भूषन कबि यहि रौस ॥ २८२ ॥

सरस गुण पाहून जेथें दोषाची हौस वर्णन केली जाते तेथें 'अनुज्ञा' अलंकार होतो. (२८२)

उदा०—कवित्त मनहरण

जाहिर जहान सुनि दान के बखान आजु महा दानि साहितनै गरिब नेवाज के। भूषन जवाहिर जलूस जरबाफ जोति देखि देखि सरजाकी सुकवि समाज के ॥ तप करि करि कमलापति सौं माँगत यों लोग सब करि मनोरथ ऐसे साज के । बैपारी जहाज के न राजा भारी राज के भिखारी हमैं कीजै महाराज सिवराज के ॥ २८३ ॥

भूषण म्हणतो, शहाजीपुत्र दीनवत्सल व दानशूर शिवरायाच्या दानाची चहूंकडे झालेली ख्याति ऐकून, तसेंच शिवरायाच्या दरबारांतील कवि मंडळीचे भरजरीचे कपडे व ( अंगावरील ) जड-जवाहिर पाहून सर्व लोक भगवान् विष्णूजवळ तपश्चर्या करून मागणें मागत असत कीं, हे लक्ष्मीपति ! आम्हांला जहाजाचा व्यापारी किंवा एकाद्या मोठ्या राज्याचा राजा करूं नकोस; शिवाजी महाराजांच्या ( दरबारांतला ) भिकारी केलेंस तरी पुरें आहे. (२८३)

७८ लेश–लक्षण, दोहा

जहँ बरनत गुन दोष कै, कहै दोष गुनरूप ।
भूषन ताको लेस कहि, गावत सुकवि अनूप ॥ २८४ ॥

जेथें गुणाचा दोष व दोषाचा गुण वर्णन करण्यांत येतो तेथें 'लेश' अलंकार होतो. (२८४)

उदा०—दोहा

उदैभानु राठौर वर, धरि धीरज, गढ़ ऐंड़ ।
प्रगटै फल ताको लह्यौ, परिगो सुरपुर पैंड़ ॥ २८५ ॥
कोऊ बचन न सामुहें, सरजा सों रन साजि ।
भली करी पिय ! समर ते, जिय लै आए भाजि ॥ २८६ ॥

उदयभानू राठोडानें धैर्य, किल्ला आणि अभिमान धरला त्याचें प्रत्यक्ष फल त्याला मिळालें. तो स्वर्गाच्या रस्त्यास लागला (मारला गेला). हे प्रिय ! त्या सर्जाशीं युद्ध करून आजवर त्याचे समोरून कोणी वांचून आला नाहीं. तुम्हीं युद्धांतून जीव घेऊन पळून आलां हें फार चांगलें झालें. (२८५,२८६)

## ७९ तद्गुण—लक्षण, दोहा

जहँ आपनो रंग तजि, गहै और को रंग ।
ताको तद्गुण कहत हैं, भूषन बुद्धि उतंग ॥ २८७ ॥

आपला रंग सोडून दुसऱ्याचा ग्रहण करण्यांत येतो तेथें 'तद्गुण' अलंकार होतो. (२८७)

उदा०—कवित्त, मनहरण दंडक

पम्पा मानसर आदि अगन तलाब लागे जेहि के परन में अकथ युत गथ के। भूषन यों साज्यो राजगढ़ सिवराज रहे देव चक चाहि कै बनाए राजपथ के ॥ बिन अवलम्ब कलिकानि आसमान मैं ह्वै होत बिसराम जहाँ इन्दु औ उदथ के। महत उतंग मनि जोतिन के संग आनि कैयो रंग चकहा गहत रवि रथ के ॥ २८८ ॥

भूषण म्हणतो, ज्या राजगडावर शिवाजी महाराज राहतात त्याच्या आजूबाजूंस पम्पा, मानस इत्यादि सरोवरांसारखीं इतिहासप्रसिद्ध व

अवर्णनीय अशीं सरोवरें आहेत; तेथील राजमार्ग पाहून देवदेखील थक्क होतात. आकाशास इतर कोठेंहि आधार नसल्यामुळें त्रस्त झालेले सूर्य-चंद्र येथेंच विसावा घेतात. मण्यांची प्रभा अति उंच वर फांकल्यानें सूर्याच्या रथावर पडून रथाचीं चाकें रंगीबेरंगी दिसत आहेत. (२८८)

### ८० पूर्वरूप—लक्षण, दोहा

प्रथम रूप मिटि जात जहँ, फिरी वैसोई होय।
भूषन पूरब रूप सों, कहत सयाने लोय ॥ २८९ ॥

पूर्वरूप लुप्त होऊन पुन्हा तसेंच जेथें प्रगट होतें तेथें 'पूर्वरूप' अलंकार होतो. (२८९)

### उदा०—मालती सवैया

ब्रह्मके आनन ते निकसे ते अत्यन्त पुनीत तिहूँ पुर मानी।
राम युधिष्ठिर के बरने बलमीकि हु व्यास के अंग सोहानी॥
भूषन यों कलिके कविराजन राजन के गुण गाय नसानी।
पुन्य चरित्र सिवा सरजै सर न्हाय पवित्र भई पुनि बानी॥२९०॥

ब्रह्मदेवाच्या मुखांतून निघाल्यामुळें त्रिभुवन त्या वाणीस (वेदांस) पवित्र मानतें; त्याच वाणीनें राम-युधिष्ठिरांचें गुणगान केल्यामुळें वाल्मिकि, व्यास यांना ती भूषणास्पद झाली. भूषण म्हणतो, पण कलिकाळांतील (पापिष्ठ) राजांचें वर्णन करून ती मलिन झाली होती, तरीपण पुण्यश्लोक सर्जा शिवाजीच्या चरित्ररूप सरोवरांत स्नान करून ती पुन्हा पवित्र झाली. (२९०)

### उदा० २ रें—मालती सवैया

यों सिर पै छहरावत छार हैं जाते उठैं असमान बगूरे।
भूषन भूधरऊ धरकैं जिनके धुनि धक्कन यों बल रूरे॥
ते सरजा सिवराज दिए कविराजन को गजराज गरूरे॥
सुंडन सों पहिले जिन सोखि कै फेरि महामद सों नद पूरे॥२९१॥

भूषण म्हणतो, सर्जा शिवाजीनें कविजनांस असे मदोन्मत्त हत्ती (दान) दिले आहेत कीं, त्यांच्या गर्जनांच्या धक्क्यानें पर्वतदेखील डळमळून जावे. ते (हत्ती) मस्तकावर जी धूळ फेंकतात त्या वावटळी आकाशापर्यंत जातात; अगोदर ते आपल्या सोंडांनीं नद्यांतील पाणी शोषून घेतात व पुन्हा गंडस्थलांतील मदाच्या रूपानें त्याच नद्या भरून टाकतात.(२९१)

उदा० ३ रें—मालती सवैया

**श्री सरजा सलहेरि के जुद्ध घने उमरावन के घर घाले। कुम्भ चँदावत सैद पठान कबंधन धावत भूधर हाले॥ भूषन यौं सिवराज की धाक भए पियरे अरुनें रँग वाले। लोहे कटे लपटे अति लोहु भए मुँह मीरन के पुनि लाले॥२९२॥**

शिवाजी सर्जानें सालेरीच्या युद्धांत अनेक उमरावांचा फडशा पाडला. कुम्भ, चंदावत, सय्यद, पठाण यांचीं धडें ( इकडून तिकडे ) धांवतांना पर्वत डळमळूं लागतात; भूषण म्हणतो, शिवाजीच्या अशा धाकानें लाल ( गाजरासारखे ) असणारे ( सय्यद पठाणादि ) पिंवळेधमक झाले, आणि पुन्हा शस्त्रांनीं घायाळ झाल्यामुळें त्या सरदारांचीं मुखें रक्तानें लाल झालीं. (२९२)

उदा० ४ थें—मालती सवैया

**यों कवि भूषन भाषत है यक तौ पहिले कलिकाल कि सैली। तापर हिन्दुन की सब राह सु नौरंग साह करी अति मैली॥ साहि तनै सिव के डर सों तुरकौ गहि वारिधि की गति पैली। वेद पुरानन की चरचा अरचा दुज देवन की फिरि फैली॥ २९३॥**

भूषण म्हणतो, अगोदर तर कलिकालाची रहाटी; त्यांतून हिन्दूंचे वागण्याचे सर्व मार्ग ( आचारादि ) औरंगजेबानें अतिशय मळिण करून टाकलेले; पण शहाजीपुत्र शिवरायाच्या दर्पामुळें तुर्कांना समुद्रापलीकडचा

रस्ता धरावा लागला. त्यामुळें पुन्हा वेदपुराणांची चर्चा व देवब्राह्मणांची ( पूजा ) अर्चा सुरू झाली. (२९३)

## ८१ अतद्गुण—लक्षण, दोहा

जहँ संगति ते और को गुन कछूक नहिं लेत।
ताहि अतद्गुन कहत हैं भूषन सुकवि सचेत ॥ २९४ ॥

जेथें संगतीमुळें इतरांच्या गुणांचें ग्रहण होत नाहीं असें वर्णन करण्यांत येतें तेथें 'अतद्गुण' अलंकार होतो. (२९४)

उदा०—मालती सवैया

दीन दयालु दुनी प्रतिपालक जे करता निरम्लेच्छ मही के। भूषन भूधर उद्धरिबो सुने और जिते गुन ते सब जी के ॥ या कलि मैं अवतार लियो तऊ तेई सुभाय सिवाजी बली के। आय धर्‍यो हरि ते नररूप पै काज करै सिगरे हरि ही के ॥ २९५ ॥

भूषण म्हणतो, शिवराज दीनवत्सल, जगाचा प्रतिपाळ करणारा व भूतल निम्लेंच्छ करणारा आहे. पर्वतांचा उद्धार करणें (उचलणें) इत्यादि हरीच्या ठिकाणीं जितके कांहीं गुण आहेत ते सर्व या शिवाजींच्या ठिकाणीं वास्तव्य करितात. बलिष्ठ शिवाजीनें या कलिकाळांत जरी अवतार धारण केला आहे तरी त्याचा स्वभाव हरीसारखाच आहे. नरसिंहाचें रूप सोडून जरी नुसतें नराचें रूप यानें धारण केलें आहे, तरीपण हा कामें सर्व हरीचींच करतो आहे. (२९५)

उदा० २ रें—कवित्त, मनहरण

सिवाजी खुमान तेरो खग्ग बढे मान बढे मानस लौं बदलत कुरुष उछाह ते। भूषन भनत क्यों न जाहिर जहान होत प्यार पाय तो से ही दिपत नरनाह ते ॥ परताप फेटो रहो सुजस लपेटो रहो बरतन खरो नर पानिप अथाह ते।

**रंगरंग रिपुन के रकत सों रंगो रहै रातोदिन रातो पै न रातो होत स्याह ते ॥ २९६ ॥**

हे शिवाजी! तुझ्या तरवारीची (शौर्याची) कीर्ति वाढो, ही तुझी तरवार उद्दीपित मनाप्रमाणें क्रोध आणि प्रसन्नता यामुळें बदलत राहते. भूषण म्हणतो, ती (तरवार) तुमची लाडकी असल्यानें तर जगप्रसिद्ध होऊन इतर रावराजांना दिपवूं लागली आहे. प्रताप आणि सुयश हें तींत गुंडाळलेलें आहे. तसेंच मनुष्याच्या अपार मर्यादेचें ती (तरवार) भाजन आहे. शत्रूंच्या नानाप्रकारच्या रंगांनीं रात्रंदिवस ती रंगून जाते; पण त्या तरवारीस लागलेला लाल रंग कांहीं काळा होत नाहीं. (२९६)

उदा० २ रें—दोहा

**सिव सरजा की जगत मैं राजत कीरति नौल।**
**अरि तिय दृग अंजन हरे, तऊ धौल की धौल ॥ २९७ ॥**

(शिवाजी) शत्रु-स्त्रियांच्या नेत्रांतील अंजन हरण करितो (पतींना मरण आलें असतां स्त्रिया डोळ्यांत काजळ घालणें सोडून देतात). तरीपण जगःतांत विराजणारी त्याची कीर्ति शुभ्रच्या शुभ्रच. हें मोठें नवल आहे. (२९७)

## ८२ अनुगुण-लक्षण, दोहा

**जहाँ और के संग ते, बढै आपनो रङ्ग।**
**ता कहँ अनुगुन कहत हैं, भूषन बुद्धि उतंग ॥ २९८ ॥**

इतरांच्या संसर्गानें आपला गुण वाढतो असें वर्णन जेथें होतें तेथें 'अनुगुण' अलंकार होतो. (२९८)

उदा०—कवित्त मनहरण

**साहि तनै सरजा सिवा के सनमुख आय कोऊ बचि जाय न गनीम भुज बल मैं। भूषन भनत भौंसिला की दिल दौर सुनि धाक हीं मरत म्लेछ औरँग के दल मैं॥ रातो दिन रोवत रहत यवनी हैं सोक परोई रहत दिली आगरे**

सकल मैं । कज्जल कलित अँसुवान के उमङ्ग सङ्ग दूनो होत रोज रंग जमुना के जल मैं ॥ २९९ ॥

शहाजीपुत्र शिवाजीसमोर बाहुबलांत टिकणारा कोणी शत्रू राहिला नाहीं. भूषण म्हणतो, त्या भोंसल्याच्या मनांतील नुसते ( प्रभावशाली ) विचार ऐकूनच औरंगजेबाच्या सैन्यांतील म्लेंछ मरत आहेत. यवन स्त्रियांच्या रात्रंदिवस रडण्यानें सर्व दिल्ली आणि आग्रा शोकानें व्यापून गेलीं आहेत; त्यामुळें काजळ मिसळलेल्या अश्रूंनीं यमुनेच्या पाण्याचा रंग रोज दुप्पट काळा होऊं लागला आहे. (२९९)

## ८३ मीलित—लक्षण, दोहा

सदृस बस्तु मैं मिलि जहाँ, भेद न नेक लखाय ।
ताको मीलित कहत हैं, भूषन जे कविराय ॥ ३०० ॥

एकाच धर्माच्या अनेक वस्तू अशा प्रकारें एकत्रित होतात कीं, ज्यांच्यांत यत्किंचित्‌देखील भेद दिसून येत नाहीं तेथें 'मीलित' अलंकार होतो. (३००)

### उदा०—कवित्त, मनहरण

इन्द्र निज हेरत फिरत गजइन्द्र अरु इन्द्र को अनुज हेरै दुगध नदीस को । भूषन भनत सुर सरिता को हंस हेरै विधि हेरै हंस को चकोर रजनीस को ॥ साहि तनै सिव-राज करनी करी है तैं जु होत है अचम्भो देव कोटियो तैंतीस को । पावत न हेरे तेरे जस मैं हिराने निज गिरि को गिरीस हेरैं गिरिजा गिरीस को ॥ ३०१ ॥

भूषण म्हणतो, हे शहाजीपुत्र शिवाजी ! तूं जी करणी केली आहेस त्यामुळें तेहतीस कोटी देवांना आश्चर्य वाटत आहे. तुझ्या शुभ्र यशः-समुद्रांत इंद्र आपला हत्ती ( ऐरावत ) शोधीत आहे तर त्याचा धाकटा भाऊ वामन क्षीर समुद्र ( कुठें लपला हें ) पहात आहे. क्षीरसमुद्रास गंगा, गंगेस हंस, हंसास ब्रह्मदेव हुडकीत आहे. तसेंच चकोर चंद्रास, चंद्र महा-

देवास, महादेव आपल्या हरवलेल्या कैलास पर्वतास; तर गिरिजा महादेवास शोधीत फिरत आहे (पण कोणाचा कोणास पत्ता लागत नाहीं). (३०१)

## ८४ उन्मीलित—लक्षण दोहा

**सदृश वस्तु में मिलत पुनि, जानत कौनेहु हेत ।**
**उनमीलित तासों कहत, भूषन सुकवि सचेत ॥ ३०२ ॥**

एकादी वस्तु आपल्या धर्माच्या असलेल्या इतर वस्तूंतून कांहीं कारणानें निराळी ओळखूं येते तेथें 'उन्मीलित' अलंकार होतो. (३०२)

उदा०—दोहा

**सिव सरजा तव सुजस मैं, मिले धौल छबि तूल ।**
**बोल बास ते जानिए, हंस चमेली फूल ॥ ३०३ ॥**

हे सर्जा शिवाजी! तुझ्या शुभ्र व निष्कलंक यशांत तत्समान शोभा (वर्ण) असणारे हंस आणि चमेली (जाईजुई)चीं फुलें हीं शब्दावरून किंवा वासावरून ओळखावीं लागतात. (३०३)

## ८५ सामान्य—लक्षण, दोहा

**भिन्न रूप जहँ सदृस ते, भेद न जान्यो जाय ।**
**ताहि कहत सामान्य हैं, भूषन कवि समुदाय ॥ ३०४ ॥**

रूप निराळें असूनहि सारखेपणामुळें भेद दिसून येत नाहीं तेथें 'सामान्य' अलंकार होतो. (३०४)

उदा०—मालती सवैया

**पावस की यक राति भली सु महाबली सिंह सिवा गमके ते। म्लेच्छ हजारन ही कटिगे दस ही मरहट्टन के झमके ते॥ भूषन हालि उठे गढ़ भूमि पठान कबंधन के धमके ते। मीरन के अवसान गये मिलि धोपनि सों चपला चमके ते ॥ ३०५ ॥**

महाबली शिवसिंहाच्या गर्जनेपेक्षां पावसाळ्यांतील एकादी रात्र बरी. इहाच मराठ्यांच्या चमकण्यानें हजारों म्लेंछ कापले गेले. भूषण म्हणतो, (इतकेंच नव्हे) पठाणांच्या धडांच्या नाचण्यानें किल्ल्याखालील जमीन हदरूं लागली. विजेप्रमाणें तळपणाऱ्या तरवारींची चमक पाहून मोठमोठ्या सरदारांचें अवसान खचलें. (३०५)

## ८६ विशेषक—लक्षण, दोहा

भिन्न रूप सादृश्य मैं, लहिए कछू बिसेख।
ताहि विशेषक कहत हैं, भूषन सुमति उलेख ॥३०६॥

निरनिराळ्या रूपांच्या सारखेपणांत कांहीं विशेषता दिसून येते तेथें 'विशेषक' अलंकार होतो. (३०६)

उदा०—कवित्त मनहरण

अहमदनगर के थान किरबान लै कै नवसेरी खान ते खुमान् भिन्यो बल ते। प्यादन सों प्यादे पखरैतन सों पखरेत बखतर वारे बखतर वारे हल ते ॥ भूषन भनत एते मान घमसान भयो जान्यो न परत कौन आयो कौन दल ते। सम वेष ताके, तहाँ सरजा सिवा के बाँके बीर जाने हाँके देत, मीर जाने चलते ॥ ३०७॥

अहमदनगर येथें नवशेरी (नौशेर) खानाबरोबर शिवाजी हातीं तरवार घेऊन लढला. भूषण म्हणतो, प्याद्यांशीं प्यादे, स्वारांशीं स्वार, चिलखतवाल्यांशीं चिलखतवाले निकरानें लढले. हें युद्ध इतकें भयंकर झालें कीं, उभय पक्षांकडील वीरांचा पोषाख सारखा असल्यामुळें कोण योद्धा कोणत्या पक्षाचा हें समजेना; तरीपण शिवाजीचे वीर विजयघोषानें व यवन सरदार युद्धांतून पळ काढल्यामुळें ओळखूं येत होते. (३०७)

## ८७ पिहित—लक्षण, दोहा

परके मन की जानि गति, ताको देत जनाय।
कछू क्रिया करि कहत हैं, पिहित ताहि कविराय॥३०८॥

दुसऱ्याच्या मनांतील उद्देश ओळखून क्रियाद्वारां त्याची जाणीव जेथें करून दिली जाते तेथें 'पिहित' अलंकार होतो. (३०८)

उदा०—दोहा

गैर मिसल ठाढ़ो सिवा, अन्तरजामी नाम।
प्रकट करी रिस साह को, सरजा करि न सलाम ॥३०९॥

अंतर्ज्ञानी असलेल्या शिवाजीनें (स्वतःस) अयोग्य स्थानीं ( पांचहजारी सरदारांच्या रांगेंत ) उभें केल्यामुळें क्रुद्ध होऊन बादशहास सलाम केला नाहीं. (३०९)

उदा० २ रें—दोहा

आनि मिल्यो अरि यों गह्यो, चखन चकत्ता चाव।
साहि तनै सरजा सिवा, दियो मुच्छ पर ताव ॥३१०॥

शत्रू येऊन भेटला यामुळें औरंगजेबाला आनंद वाटला पण शहाजी-पुत्र शिवाजीनें मिशीवर ताव दिला. ( शिवाजी आपल्या कबज्यांत सांपडला, यामुळें औरंगजेबास आनंद झाला; पण शिवाजी त्याचें अंतरंग ओळखून होतांच, हातावर तुरी देऊन तुझ्या कबजांतून निसटून जाईन या भावानेंच त्यानें मिशीवर ताव दिला.) (३१०)

८८ प्रश्नोत्तर—लक्षण, दोहा

कोऊ बूझै बात कछू, कोऊ उत्तर देत ॥
प्रश्नोत्तर ताको कहत, भूषन सुकवि सचेत ॥ ३११ ॥

कोणीं प्रश्न करावा व कोणीं उत्तर द्यावें असें जेथें वर्णन करण्यांत येतें तेथें 'प्रश्नोत्तर' अलंकार होतो. (३११)

उदा०—मालती सवैया

लोगन सों भनि भूषन यों कहै खान खवास कहा सिख देहौ। आवत देसन लेत सिवा सरजै मिलिहौ भिरिहौ कि भगैहौ ॥ एदिल की सभा बोलि उठी यों सलाह करौऽव

कहाँ भाजि जैहौ । लीन्यो कहा लरिकै अफजल्ल कहा लरि
कै तुमहू अब लैहौ ॥ ३१२ ॥

भूषण म्हणतो, ( आदिलशहाच्या सभेंत ) खवासखान लोकांना विचारीत आहे कीं, 'शिवाजी देश जिंकीत येऊं लागला आहे त्याच्याशीं तुम्ही तह कराल किंवा लढाल अथवा पळून जाल ?' सर्व सभेनें ( एकमुखानें ) उत्तर दिलें कीं, आतां तहच करावा, पळून जावें तरी कुठें ? अफजलखानानें लढून काय मिळविलें तें तुम्ही आतां मिळविणार आहां. (३१२)

उदा० २ रें—दोहा

को दाता को रन चढ़ो, को जग पालनहार।
कवि भूषन उत्तर दियो, सिव नृप हरि अवतार ॥३१३॥

दाता कोण, योद्धा कोण, जगाचें पालन करणारा कोण ? (ह्या प्रश्नाचें) भूषण कवीनें उत्तर दिलें कीं, 'हरीचा अवतार शिवाजी'. (३१३)

८९ व्याजोक्ति—लक्षण, दोहा

आन हेतु सों आपनो, जहाँ छिपावै रूप।
व्याज उकति तासों कहत, भषन सुकवि अनूप ॥ ३१४ ॥

जेथें आपला उद्देश एकाद्या कारणानें छपविला जातो तेथें 'व्याजोक्ति' अलंकार होतो. (३१४)

उदा०—मालती सवैया

साहिन के उमराव जितेक सिवा सरजा सब लूटि लए हैं।
भूषन ते बिन दौलति ह्वै कै फकीर व्है देस बिदेस गए हैं॥
लोग कहैं इमि दच्छिन जेय सिसौदिया रावरे हाल ठए हैं।
देत रिसाय कै उत्तर यों हमहीं दुनियाँ ते उदास भए हैं॥३१५॥

बादशहांचे जितके म्हणून सरदार ( शिवाजीवर चाल करून आले ) होते, ते सर्व शिवाजीनें लुटले. भूषण म्हणतो, ते सर्व सरदार दरिद्री बनून फकिरी पत्करून देशोधडीस लागले. लोक ह्या सरदारांस विचारतात, 'तुमची अशी स्थिति दक्षिण जिंकणाऱ्या शिसोदिया वंशज शिवाजीनें

केली कीं काय?' ते चरफडून उत्तर देतात कीं, छे, आम्हीच दुनियेस वैतागून गेलों आहों. (३१५)

उदा० २ रें, दोहा

सिवा बैर औरंग बदन, लगी रहै नित आहि।
कवि भूषन बूझे सदा, कहै देत दुख साहि ॥ ३१६ ॥

शिवाजीच्या वैरानें औरंगजेबाच्या तोंडून नित्य 'हाय हाय' असे उद्गार निघत आहेत. भूषण कवीनें याचें कारण विचारिलें असतां, औरंगजेब म्हणाला, राज्याच्या दगदगीनें हें दुःख होत आहे. (३१६)

९० लोकोक्ति एवं छेकोक्ति—लक्षण, दोहा

कहनावति जो लोक की, लोक उकति सो जानि।
जहाँ कहत उपमान है, छेक उकति तेहि मानि ॥ ३१७ ॥

लोकांत प्रसिद्ध असलेल्या म्हणीचें जेथें वर्णन केलें जातें तेथें 'लोकोक्ति' आणि लोकोक्ति जेथें उपमान असते तेथें 'छेकोक्ति' अलंकार होतो.(३१७)

लोकोक्ति उदा०—दोहा

सिव सरजा की सुधि करौ, भली न कीन्ही पीव।
सूबा ह्वै दच्छिन चले, धरे जात कित जीव? ॥ ३१८ ॥

हे प्रिय! तुम्हांला त्या सर्जा शिवाजीचें स्मरण आहे काय? तुम्ही दक्षिणेंत सुभेदार बनून चाललां खरें, पण आपले प्राण कोठें ठेवणार? तुम्हीं हें कांहीं बरें केलें नाहीं. (३१८)

छेकोक्ति उदा०—दोहा

जे सोहात सिवराज को, ते कवित्त रसमूल।
जे परमेश्वर पैं चढ़ैं, तेई आछे फूल ॥ ३१९ ॥

परमेश्वराला वाहिलीं जाणारींच फुलें जशीं धन्य, तद्वतच शिवरायाला शोभविणारी कविताच रसभरित होय. (३१९)

उदा० २ रें–किरिटी सवैया

औरँग जो चढ़ि दक्खिन आवै तो ह्यां ते सिधावै सोऊ विनु कप्पर। दीनो मुहीम को भार बहादुर छागो सहै क्यों गयन्द को झप्पर॥ सासता खाँ सँग वे हठि हारे जे साहब सातएँ ठीक भुवप्पर। ये अब सूबहू आवैं सिवापर काल्हि के जोगी कलींदे को खप्पर॥ ३२०॥

औरंगजेब दक्षिणेवर चढाई करून येतो खरा, पण येथें त्यास आपल्या अंगावरील कपडादेखील गमावून जावें लागतें. (म्हणून एकदां) मोहिमेचा भार बहादुरखानावर सोंपविला, पण तो शिवाजीपुढें कसा टिकाव धरणार? बकरा कुठें हत्तीची धाड सहन करूं शकतो? शायस्तेखानाबरोबर असलेले ते हट्टी वीर हरून सातव्या लोकाच्या मालकाजवळ (देवाजवळ)गेले आहेत. आतां हे सुभेदार होऊन शिवाजीवर येऊं पाहात आहेत. 'कालचे जोगी आणि टरबुजाचें खापर' (नुकत्याच बनलेल्या जोग्यास 'कशकोल'–नारळाचें बनविलेलें भिक्षापात्र) कोठून मिळणार? (यापूर्वी मोठमोठे सरदार येऊन गेले. त्यांच्यानें शिवाजीचें कांहींदेखील झालें नाहीं. मग आतां हे काल बनलेले सुभेदार येऊन काय करणार?) (३२०)

## ९२ वक्रोक्ति–लक्षण, दोहा

जहाँ श्लेष सों काकु सों, अरथ लगावै और।
बक्र उकति ताको कहत, भूषन कवि सिरमौर॥ ३२१॥

जेथें श्लेषानें अथवा प्रश्नानें (काक्वर्थ) दुसरा अर्थ केला जातो तेथें 'वक्रोक्ति' अलंकार होतो. (३२१)

उदा०–श्लेष वक्रोक्ति–कवित्त मनहरण

साहि तनै तेरे बैर बैरिन को कौतुक सों बूझत फिरत कहौ काहे रहे ताचि हौ?। सरजा के डर हम आए इतै भाजि तब सिंह सों डराय याहू ठौर ते उकचि हौ॥ भूषन भनत

वै कहैं कि हम सिव कहैं तुम चतुराई सों कहत बात राचे हौ। सिव जापै रूठैं तौ निपट कठिनाई तुम बैर त्रिपुरारि के त्रिलोक में न बांचे हौ॥ ३२२॥

हे शहाजीपुत्र! तुझ्याशीं वैर करणाऱ्या शत्रूंना (लोक) कौतुकानें विचारीत फिरत आहेत कीं, तुम्ही असे चिंताग्रस्त कां आहां? (शत्रू म्हणतात–) सर्जा (शिवाजी)च्या भीतीनें आम्ही इथें पळून आलों. (लोक म्हणतात–) मग येथूनदेखील सिंहाला भिऊन तुम्ही पळून जाल कीं काय? (कारण जेथें तुम्ही पळून आलां आहां तेथें त्या सर्जाचेंच राज्य आहे.) भूषण म्हणतो, (लोकांनीं असें विचारिल्यावर) शत्रू म्हणतात कीं, आम्ही तर शिव म्हणतों (शिवाजीला भ्यालों असें म्हणतों). पण तुम्हीमात्र चतुराईनें त्याचा अर्थ निराळाच करितां. (लोक म्हणतात, बरें. शिवच कां होईना;) पण शिव क्रुद्ध झाले तरी कठिणच; कारण त्या त्रिपुरारीशीं वैर करून तुम्ही त्रैलोकांतदेखील राहूं शकणार नाहीं. (३२२)

उदा०–**काकु वक्रोक्ति**–कवित्त, मनहरण

सासता खाँ दक्खिन को प्रथम पठायो तेहि बेटा के समेत हाथ जाय कै गँवायो है। भूषन भनत जौलौं भेजौ उत औरै तिन वे ही काज बरजोर कटक कटायो है। जोई सूबेदार जात सिवाजी सो हारि तासों अवरँग साहि इमि कहै मन भायो है। मुलुक लुटायो तौ लुटायो, कहा भयो? तन आपनो बचायो महाकाज करि आयो है॥ ३२३॥

शायस्तेखानास प्रथम दक्षिणेंत पाठविलें, तो आपल्या मुलासुद्धां स्वतःच्या हात गमावून बसला. भूषण म्हणतो, पुन्हा दुसऱ्या एकाद्या सरदारास दक्षिणेंत पाठवीपर्यंत त्यानें विनाकारण व जबरदस्तीनें आपल्या (बरोबरचें) सैन्य कापविलें. जो कोणी सुभेदार शिवाजीवर जाऊन पराभूत होऊन येत होता, त्यास बरें वाटावें म्हणून औरंगजेब म्हणत असे, 'मुलूख लुटला'

तर लुटला (कांहीं हरकत नाहीं); तुम्ही आपला प्राण वांचवून आलां हें मोठेंच काम केलें. (३२३)

उदा० २ रें—दोहा

करि मुहीम आये कहत, हजरत मनसब दैन ।
सिव सरजा सो जंग जुरि, ऐहैं बच्चिके है न ॥ ३२४ ॥

हजरत औरंगजेब मोहिमेवर जाऊन येणाऱ्या सरदारास मनसब देण्यास सांगत आहेत ! (कारण त्यांना माहीत आहेच कीं,) सर्जा शिवाजीशीं युद्ध केल्यावर कोणी वांचून येणार नाहीं व मनसब देण्याचें कारण पडणार नाहीं. (३२४)

## ९३ स्वभावोक्ति—लक्षण, दोहा

साँचो तैसो बरनिए, जैसो जाति-स्वभाव ।
ताहि सुभावोकति कहत, भूषन जे कबिराव ॥ ३२५ ॥

जाती-स्वभावाचें खरेंखुरें वर्णन जेथें करण्यांत येतें तेथें 'स्वभावोक्ति' अलंकार होतो. (३२५)

उदा०—मनहरण दंडक

दान समै द्विज देखि मेरुहू कुबेर हु की सम्पति लुटायबे को हियो ललकत है । साहि के सपूत सिव साहि के बदन पर सिव की कथान मैं सनेह झलकत है ॥ भूषन जहान हिन्दुवान के उबारिबे को तुरकान मारिबे को बीर बलकत है । साहिन सों लरिबे की चरचा चलत आनि सरजा के दृगन उछाह छलकत है ॥ ३२६ ॥

दान करतेवेळीं ब्राह्मण पाहतांच कुबेराची संपत्ति लुटून मेरुपर्वता-एवढी यावी इतका शिवाजीच्या मनांत उल्हास उत्पन्न होतो; शहाजी-पुत्र शिवशहाच्या मुखावर शिवकथांविषयीं प्रेम झळकत आहे. भूषण म्हणतो, जगांत हिन्दूंचा उद्धार करण्याकरितां व म्लेंच्छांचा संहार

करण्याकरितां हा वीर (पुनः पुनः) उत्तेजित होतो. बादशहाशीं लढण्याची चर्चा (कुठें) निघतांच ह्या सर्जाच्या डोळ्यांत अपूर्व उत्साह उचंबळून येतो. (३२६)

उदा० २ रें–कवित्त मनहरण

काहू के कहे सुने ते जाही ओर चाहैं ताही ओर इकटक घरी चारिक चहत हैं। कहे ते कहत बात कहे ते पियत खात भूषन भनत ऊँची सांसन जहत हैं॥ पौढ़े हैं तो पौढ़े बैठे बैठे खरे खरे हम को हैं कहा करत यों ज्ञान न गहत हैं। साहि के सपूत सिव साहि तव बैर इमि साहि सब रातौ दिन सोचत रहत हैं ॥ ३२७॥

भूषण म्हणतो, शहाजीपुत्र शिवाजीशीं वैर केल्यामुळें सर्व बादशहा रात्रंदिवस चिंताग्रस्त झाले आहेत. (दरबारी लोकांची स्थिति तर अशी झाली आहे कीं,) कोणाच्या कांहीं सांगण्या–ऐकण्यावरून जिकडे दृष्टि जाईल तिकडे चार चार घटका एकसारखी टक लावून पहात बसावें, कोणी बोललें तर बोलावें, कोणी खा प्या म्हटल्यास खावें प्यावें, दीर्घ निश्वास सोडीत बसावें, निजले, तर निजले, बसले तर बसले, उभे तर उभेच. आम्ही कोण? काय करीत आहों? ह्याचेंदेखील त्यांना भान राहिलें नाहीं. (३२७)

उदा० ३ रें–मनहरण दंडक

उमड़ि कुड़ाल मैं खवासखान आए भनि भूषन त्यों धाए सिवराज पूरे मन के। सुनि मरदाने बाजे हय हिहनाने घोर मूछें तरराने मुख बीर धीर जन के॥ एकै कहैं मार मार सम्हरि समर एकै म्लेच्छ गिरे मार बिच बेसम्हार तन के। कुण्डन के ऊपर कड़ाके उठैं ठौर ठौर जीरन के ऊपर खड़ाके खड़गन के॥ ३२८॥

भूषण म्हणतो, खवासखान कुडाळावर अतिवेगानें चाल करून आला असें समजतांच पूर्ण धाडशी शिवाजी तिकडे धांवला. रणवाद्यें ऐकून घोडे खिंकाळूं लागले, व धैर्यशाली वीर मिशांवर ताव देऊं लागले; कोणी 'मारा', 'हाणा', 'संभाळून युद्ध करा' असें म्हणूं लागले तर म्लेंच्छ लोक मारा सहन न झाल्यामुळें धडाधड पडूं लागले. लोखंडी चिलखतें व टोपा ह्यांवरून खड्गाचे तडाखे बसूं लागले. (३२८)

उदा० ४ थें—मनहरण दंडक

आगे आगे तरुन तरायले चलत चले तिनके अमोद मन्द मन्द मोद सकसै। अड़दार बड़े गड़दारन के हाँके सुनि अड़े गैर गैर माहिं रोसरस अकसै॥ तुण्डनाय सुनि गरजत गुञरत भौंर भूषन भनत तेऊ महा मद छकसै। कीरति के काज महराज सिवराज सब ऐसे गजराज कविराजन को बकसै॥ ३२९॥

मोठ्या डौलानें मंद मंद पावलें टाकणारे, मोठे अडेल, माहुतांचे कर्ण-कठोर शब्द ऐकतांच रागांत येऊन गल्लोगल्लीं अडणारे, (रण)वाद्यांचा ध्वनि ऐकतांच गर्जना करणारे, एकसारखा मदस्राव होऊं लागल्यामुळें भ्रमर ज्यां(च्या गंडस्थलां)वर गुंजारव करीत आहेत, असे तरुण आणि चपल हत्ती, (भूषण म्हणतो,) हे शिवराज! कीर्तीसाठीं तुम्हीं कविजनांला देऊन टाकले. (३२९)

## ९४ भाविक—लक्षण, दोहा

भयो, होनहारो अरथ, बरनत जहँ परतच्छ।
ताको भाविक कहत है, भूषन कवि मतिस्वच्छ॥ ३३०॥

भूत आणि भविष्यकालीन विषयांचें वर्तमानकालाप्रमाणें जेथें वर्णन करण्यांत येतें तेथें 'भाविक' अलंकार होतो. (३३०)

उदा०—कवित्त मनहरण

अजौं भूतनाथ मुण्डमाल लेत हरषत भूतन अहार लेत अजहूँ उछाह है। भूषन भनत अजौं काटे करबालन के कारे

कुञ्जरन परो कठिन कराह है ॥ सिंह सिवराज सलहेरि के समीप ऐसो कीन्हो कतलाम दिली दल को सिपाह है। नदी रन मण्डल रुहेलन रुधिर अजौं अजौं रवि मण्डल रुहेलन की राह है ॥ ३३१ ॥

भूतनाथ ( महादेव ) अद्यापहि आनंदानें मुण्डमाळा धारण करीत आहेत व त्यांचे गण (भुतें) मोठ्या उत्साहानें आहार घेत आहेत. भूषण म्हणतो, तरवारीनें जखमी झालेले मोठमोठे काळे कुट्ट हत्ती ( होणाऱ्या वेदनांनीं ) किंकाळ्या फोडीत आहेत. शिवसिंहानें सालेरीजवळ दिल्लीच्या सैन्याची अशी कत्तल केली कीं, रोहिल्यांच्या रक्ताच्या नद्या अद्यापि वाहत आहेत व रोहिले सूर्यमंडळाकडे जाण्याच्या मार्गावर आहेत. (३३१)

उदा० २ रें–कवित्त मनहरण

गजघटा उमड़ी महा घनघटा सी घोर भूतल सकल मदजल सों पटत है। बेला छाँड़ि उछलत सातौ सिंधु वारि मन मुदित महेस मग नाचत कढ़त है। भूषन बढ़त भौंसिला भुवाल को यों तेज जेतो सब बारहौ तरनि में बढ़त है। सिवाजि खुमान दल दौरत जहान पर आनि तुरकान पर प्रलै प्रगटत है ॥ ३३२ ॥

हत्तींचे कळप मेघसमुदायाप्रमाणें घोर गर्जना करून पृथ्वीवर मद-रूपीं जळाचा वर्षाव करीत आहेत, सातहि समुद्र मर्यादा सोडून उसळूं लागले आहेत; शंकर प्रसन्नांत:करणानें नाचत वागडत आहेत. भूषण म्हणतो, भोसले राजाचें तेज सर्व ऋतूंतील एकवटलेल्या सूर्यतेजाप्रमाणें सारखें वाढत आहे. शिवाजीचें सैन्य पृथ्वीवरून धांवतांना तुर्कांना प्रळय-काळच ओढवला असें वाटतें. (३३२)

९५ भाविक छवि–लक्षण, दोहा

जहँ दूरस्थित वस्तु को, देखत बरनत कोय।
भूषन भूषन राज भनि, भाविक छवि सो होय ॥ ३३३ ॥

दूरस्थित वस्तूचें प्रत्यक्ष पाहिल्याप्रमाणें जेथें वर्णन केलें जातें तेथें 'भाविक छवि' अलंकार होतो. (२३३)

उदा०—मालती सवैया

सूबन साजि पठावत है नित फौज लखे मरहट्टन केरी ।
औरँग आपनि दुग्ग जमाति विलोकत तेरियै फौज दरेरी ॥
साहि तनै सिव साहि भई भनि भूषन यों तुव धाक घनेरी ।
रातहु द्यौस दिलीस तकै तुव सैन कि सूरति सूरति घेरी॥२३४॥

मराठ्यांची नित्यशः येत असलेली फौज पाहून औरंगजेब सुभेदार (सरदार) लोकांना (सैन्यादिकांनीं) सज्ज करून पाठवीत आहे. भूषण म्हणतो, हे शहाजीपुत्र शिवाजी! औरंगजेब आपल्या किल्ल्यांस तुझ्या फौजेनें घेरलेलेच पहातो. त्यामुळें तुझा दर्प असा बसून गेला आहे कीं, दिल्लीपती (औरंगजेब) रात्रंदिवस तुझ्या सैनिकांकडे निरखून पहात आहे. (तरीपण तुझ्या सैनिकांनीं शेवटीं) सुरतेला वेढा दिलाच. (२३४)

९६ उदात्त—लक्षण, दोहा

अति संपति बरनत जहाँ, तासों कहत उदात ।
कै आनै सु लखाइये, बड़ी आन की बात ॥ २३५ ॥

जेथें अति सम्पत्तीचें वर्णन करण्यांत येतें अथवा श्रेष्ठांचें अन्यप्रकारें महत्त्व दाखविलें जातें तेथें 'उदात्त' अलंकार जाणावा. (२३५)

उदा०—कवित्त मनहरण

द्वारन मतंग दीसैं आँगन तुरङ्ग हीसैं बन्दीजन बारन असीस जसरत हैं। भूषन बखानै जरबाफ के सम्याने ताने झालरन मोतिन के झुण्ड झलरत हैं॥ महाराज सिवा के नेवाजे कविराज ऐसे साजि कै समाज तेहि ठौर विहरत हैं। लाल करैं प्रात तहाँ नीलमनि करैं रात याही भाँति सरजा की चरचा करत हैं॥२३६॥

भूषण म्हणतो, ज्यांच्या दाराशीं हत्ती झुलतांना दिसत आहेत, अंगणांत घोडे खिंकाळत आहेत, बंदीजन वारंवार यशोगान करून आशीर्वाद देत आहेत, ज्यांच्या भरजरीच्या ताणलेल्या तंबूंतून मोत्यांच्या झालरी रुळत आहेत अशा त्या शिवाजीमहाराजांच्या कृपेला पात्र झालेले श्रेष्ठ श्रेष्ठ कवि त्या (समारंभाच्या) ठिकाणीं वावरत आहेत आणि सर्जा शिवाजीची चर्चा ( वर्णन ) करतांना म्हणत आहेत कीं, येथें लाला( एक रत्न)च्या योगानें प्रात:काळ व नीलमण्याच्या योगानें सायंकाळ होतो. [अशी ह्या शिव-रायाच्या सम्पत्ति अपार आहे ]. (३३६)

उदा० २ रें–मनहरण

जाहु जनि आगे खता खाहु मंति यारो गढ़ नाह के डरन कहैं खान यौं बखान कै। भूषन खुमान यह सो है जेहि पूना माहिं लाखन में सासता खाँ डार्‍यो बिन मान कै। हिन्दु-वान द्रुपदी की ईजति बचैबे काज झपटि बिराटपुर बाहर प्रमान कै। वहै है सिवाजी जेहि भीम ह्वै अकेले मार्‍यो अफजल कीचक को कीच घमसान कै ॥ ३३७॥

भयभीत झालेला खान ( जहाँ बहादुर ) आपल्या मित्रांस म्हणतो आहे, मित्रांनो ! तुम्ही त्या शिवाजीच्या समोर जाऊं नका, व आपला जीव धोक्यांत घालूं नका. हा तोच शिवाजी आहे; कीं ज्यानें पुण्यांत लाखों लोकां-च्या समुदायांत शायस्तेखानाचा अपमान केला आहे. भूषण म्हणतो, हा शिवाजी तोच आहे; कीं ज्यानें एकट्यानें भीम होऊन हिन्दुत्वरूप द्रौपदीची अब्रू वांचविण्याकरितां अफजलरूप कीचकाशीं घोर युद्ध करून त्यास ठार मारिलें. (३३७)

उदा० ३ रें–दोहा

या पूना मैं मति टिकौ, खान बहादुर आय।
ह्याँई साइसखान को, दीन्हीं सिवा सजाय ॥ ३३८॥

अहो खान बहादुर! तुम्ही ह्या पुण्यांत येऊन राहूं नका; (तुम्हांला माहित असेलच कीं,) येथेंच शायस्तेखानाला शिवाजीनें शिक्षा केली होती. (३३८)

## ९७ अत्युक्ति–लक्षण, दोहा

जहाँ सूरतादिकन की, अति अधिकाई होय।
ताहि कहत अति उक्ति हैं, भूषन जे कवि लोय॥ ३३९॥

शौर्यादिकांचें अत्यंत वर्णन जेथें करण्यांत येतें तेथें 'अत्युक्ति' अलंकार होतो. (३३९)

उदा०—कवित्त मनहरण, दंडक

साहि तनै सिवराज ऐसे देत गजराज जिन्हैं पाय होत कविराज बे-फिकिरि हैं। झूलत झलमलात झूलैं जर-बाफन की जकरे जञ्जीर जोर करत किरिरि हैं॥ भूषन भँवर भननात घननात घंट पग झननात मनो घन रहे घिरि हैं। जिनकी गरज सुने दिग्गज बे-आब होत मदाही के आब गड़काब होत गिरि हैं॥ ३४०॥

भूषण म्हणतो, शहाजीपुत्र शिवराज कविराजांना, भरजरीच्या झुली झळकत असलेले, साखळदण्डांनीं जखडल्यामुळें ओढाताण करणारे, गंडस्थळावर भुंगे गुणगुणणारे, घंट्यांचा घणघणाट, व पायांचा (साखळदंडामुळें) झणझणाट होण्यानें जणों काय मेघच घेरून आले आहेत कीं काय असे वाटविणारे, तसेंच ज्यांची गर्जना ऐकतांच दिग्गज निस्तेज होऊन जातात व ज्यांच्या गंडस्थळांतून स्रवणाऱ्या मदांत पर्वतसुद्धां गडप होऊन जातात, असे हत्ती देऊन, निश्चिंत करतात. (३४०)

उदा० २ रें—मनहरण दंडक

आजु यहि समै महाराज सिवराज तुही जगदेव जनक जजाति अम्बरीक सो। भूषन भनत तेरे दान-जल जलधि

**मैं गुनिन को दारिद गयो बहि खरीक सो ॥ चन्द कर किंज-लक चाँदनी पराग उड़-वृन्द मकरन्द बुन्द पुंज के सरीक सो। कुन्द सम कयलास नाक-गंग नाल तेरे जस पुंडरीक को अकास चंचरीक सो ॥ ३४१ ॥**

हे शिवाजी महाराज! सांप्रत तुम्हीच जगदेव, ययातिजनक आणि अम्बरीष आहां. भूषण म्हणतो, तुमच्या दानजलाच्या समुद्रांत गुणीजनांचें दारिद्र्यपर्वताच्या काडीप्रमाणें वाहून गेलें. तुमच्या यशरूपी कमलावर आकाशरूप भ्रमर आहेत, चंद्रकिरणें हीं त्या कमलांतील बिसतंतु, चांदणें हा पराग, नक्षत्रें तोंच मकरन्द, कैलास हें मूळ (कंद) असून आकाशगंगा ही त्या कमळाचा देंठ होय. (३४१)

उदा० ३ रें—दोहा

**महाराज सिवराज के, जेते सहज सुभाय।**
**औरन को अति उक्ति से, भूषन कहत बनाय ॥ ३४२ ॥**

भूषण म्हणतो, शिवाजी महाराजांचे जितके म्हणून साहाजिक गुण आहेत ते इतरांच्या ठिकाणीं अत्युक्तीनें दाखवावे लागतात. (३४२)

## ९८ निरुक्ति—लक्षण, दोहा

**नामन को निज बुद्धि सों, कहिए अरथ बनाय।**
**ताको कहत निरुक्ति हैं, भूषन जे कविराय ॥ ३४३ ॥**

एकाद्या नांवाचा आपल्या बुद्धीप्रमाणें अन्य अर्थ करून दाखविणें यास 'निरुक्ति' अलंकार म्हणतात. (३४३)

उदा०—दोहा

**कविगन को दारिद द्विरद, याही दल्यो अमान।**
**याते श्री सिवराज को, सरजा कहत जहान ॥३४४॥**

कविजनांच्या दारिद्र्यरूप हत्तींचें निर्दलन केल्यामुळें ह्या श्रीशिव-राजाला 'सरजा' असें सर्व जग म्हणत आहे. (३४४)

हरयो रूप इन मदन को, याते भो सिव नाम ।
लियो बिरद सरजा सबल, अरिगजदलि संग्राम ॥३४५॥

याच्या रूपानें मदनाला देखील जिंकिलें म्हणुन याचें नांव 'शिव' असें पडलें; आणि बलिष्ठ शत्रूरूप हत्तींना युद्धांत मारल्यामुळें 'सरजा' हें बीद त्याला मिळालें. (३४५)

उदा० २ रें—कवित्त मनहरण

आजु सिवराज महाराज एक तुहीं सरनागत जनन को दिवैया अभै दान को। फैली महिमंडल बड़ाई चहुँ ओर ताते:कहिए कहाँ लौं ऐसे बडे परिमान को? ॥ निपट गँभीर कोऊ लाँघि न सकत बीर जोधन को रन देत जैसे भाऊ-खान को। दिल दरियाव क्यों न कहैं कविराव तोहिं तो मैं ठहरात आनि पानिप जहान को ॥३४६॥

हे शिवाजी महाराज! आजकाल शरणागताला अभय देणारा एक तूंच आहेस (अशी) भूमंडलांत चहूंकडे तुझी कीर्ति पसरली आहे; त्या अफाट कीर्तीचें कोठवर वर्णन करावें? तूं मोठमोठ्या प्रबल भाऊ खानासारख्या वीरांशीं युद्ध करितोस; पण कोणालाहि तुझ्या अगाध पराक्रमाचा थांग लागत नाहीं. जगांतील सर्व अब्रू तुझ्या ठिकाणीं येऊन राहिली आहे. मग कोणीहि कविश्रेष्ठ तुला 'समुद्रासारख्या विशाल अन्तःकरणाचा तूं आहेस, असें कां न म्हणेल? (३४६)

९९ हेतु—लक्षण, दोहा

"या निमित्त यहई भयो" यों जहँ बरनन होय ।
भूषन हेतु बखानहीं, कवि कोविद सबकोय ॥३४७॥

'यामुळें असें झालें' असें वर्णन जेथें होतें तेथें 'हेतु' नामक अलंकार होतो. (३४७)

उदा०—कवित्त मनहरण

दारुन दइत हरनाकुस बिदारिबे को भयो नरसिंह रूप तेज बिकरार है। भूषन भनत त्योंहीं रावन के मारिबे को

रामचंद्र भयो रघुकुल सरदार है ॥ कंस के कुटिल बल
बंसन विधुंसिबे को भयो यदुराय वसुदेव को कुमार है ।
पृथ्वी पुरहूत साहि के सपूत सिवराज म्लेच्छन के मारिबे
को तेरो अवतार है ॥ ३४८ ॥

भूषण म्हणतो, हिरण्यकश्यप नांवाच्या भयंकर दैत्याचें विदारण करण्याकरितां अकाळविक्राळ स्वरूप धारण करून नरसिंह प्रकट झाला, तसेंच रावणाचें निर्दलन करण्याकरितां रघुकुलांत वीर रामचंद्र झाला, आणि पापी व बलिष्ठ अशा कंसाचें पारिपत्य करण्याकरितां यदुश्रेष्ठ वसुदेवाचा कुमार श्रीकृष्ण अवतीर्ण झाला; (तद्वतच) हे पृथ्वीवरील इंद्र, शहाजीपुत्र शिवराज! म्लेंच्छांचें निर्दलन करण्याकरितां तुझा अवतार आहे. (३४८)

## १०० अनुमान—लक्षण, दोहा

जहँ काज ते हेतु कै, जहँ हेतु ते काज ।
जानि परत अनुमान तहँ, कहि भूषन कविराज ॥ ३४९ ॥

जेथें कारणापासून कार्य व कार्यापासून कारण जाणिलें जातें तेथें 'अनुमान' अलंकार होतो. (३४९)

### उदा०—कवित्त मनहरण, दंडक

चित्त अनचैन आँसू उमगत नैन देखि बीबी कहै बैन
मियाँ कहियत काहि नै ? । भूषन भनत बूझे आए दरबार ते
कँपत बार बार क्यों सम्हार तन नाहि नै ? ॥ सीनो धक-
धकत पसीनो आयो देह सब हीनो भयो रूप न चितौत
बाँए दाहिनै । सिवाजी की संक मानि गए हौ सुखाय
तुम्हैं जानियत दक्खिन को सूबा करो साहि नै ॥ ३५० ॥

नेत्रांतून अश्रुवर्षाव होत असलेल्या उद्विग्न पतींस पाहून यवनस्त्रिया म्हणत आहेत, 'अहो तुम्ही बोलत कां नाहीं ?' भूषण म्हणतो, त्या स्त्रिया दरबारांतून कांपत कांपत येणाऱ्या आपल्या पतींस वारंवार विचारीत

आहेत कीं, "तुम्ही आपल्या शरिराचें संरक्षण कां करीत नाहीं? तुमची छाती धडधडूं लागली आहे, सर्वांगाला घाम सुटला आहे, कांति क्षीण होऊन गेली आहे, इकडे तिकडे पाहवत देखील नाहीं, बादशहानें दक्षिणेचा सुभेदार केल्यामुळें शिवाजीच्या भीतीनें तुमची अशी गाळण उडाली आहे कीं काय?" (३५०)

उदा० २ रें—मनहरण दंडक

अंझा सी दिन की भई संझा सी सकल दिसि गगन लगन रही गरद छवाय है । चील्ह गीध बायस समूह घोर रोर करैं ठौर ठौर चारों ओर तम मड़राय है ॥ भूषन अँदेस देस देस के नरेस गन आपस मैं कहत यों गरब गँवाय है । बडो बड़वा को जितवार चहुँघा को दल सरजा सिवा को जानियत इत आय है ॥ ३५१ ॥

सर्व दिशा आणि आकाश धुळीनें भरून गेल्यामुळें दिवस लोपून संध्याकाळ झाली कीं काय असें वाटत आहे; ठिकठिकाणीं घारी, गिधाडें कावळे यांचे समुदाय भयंकर शब्द करीत आहेत; चहूंकडे अंधार पसरला आहे. भूषण म्हणतो, देशोदेशींचे राजे गलिताभिमान होऊन आपापसांत म्हणत आहेत, 'मोठमोठ्यांना जिंकणाऱ्या शिवाजीचें सैन्य इकडे (आपल्यावर) चालून येते कीं काय? (३५१)

## शब्दालंकार प्रारंभः

जे अरथालंकार ते, भूषन कहे उदार ।
अब शब्दालंकार ये, कहत सुमति अनुसार ॥३५२॥

भूषण म्हणतो, आतांपर्यंत अर्थालंकारांचें वर्णन केलें. आतां यथामति शब्दालंकार वर्णन करितों. (३५२)

### १०१ छेक एवं लाट अनुप्रास—लक्षण, दोहा

स्वर समेत अच्छर पदनि आवत सहस प्रकास ।
भिन्न अभिन्न पदन सों, छेक लाट अनुप्रास ॥३५३॥

भिन्न भिन्न पदांतून एकाच प्रकारचे स्वरयुक्त वर्ण अथवा शब्द वारंवार जेथें येतात त्याला 'छेक' किंवा 'लाट' अनुप्रास असें म्हणतात. (३५३)

उदा० - अमृत ध्वनि छंद

दिल्लिय दलन दबाय करि सिव सरजा निरसंक ।
लूटि लियो सूरति सहर बंकक्करि अति डंक ॥
बंकक्करि अति डंकक्करि अस संकक्कुलि खल ।
सौचच्चकित भरोचच्चलिय विमोचच्चखजल ॥
तट्ठट्ठइमन कट्ठट्ठिक सोइ रट्ठट्ठिल्लिय ।
सद्दद्दिस दिसि भद्दद्दबि भइ रद्दद्दिल्लिय ॥३५४॥

सर्जा शिवाजीनें निर्भयपणें दिल्लीच्या सैन्याचें पारिपत्य करून व डंका वाजवून सुरत शहर लुटलें.अशा प्रकारें डंका वाजल्यानें बिचाऱ्या शत्रूंची फार गाळण उडाली; ते आश्चर्यचकित व चिंताग्रस्त होऊन नेत्रांतून अश्रु-वर्षाव करीत भडोच शहराकडे पळाले. वारंवार घोकून (भडोच शहराकडे पळण्याचाच ) विचार त्यांनीं निश्चयपूर्वक ठरविला; यामुळें दिल्ली दबून बसली व चहूंकडे तिचा अपमान झाला. (३५४)

गत बल खान दलेल हुव खान बहादुर मुद्ध ।
सिव सरजा सलहेरि ढिग कुद्धद्धरि किय युद्ध ॥
कुद्धद्धरि किय युद्धद्धवि अरि अद्धद्धरि धरि ।
मुंडड्डरि तहँ रुंडड्ड डकरत डुंडड्डग भरि ॥
खेदिद्दर बर छेदिद्दय करि मेदद्दधि दल ।
जंगग्गति सुनि रंगग्गलि अवरंगग्गत बल ॥३५५॥

सर्जा शिवाजीनें साल्हेरी जवळ जेव्हां रागारागानें युद्ध केलें, तेव्हां दिलेरखान तर स्तंभित व हतबल झाला. त्या युद्धांत शत्रूकडील वीरांचा फडशा पाडिला; तेव्हां शिरावेगळीं झालेलीं धडें डुरकण्या फोडूं लागलीं व कबंध इकडून तिकडे पळूं लागले. शत्रुसैन्यास मोर्चांतून हुसकून कापून काढलें व त्यांचा मेद दह्याप्रमाणें घुसळला. ह्या युद्धांत अशी झालेली

दुर्गंत औरंगजेबानें जेव्हां ऐकिली तेव्हां तो निस्तेज झाला व त्याचें अवसान खचलें. (३५५)

लिय धरि मोहकम सिंह कहँ अरु किसोर नृप-कुम्भ।
श्री सरजा संग्राम किय धुम्मिम्मधि करि धुम्म॥ धुम्मिम्मधि किय धुम्मम्माड़ि रिपु जुम्मम्मलि करि। जंगग्गरजि उतंगग्गरब मतंगग्गन हरि॥ लक्खक्खन रन दक्खक्खलनि अलक्ख किखति भरि। मोलल्लाह जस नोलल्लरि बहलोलल्लिय धरि॥ ३५६॥

श्रीसरजा शिवाजीनें धामधूम करून युद्ध केलें व मोहकमसिंह आणि कुमार किशोरसिंह यास धरिलें. ह्या युद्धांत शिवसिंहानें मोठ्यानें गर्जून व म्लेच्छ मुखें मर्दून मोठमोठ्या गर्विष्ठ शत्रुगजांचा गर्व हरण केला. युद्धांत लाखो दक्ष शत्रूंना पराजित करून अशा रीतीनें मारून टाकले कीं, पृथ्वी दिसेनाशी झाली. ह्या युद्धांत (शिवाजीनें) मोठ्या नवलाईनें लढून बहलोलखानास धरून नवीन यश संपादन केलें. (३५६)

उदा० ४ थें

लिय जिति दिल्ली मुलुक सब सिव सरजा जुरि जंग।
भनि भूषन भूपति भजे, भंगग्गरब तिलंग॥
भंगग्गरब तिलंगग्गयउ कलिंगग्गलि अति।
दुन्दद्दबि दुहु दन्दबुलनि बिलन्दद्दहसति॥
लच्छच्छिन करि म्लेच्छच्छय किय स्वच्छ-च्छबि छिति।
हल्लग्गि नरपल्लरि परनल्लिय जिति॥ ३५७॥

भूषण म्हणतो, शिवाजीनें युद्ध करून दिल्ली (पती)चा मुलूख जिंकिला; तेलंग देशच्या राजाचा गर्व नाहींसा होऊन तो पळून गेला; तसेंच कलिंग देशच्या राजाचें अवसान अगदीं गळून गेलें; कारण, उभयतांच्या सैन्यांचा फडशा पडल्यामुळें त्यांना अतिशय दुःख झालें व दहशत बसली. लाखों म्लेंच्छांचा संहार करून पृथ्वीची शोभा निष्कलंक केली. हल्ला करून राजांशीं लढून पन्हाळगड जिंकिला. (३५७)

मुंड कटत कहुँ रुंड नटत कहुँ सुंड पटतघन। गिद्ध लसत कहुँ सिद्ध हँसत सुख वृद्धि रसत मन ॥ भूत फिरत करि बूत भिरत सुर दूत घिरत तहँ। चंडि नचत गन मंडि रचत धुनि डंडि मचत जहँ ॥ इमि ठानि घोर घमसान अति भूषन तेज कियो अटल। सिवराज साहि सुव खग्ग बल दलि अडोल बहलोल दल ॥ ३५८ ॥

भूषण म्हणतो, शहाजी पुत्र शिवरायानें बहलोलखानासारख्या अटल सरदाराच्या सैन्याशीं आपल्या तरवारीच्या जोरावर भयंकर युद्ध करून त्याची अशी दुर्दशा करून सोडली कीं, कुठें वीरांचीं मुंडकीं उडत आहेत तर कुठें धडें नाचत आहेत, कुठें हत्तींच्या सोंडा तुटतुटून पडत आहेत तर कुठें गिधाडें ( आपली खाण्याची चंगळ झाली म्हणून ) संतुष्ट होत आहेत. (प्रेतावर बसून साधनें करणारे) योगी ( आपलीं साधनें सुलभ झाल्यामुळें ) आनंदित झाले आहेत. भुतें इकडे तिकडे फिरून ( वीरांस स्वर्गांत नेण्याकरितां आलेल्या) देवदूतांत मिसळण्याचा प्रयत्न करीत आहेत; चंडि देवी (बली मिळाल्यामुळें प्रसन्न होऊन) नाचत आहे,आणि शिवगण आपली मंडळी जमवून टिपऱ्यांचा हलकल्लोळ माजवून देत आहेत. (३५८)

क्रुद्ध फिरत अति युद्ध जुरत नहिं रुद्ध मुरत भट। खग्ग बजत अरि बग्ग तजत सिर पग्ग सजत चट ॥ ढुक्कि फिरत मद झुक्कि भिरत करि कुक्कि गिरत गनि। रंक रकत हर संग छकत चतुरंग थकत भनि ॥ इमि करि संगर अति ही विषम भूषन सुजन कियो अचल। सिवराज साहि सुव खग्ग बल दलि अडोल बहलोल दल ॥३५९ ॥

भूषण म्हणतो, अतिशय क्रुद्ध होऊन ते (शिवाजीचे) योद्धे लढत आहेत. एक पाऊल देखील मागें सरकत नाहींत. ह्या वीरांच्या तरवारींचा खणखणाट होतांच शत्रू आपल्या हातांतील लगामाचे दोर सोडून देतात. डोक्यावरील पागोटें चहूंदिशीं सावरतात, व लपून छपून फिरूं लागतात; पण(शिवाजीच्या वीरांशीं) लढतांच मदोन्मत्त हत्तीप्रमाणें किंकाळ्या फोडून

धाडूकन् पृथ्वीवर कोसळून पडतात. महादेवाचे गण मात्र आकंठ रक्त-पान करून अगदीं तृप्त झाले आहेत. शहाजीपुत्र शिवरायानें तरवारीच्या जोरावर बहलोलखानासारख्या अटूल पराक्रमी सरदाराच्या सैन्याशीं अशा प्रकारें घनघोर युद्ध करून अढळ यश संपादन केलें. (३५९)

उदा० ७ वें— कवित्त मनहरण

बानर बरार बाघ बैहर बिलार बिग बगरे बराह जानवरन के जोम हैं। भूषन भनत भारे भालुक भयानक हैं भीतर भवन भरे लीलगऊ लोम हैं। पैंड़ायल गज गन गैंडा गररात गनि गहन मैं गोहन गरूर गहे गोम हैं। सिवाजी की धाक, मिले खल कुल खाक, बसे खलन के खेरनि खबीसन के खोम हैं॥ ३६० ॥

भूषण म्हणतो, शिवाजीच्या धाकानें शत्रूंचीं कुटुंबें धुळीस मिळालीं आहेत; त्यांच्या रहाण्याच्या खेडयापाडयांतून आतां भुतांच्या झुंडी राहूं लागल्या आहेत. वानरें, वाघ, वाघिणी बोके, लांडगे, डुकरें वगैरेंचे कळप, तसेंच मोठमोठालीं व भयंकर अस्वलें, नीलगाई, कोल्हीं इत्यादि घरादारां-तून वावरूं लागलीं आहेत. उन्मत्त हत्ती, गेंडे व गोह नांवाच्या जनावरींनीं घरांतून आपली वस्ती केली आहे. (३६०)

उदा० २ रें—मनहरण

तुरमती तहखाने तीतर गुसलखाने सूकर सिलहखाने कूकत करीस हैं। हिरन हरमखाने स्याही हैं सुतुरखाने पाढे पीलखाने औ करंजखाने कीस हैं॥ भूषन सिवाजी गाजी खग्ग सों खपाए खल, खाने खाने खलन के खेरे भये खीस हैं। खड्‌गी खजाने खरगोस खिलबतखाने खीसैं खोले खसखाने खाँसत खबीस हैं॥ ३६१ ॥

भूषण म्हणतो, गाजी शिवाजीच्या तरवारीनें शत्रू (पार) खपविले. त्यांच्या ( शत्रूंच्या ) राहण्याचीं खेडींचशीं काय, जवळजवळ प्रत्येक घर

उध्वस्त करून टाकलें आहें; त्यांच्या तळघरांतून तुरमती नामक पक्षी व स्नान-गृहांतून तीतर पक्षी (राहात आहेत), आणि शस्त्रागारांतून डुकरें हत्तीसारख्या डुरकण्या फोडीत आहेत; अंतःपुरांतून हरिणें, उंटाच्या तबेल्यांतून तरस, हत्तीखान्यांतून सांबरें आणि कोंबड्यांच्या खुराड्यांतून माकडें राहूं लागलीं आहेत. तसेंच खजिन्याचे ठिकाणीं गेंडे, एकांत करण्याच्या (खलबतखान्याच्या) खोल्यांतून ससे दांत विचकीत व उघड्या झोंपड्यांतून भुतें खोंकत आहेत. (३६१)

उदा० ३ रें—दोहा

**औरन के जाँचे कहा, नहिं जाँच्यो सिवराज ? ।**
**औरन के जाँचे कहा, जो जाँच्यो सिवराज ? ॥ ३६२ ॥**

शिवाजीकडे याचना न करितां इतरांजवळ याचना केली तर काय उपयोग ? व शिवाजीपाशीं याचना केली तर इतरांस याचना करण्याचें कारणच काय ? (३६२)

## १०२ यमक अनुप्रास—लक्षण, दोहा

**भिन्न अरथ फिरि फिरि जहाँ, ओई अच्छर वृन्द ।**
**आवत हैं, सो जमक करि, बरनत बुद्धि बिलन्द ॥३६३॥**

जेथें एकाच प्रकारचे वर्ण पुनः पुन्हा येऊन अर्थ मात्र निरनिराळा होतो तेथें 'यमक' अनुप्रास म्हणतात. (३६३)

उदा०—कवित्त मनहरण

**पूनावारी सुनि कै अमीरन की गति लई भागिबे को मीरन समीरन की गति है। मान्यो जुरि जंग जसवन्त जसवन्त जाके संग केते रजपूत रजपूत पति है॥ भूषन भनै यों कुलभूषन भुसिल सिवराज ! तोहि दीन्ही सिव राज बरकति है। नौहु खंड दीप भूप भूतलके दीप आजु समै के दिलीप दिलीपति को सिदति है॥ ३६४॥**

पुण्यांत ( शायस्तेखान वगैरेंची ) झालेली दुर्दशा ऐकून इतर सरदार वायुवेगानें पळाले. यशस्वी व रजपूत-पति जो जसवन्तसिंग (ज्याचे बरोबर कित्येक रजपूत सरदार होते) त्याशीं युद्ध केलें. भूषण म्हणतो, हे भोंसले-कुलभूषण शिवराज ! याप्रमाणें शंकरांनीं तुझ्या राज्याची अभिवृद्धि केली आहे. नऊ खंड व सप्तद्वीप भूतलाचा दीपक व सांप्रतच्या दिल्लीपतीस त्रास देणारा दिलीप तूंच आहेस. (३६४)

## १०३ पुनरुक्तिवदाभास—लक्षण, दोहा

**भासति है पुनरुक्ति सी, नहिं निदान पुनरुक्ति ।**
**वदाभास-पुनरुक्ति सो, भूषन बरनत युक्ति ॥ ३६५ ॥**

जेथें पुनरुक्तीचा नुसता भास होतो, वस्तुतः पुनरुक्ति होत नाहीं तेथें 'पुनरुक्तिवदाभास' अलंकार होतो. (३६५)

उदा०—कवित्त मनहरण

**अरिन के दल सैन संगर मैं समुहाने टूक टूक सकल कै डारे घमसान मैं । बार बार रुरो महानद परबाह पूरो बहत हैं हाथिन के मद जल दान मैं ॥ भूषन भनत महाबाहु भौंसिला भुवाल सूर, रवि कैसो तेज तीखन कृपान मैं । मालमकरन्द जू के नन्द कलानिधि तेरो सरजा सिवाजी जस जगत जहान मैं ॥ ३६६ ॥**

युद्धांत शत्रुसैन्याशीं सामना करून त्याचे तुकडे तुकडे केले; हत्तीच्या गंडस्थळांतील मदजलाचा पूर अनेक वेळां वाहविला. भूषण म्हणतो, भोंसलेराज महाबाहू शूर (शिवराजाच्या) कृपाणाचें तेज सूर्याप्रमाणें प्रखर आहे. हे मालोजीपुत्र शहाजी ! तुझ्या शिवाजी सरजाचा यशचंद्र जगताला जागवीत आहे. (३६६)

## १०४ चित्र—दोहा

**लिखे सुने अचरज बढै, रचना होय विचित्र ।**
**कामधेनु आदिक घने, भूषन बरनत चित्र ॥ ३६७ ॥**

ज्याची रचना अशी विचित्र असते कीं, पाहिलें किंवा ऐकिलें असतां आश्चर्य वाटतें; त्यास 'चित्र' अलंकार म्हणतात; त्याचे 'कामधेनु' इत्यादि पुष्कळ प्रकार आहेत. (३६७)

## कामधेनू-चित्रालंकार—माधवी सवैया

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| धुव जो | गुरता | तिनको | गुरु भूषन | दानि बड़ो | गिरजा | पिव है । |
| हुव जो | हरता | रिनको | तरु भूषन | दानि बड़ो | सिरजा | छिव है ॥ |
| भुव जो | भरता | दिनको | नरु भूषन | दानि बड़ो | सरजा | सिव है । |
| तुव जो | करता | इनको | अरु भूषन | दानि बड़ो | बरजा | निव है ॥ ३६८ ॥ |

[ ह्या छंदाचा शब्दार्थ लक्ष्यांत येतो; पण वाक्यार्थ सुसंगत निघत नाहीं. सबब येथें शब्दार्थ दिला आहे.]

धुव = ध्रुव ( भक्त ), निश्चयेंकरून; गुरता = गौरव; बिरजा पिव = व्रजाला प्रिय असणारा कृष्ण, (गिरजा प्रिय असाहि पाठभेद आहे, तेथें गिरिजाप्रिय शंकर असा अर्थ होतो;)हुव = झाला; हरता = हरण करणारा; रिन = ऋण; तरु-भूषण = कल्पवृक्ष; सिरजा = सृष्ट, निर्मित; छिव = छबि, उन्मत; भुव भरता = पृथ्वीचें भरण-पोषण करणारा; दिन को = सांप्रतचा; नरु-भूषन = मानवाचें भूषण; तुव = तूं; अरु = आणि; वर जानिव है = जाणता आहे (३६८)

चित्रालंकारांतील हा कामधेनु नामक प्रकार आहे. चित्रालंकार नुसते लक्षणांत भूषणानें वर्णन केल्याप्रमाणें पाहण्याऐकण्याचेच असतात. त्यांच्या अर्थात् कांहींच स्वारस्य नसतें. शब्दांची ओढाताण करून कसा तरी व कांहीं तरी अर्थ जमवावा लागतो. दिलेल्या शब्दार्थावरून साधारणपणें ह्या छंदाची कल्पना होईलच.

## १०५ संकर—लक्षण, दोहा

भूषन एक कबित्त मैं भूषन होत अनेक ।
संकर ताको कहत हैं जिन्हैं कवित की टेक ॥ ३६९ ॥

एकाच कवित्तांत अनेक अलंकार जेथें वर्णन करण्यांत येतात तेथें "संकर' नामक अलंकार होतो. (३६९)

उदा०--कवित्त मनहरण

ऐसे बाजिराज देत महाराज सिवराज भूषन जे बाज की समाजै निदरत हैं। पौन पाय हीन, दृग घूँघट मैं लीन, मीन जल मैं विलीन, क्यों बराबरी करत हैं ?॥ सब ते चलाक चित तेऊ कुलि आलम के रहैं उर अन्तर मैं धीर न धरत हैं। जिन चढ़ि आगे को चलाइयतु तीर, तीर एक भरि तऊ तीर पीछे ही परत हैं॥ ३७०॥

भूषण म्हणतो, शिवराज ( याचकांना ) बाज पक्षाच्या भराऱ्यांना मागें टाकणारे असे घोडे देतो. त्या घोड्यांस वायूची उपमा द्यावी तर तो पडला पायहीन-लंगडा, नेत्राची द्यावी तर ते पडले पडद्याआड, बरें, चपल माशाची द्यावी तर तो नेहमीं पाण्यांत राहाणारा; हे बिचारे ( पवन, नेत्र, मासा ) त्या वेगवान् घोड्याची बरोबरी कशी करूं शकतील ? बरें, सर्व वस्तूंत चंचल असें जें मन त्याची उपमा देऊं म्हणावें तर तें ( मन ) सर्वांच्या हृदयांत वास्तव्य करणारें व धैर्य न धरणारें; याकरितां मनाची तूळनाहि ह्या घोड्यांशीं होऊं शकत नाहीं. ह्या घोड्यावर बसून समोर तीर फेंकला तरी एका तीराच्या अंतराइतकाच तो मागें पडतो ( व घोडा वेगानें पुढें निघून जातो ). (३७०)

## ग्रन्थालंकार-नामावली—गीतिका छंद

उपमा[1] अनन्वै[3] कहि बहुरि उपमा[2] प्रतीप[4] प्रतीप।
उपमेय[5] उपमा है बहुरि मालोपमा[6] कवि दीप॥
ललितोपमा[7] रूपक[8] बहुरि परिनाम[9] पुनि उलेख[10]।
सुमिरन[11] भ्रमौ[12] सन्देह[13] सुद्धा-[14]पन्हुत्यौ सुभ बेख॥ ३७१॥
हेतु-[15]अपन्हुत्यौ बहुरि परजस्त्वपन्हुति[16] जान।
सुभ्रांत[17] पूर्ण अपन्हुत्यौ छेका[18] अपन्हुति मान॥

बर कैतवा[19] पन्हुति गनौ उतप्रेक्ष[20] बहुरि बखानि ।
पुनि रूपकाति[21]सयोक्ति भेदक[22] अतिसयोक्ति सुजानि ॥३७२॥

अरु अक्रमाति[23]सयोक्ति चंचल[42] अतिसयोक्तिहि लेखि ।
अत्यंत[25] अतिसै उक्ति पुनि सामान्य[26] चारु विसेखि ॥

तुलियोगिता[27] दीपक[28] अवृत्ति[29] प्रतिवस्तूपम[30] दृष्टान्त[31] ।
सुनिदर्सना[32] व्यतिरेक[33] और सहोक्ति[34] बरनत शान्त ॥३७३॥

सु विनोक्ति[35] भूषन समासोक्ति[36] हु परिकरौ[37] अरु वंस ।
परिकर सु अंकुर श्लेष[38] त्यों अप्रस्तुतौपर-[39]संस ॥

परयाय[40] उक्ति गनाइए व्याज-[41] स्तुति हु आक्षेप[42] ।
बहुरि विरोध[43] विरोध[44] भास विभावना[45] सुख खेप ॥ ३७४ ॥

सुविसेष[46] उक्ति असम्भवौ[47] बहुरे असंगति[48] लेखि ।
पुनि विषम[49] सम[50] सुविचित्र[51] प्रहषन[52] अरु विषादन[53] पेखि॥
कहि अधिक[54] अन्योन्य[55] हु विसेष[56] व्याघात[57] भूषन चारु ।
अरु गुम्फ[58] एकावली[59] मालादीपक[60] हु पुनि सारु ॥ ३७५ ॥
पुनि यथासंख्य[61] बखानिए परजाय[62] अरु परिवृत्ति[63] ।
परिसंख्य[64] कहत विकल्प[65] हैं जिनके सुमति सम्पत्ति ॥
बहुर्‍यो समाधि[66] समुच्चयो[67] पुनि प्रत्यनीक[68] बखानि ।
पुनि कहत अर्थापत्ति[69] कविजन काव्यलिंग[70]हि जानि ॥ ३७६ ॥
अरु अर्थ अन्तरन्यास[71] भूषन प्रौढ[72] उक्ति गनाय ।
सम्भावना[73] मिथ्याध्यवसितऽरु[74] यौं उलास[75] ही गाय ॥
अवज्ञा[76] अनुज्ञा[77] लेस[78] तदगुन[79] पूर्वरूप[80] उलेखि ।
अनुगुन[81] अतदगुन[82] मिलित[83] उन्मीलितहि पुनि अवरेखि ॥३७७॥
सामान्य[85] और विशेष[86] पिहितौ[87] प्रश्न[88] उत्तर जानि ।
पुनि व्याज-उक्ति[89] रु लोकउक्ति[90] सु छेक[91] उक्ति बखानि ॥

वक्रोक्ति[९२] जान सुभाव[९३] उक्ति हु भाविकौ[९४] निरधारि।
भाविक[९५] छबि हु सु उदात्त[९६] कहि अत्युक्ति[९७] बहुरि विचारि३७८
बरने निरुक्ति[९८] हु हेतु[९९] पुनि अनुमान[१००] कहि अनुप्रास[१०१]।
भूषन भनत पुनि जमक[१०२] गनि पुनरुक्तिवद[१०३] आभास॥
युत चित्र[१०४] संकर[१०५] एक सत भुषन कहे अरु पांच* ।
लखि चारु ग्रंथन निज मतो युत सुकवि मानु हु सौंच ॥ ३७९॥

दोहा

सम सत्रहसै तीस पर, सुचि वदि तेरसि भान।
भूषन सिव भूषन कियो पढियो सकल सुजान॥ ३८०॥

संवत १७३० ज्येष्ठ वद्य १३ रविवारीं भूषणानें 'शिवराज-भूषण' (काव्य) रचिलें; सर्व सुजाण लोक हो! वाचा.¶ (३८०)

---

* छंद ३७१ पासून ३७९ पावेतों शिवराज-भूषणामध्यें वर्णन केलेल्या अलंकारांची अनुक्रमणिका कवीनें स्वतःच दिली आहे. छंद क्र. ३७९ मध्यें एकंदर अलंकारांची संख्या 'एकशें पांच' आहे असें कवीनें म्हटलें आहे. परंतु मूळ काव्यांत अलंकारांची संख्या अधिक आहे. लुप्तोपमा, न्यूनाधिक रूपक व गुप्तोत्प्रेक्षा या अलंकारांचीं लक्षणें व उदाहरणें कवीनें दिलीं असून वरील अनुक्रमणिकेंत (नामावलींत) यांचा उल्लेख नाहीं; यावरून या अलंकारांस कवीनें मुख्य अलंकार मानिलें नाहीं असें दिसतें.

¶ छंद क्र. ३८० मध्यें कवीनें 'शिवराज-भूषणा'चा समाप्तिकाल दिला आहे. ह्या समाप्तिकालासंबंधीं बराच मतभेद आहे. त्रिपाठी-संपादित प्रतींतील दोह्यावरून हा काल 'संवत् १७३० आषाढ वद्य १३ रविवार' असा निघतो. मिश्रबंधूंच्या प्रतींतील दोह्यावरून संवतांत तर कांहीं अंतर नाहीं. त्यांच्या मतें कवीनें महिना लिहिला नाहीं, फक्त शुद्ध त्रयोदशी बुधवार असें लिहिलें आहे. त्या संवतांत शुद्ध त्रयोदशी बुधवारीं श्रावण व कार्तिक ह्या महिन्यांत आलेली आहे. कार्तिकांतील त्रयोदशी १४ घटका ५५ पळें होती व श्रावणांतील त्रयोदशी ३६ घटका ४० पळें होती. यावरून श्रावण मासांतील शुद्ध त्रयोदशीला ग्रंथ-

## आशीर्वचन—कवित मनहरण

एक प्रभुता को धाम, सजे तीनों वेद काम, रहैं पंच आनन षड़ानन सरबदा। सातौं वार आठौं याम जाचक नेवाजै नव अवतार थिर राजै कृपन हरि गदा॥ सिवराज भूषन अटल रहै तौ लौं जौलौं त्रिदस भुवन सब गंग औ नरमदा। साहि तनै साहसिक भौंसिला सुरज बंस दाशरथि राज तौलौं सरजा थिर सदा ॥ ३८१ ॥

प्रभुतेचें एक मात्र धाम जें परब्रह्मस्वरूप तें सुस्थिर राहो, ( किंवा तिन्ही वेदांचें ध्येय जें एक व प्रभूचें धाम प्राप्त करून घेणें तें त्यांस प्राप्त होवो). पंचानन–महादेव व षडानन–कार्तिकस्वामी चिरकाल राहोत. साती वार, अष्टोप्रहर याचकांवर कृपा होवो. नऊ अवतार अखंड विराजमान होवोत. तसेंच हरि आपल्या कृपाण आणि गदा यांसह सुस्थिर राहो. शिवराज–भूषण ( हा ग्रंथ किंवा शिवराय व भूषण कवीची जोडी, किंवा शिवराय ) त्रिदश भुवनें, गंगा आणि नर्मदा आहेत तोंवर निश्चळ राहो. शहाजीपुत्र धाडशी भोंसलेराज, सूर्यवंशी दाशरथी रामचंद्राचें राज्य असेपावेतों अर्थात् चिरकाल सुस्थिर राहो. (३८१)

---

समाप्ति झाली असा मिश्रबंधूंचा तर्क आहे. त्यांच्या प्रतींतील दोह्याचा पाठ खालीलप्रमाणें आहे.

सुभ सत्रहसैं तीस पर बुध सुदि तेरसि भान।
भूषण सिव भूषन कियो पढियो सुनो सुजान ॥

संवत् १७३० शुद्ध त्रयोदशी बुधवारीं भूषणानें 'शिवराज–भूषण' रचिलें, सुजाण लोक हो ! वाचा व ऐका.

[ भा. इ. सं. मं. पुरस्कृत ग्रं.४–'शिवचरित्र प्रदीप' पृष्ठ ३०४ पहा. प्रदीपांतील श्री० दिवेकर यांचा यासंबंधींचा खुलासा श्री० त्रिपाठीजींच्या व मुंबईच्या प्रतीशीं जुळतो.]

दोहा

**पुहुमि पानि रवि ससि पवन, जबलौं रहै अकास।**
**सिव सरजा तब लौं जियो, भूषन सुजस प्रकास ॥ ३८२ ॥**

भूषण म्हणतो; जोंवर पृथ्वी, जल सूर्य, चंद्र, वायु आणि आकाश हीं आहेत तोंवर सरजा शिवाजी जिवंत राहो; आणि त्याच्या सुयशाचा (चहूंकडे) प्रकाश पसरो. (३८२)

इतिश्री कविभूषणविरचिते शिवराजभूषणे अलंकार–वर्णनं समाप्तम्

॥ शुभमस्तु ॥



१२७

# शिवा-बावनी

कवित्त मनहरण

साजि चतुरंग बीर रंग में तुरंग चढ़ि, सरजा सिवाजी जंग जीतन चलत है। भूषन भनत नाद बिहद नगारन के, नदी नद मद गैबरन के रलत है॥ ऐल फैल खैल भैल खलक में गैल गैल, गजन की ठैल पैल सैल उसलत है। तारा सो तरनि धूरि धारा में लगत जिमि थारा पर पारा पारावार यों हलत है॥ १॥

[ शूर वीर शिवाजी सैन्यासह युद्धास निघाल्यावेळचा देखावा कवीनें वर्णिला आहे.]

शूर शिवाजी चतुरंग सैन्य (हत्ती, घोडे, रथ, पायदळ) तयार करून वीरोचित उत्साहानें घोड्यावर बसून युद्ध जिंकण्याकरितां निघाले आहेत, नगाऱ्यांचा भयंकर ध्वनि होऊं लागला आहे, उन्मत्त हत्तींच्या गंडस्थलां-तून निघणारा मद नदी-नाल्यांच्या प्रवाहांत मिसळत आहे,सैन्याच्या खळ-बळीनें देशभर गल्लोगल्लींतून कोल्हाळ माजून राहिला आहे, हत्तींच्या एकमेकांवर रेलण्यानें डोंगर उलथून पडतात कीं काय असें वाटत आहे. सैन्याच्या खळबळीनें व हत्तींच्या परस्पर रेटारेटीनें उडत असलेल्या धुळीनें आकाश इतकें भरून गेलें आहे कीं, एवढा मोठा प्रचंड सूर्य, पण एखाद्या लहानशा ताऱ्याप्रमाणें दिसूं लागला आहे. समुद्र तर ताटांत धावणाऱ्या पाऱ्याप्रमाणें सारखा आन्दोलन पावत आहे. (१)

बाने फहराने घहराने घंटा गजन के, नाहीं ठहराने राव राने देस देस के। नग भहराने ग्राम नगर पराने, सुनि बाजत निसाने सिवराज जू नरेस के। हाथिन के हौदा उकसाने,कुंभ कुंजर के भौन को भजाने अलि, छूटे लट केस के। दल के

दरारन ते कमठ करारे फूटे, केरा के से पात बिहराने फन
सेस के ॥ २ ॥

[ शिवराजाचें सैन्य युद्धास निघाल्यानंतर ठिकठिकाणच्या लोकांची कशी त्रेधा उडत होती हें ह्या छन्दांत दाखविलें आहे.]

(सर्व सैन्याच्या अग्रभागीं) फडकत असलेले झेंडे पाहून आणि हत्तींच्या घंटांचा घनघोर ध्वनि ऐकून देशोदेशचे लहानमोठे राजे-महाराजे, शिवाजीच्या सैन्यासमोर उभे राहीनात. शिवराजाच्या डंक्याचा प्रचण्ड शब्द ऐकून डोंगर कोसळून पडूं लागले व गांवेंच्या गांवें व शहरेंच्या शहरें रहिवासी पळून गेल्यामुळें ओस पडूं लागलीं. (शत्रूंच्या) हत्तींवरील हौदे सैल झाले, तसेंच हत्तींच्या गंडस्थळांवर उडत असलेले भुंगे पार आपापल्या जागीं पळून गेले. (शत्रु स्त्रियांचे) केशपाश विस्कळित झाले. शिवाजीच्या सैन्याच्या दराऱ्यानें पृथ्वी धारण करणाऱ्या कूर्माची कठिण अशी पाठदेखील फुटून गेली आणि शेषाच्या फणा केळीच्या पानाप्रमाणें फटाफट फाटून गेल्या. (२)

प्रेतिनी पिसाच रु निसाचर निसाचरि हू मिलि मिलि
आपुसमें गावत बधाई है। भैरों भूत प्रेत भूरि भूधर भयंकर
से जुत्थ जुत्थ जोगिनी जमाति जुरि आई है।किलकि किलकि
कै कुतूहल करति काली, डिम डिम डमरू दिगंबर बजाई
है। सिवा पूँछें सिव सों 'समाजु आजु कहाँ चली', काहू पै
सिवा नरेस भ्रकुटी चढाई है ॥ २ ॥

[वरील छन्दांत भूषण कवीनें एक काल्पनिक शिव-पार्वती संवाद वर्णन केला आहे.]

प्रेतें, पिशाचें, राक्षस, राक्षसी जमून आपापसांत आनंदानें गात आहेत. पर्वताप्रमाणें धिप्पाड शरीरें धारण करणारे भैरव, तसेंच भुतें, प्रेतें यांच्या झुंडीच्या झुंडी जमूं लागल्या; कालीदेवता किल-किल शब्द करून जमलेल्या समाजाचें कौतुक करीत आहे, आणि महादेव आनंदानें डमरू वाजवीत आहेत; हा शिवगणांचा आनंद पाहून पार्वतीनें महादेवास विचारिलें, 'महाराज! आज आपली मंडळी कुठें चालली आहे?' महादेवः–शिवराज कोणा शत्रूवर क्रुद्ध झाले आहेत.(३)

[ शिवाजीच्या सैन्याचा धाक दिल्लीवासियांच्या अंतःकरणांत इतका जबरदस्त बसला होता कीं, पावसाळ्यांत आकाशांत संचार करणाऱ्या मेघांकडे पाहून त्यांस शिवाजीच्या सैन्याचा भास होत असे; कवीनें हेंच वर्णन खालील छंदांत केलें आहे.]

बद्दल न होहिं दल दच्छिन घमंड माहिं, घटा हू न होहिं दल सिवाजी हंकारी के। दामिनी दमंक नाहिं खुले खग्ग वीरन के, बीर सिरछाप लखु तीजा असवारी के ॥ देखि देखि मुगलों की हरमैं भवन त्यागैं, उझकि उझकि उठैं बहत बयारी के। दिल्ली मति-भूली कहै बात घन घोर घोर बाजत नगारे ये सितारे गढधारी के ॥ ४ ॥

भीतीनें भ्रमिष्ट झालेले दिल्लीवासी ( पावसाळ्यांत ) आकाशाकडे पाहून म्हणतात, हे मेघ नव्हत, किंबहुना (आपल्या शूरत्वाची) घमेंड बाळगणारें हे दक्षिणी सैन्य आहे. हे ढग नव्हत, किन्तु अभिमानी शिवाजीचें हें दळ आहे. चमकणाऱ्या विजेस पाहून म्हणतात, हें विजेचें चमकणें नव्हे, किंबहुना वीरांच्या हातांतील नंग्या तरवारी चकाकत आहेत; (भाद्रपद शुद्ध तृतीयेचा ) तीजेचा चंद्र पाहून म्हणतात, हा चंद्र नव्हे तर शिवाजी वीराचा शिरपेंच चमकत आहे. हा देखावा पाहून मोगल स्त्रिया आपापलीं घरें-दारें सोडून पळूं लागल्या तर कित्येक, (पावसापूर्वीं) वाहणाऱ्या वाऱ्यास भिऊन दचकूं लागल्या आहेत. मेघांचा गडगडाट ऐकून त्या म्हणतात कीं, हा मेघांचा गडगडाट नाहीं तर सातारा गडाधिपतींच्या डंक्यांचा हा दणदणाट आहे. (४)

बाजि गजराज सिवराज सैन साजत ही दिल्ली दिलगीर दसा दीरघ दुखन की। तनियाँ न तिलक सुथनियाँ पगनियाँ न, घामैं घुमरातीं छोड़ि सेजियाँ सुखन की ॥ भूषन भनत पति बाँह बहियाँ न तेऊ छहियाँ छबीली ताकि रहियाँ रुखन की। बालियाँ बिथुर जिमि आलियाँ नलिन पर, लालियाँ मलिन मुगलानियाँ मुखन की ॥ ५ ॥

शिवराजानें हत्ती, घोडे सजवून दिल्लीवर स्वारी करण्याकरितां सैन्याची तयारी करतांच दिल्लीवासी भावी आपत्तीच्या भयानें दिलगिर झाले. मोगल स्त्रियांचे हाल तर विचारूंच नका, त्यांना आपल्या अंगांतील चोळ्यांचें व सद्र्याचें तसेंच पायांतील विजारींचें व जोड्यांचें भान राहिलें नाहीं. ह्या ( शिवाजीच्या स्वारीच्या ) भयानें त्या आपल्या सुखशय्या सोडून उन्हा-तान्हांतून भटकूं लागल्या. पतींच्या बाहुपाशांतून कधीं अलग न होणाऱ्या त्या वृक्षांच्या छाया शोधूं लागल्या; त्यांच्या वेण्या सुटल्यामुळें मुखावरून जे केश रुळत होते ते कमलिनीवर फिरणाऱ्या भुंग्यांप्रमाणें शोभत होते व त्यांचीं सुंदर मुखें भीतीनें अगदीं फिक्कट झालीं होतीं. (५)

कत्ता की कराकन चकत्ता को कटक काटि, कीन्ही सिवराज वीर अकह कहानियाँ । भूषन भनत तिहुँ लोक में तिहारी धाक, दिल्ली औ बिलाइति सकल बिललानियाँ ॥ आगरे अगारन ह्वै फाँदतीं कगारन छ्वै, बाँधतीं न बारन सुखन कुम्हिलानियाँ । कीबी कहैं कहा औ गरीबी गहैं भागी जायँ, बीबी गहे सूथनी सु नीबी गहे रानियाँ ॥ ६ ॥

हे वीर शिवाजी ! आपण आपल्या कत्त्यानें ( सुऱ्यासारख्या हत्यारानें) औरंगजेबाच्या सैन्याचे तुकडे तुकडे करून अवर्णनीय पराक्रम केले आहेत. भूषण म्हणतो, त्यामुळें त्रिलोकांत तुमचा दरारा बसला आहे, दिल्ली आणि अन्य यावनी राज्यें सारखीं विलाप करीत आहेत; बेगमा आणि राण्या केश न बांधतां म्लान वदनानें विजारी व उत्तरीय वस्त्राच्या निऱ्या सांव-रून आग्र्याच्या महालाच्या सौधावरून उड्या मारून पळत असतां म्हणत आहेत कीं, 'आतां आम्हीं काय करावें ?' (६)

ऊँचे घोर मंदर के अंदर रहन वारी ऊंचे घोर मंदर के अंदर रहाती हैं । कंद मूल भोग करैं कंद मूल भोग करैं, तीन बेर खातीं ते वै बीन बेर खाती हैं ॥ भूषन सिथिल अंग भूखन सिथिल अंग, बिजन डुलातीं ते वै बिजन डुलाती

**हैं। भूषन भनत सिवराज बीर तेरे त्रास नगन जडातीं ते वै नगन जडाती हैं ॥ ७ ॥**

[या छंदांत कवीनें श्लेषालंकार उत्तम साधला आहे. प्रत्येक चरणांतहि पहिल्या अर्धाचा अर्थ एक व दुसऱ्याचा अर्थ त्याहून भिन्न. शब्दयोजना मात्र दोन्ही अर्धांची अगदीं सारखी आहे. जसें:—मंदर=महाल, पक्षीं पर्वत.]

भूषण म्हणतो:—हे वीर शिवाजी! उंच आणि भव्य अशा राजमहालांतून राहाणाऱ्या (मोगल स्त्रिया), तुमच्या धाकानें आतां उंच व भयंकर अशा डोंगराच्या दऱ्याखोऱ्यांतून राहात आहेत. नित्य मिष्टान्नाचें भोजन करणाऱ्या, आतां कंदमूलांवर गुजराण करीत आहेत. दिवसांतून तीन वेळ खाणाऱ्या, आतां* तीनच बोरें खाऊन राहूं लागल्या आहेत. नाजुकपणामुळें अलंकारांनीं ज्यांचें अंग पूर्वीं (भारावत) शिथिल होत असे, त्या आतां भुकेनें शिथिल (क्लान्त) होत आहेत; ज्यांच्यावर नेहमीं (व्यजन) पंखे झुलत असत, त्या आतां विजनांत (अरण्यांत) भटकत आहेत; ज्या पूर्वीं रत्नजडित अलंकार परिधान करीत असत, त्या आतां (वस्त्राभावीं) थंडीनें काकडून जात आहेत! (७)

**उतरि पलंगते न दियो है धरा पै पग, तेऊ सगबग निसिदिन चली जाती हैं। अति अकुलातीं मुरझातीं न छिपातीं गात, बातन सोहातीं बोले अति अनखाती हैं॥ भूषन भनत सिंह साहिके सपूत सिवा, तेरी धाक सुने अरि नारी बिललाती हैं। कोऊ करैं घाती कोऊ रोतीं पीटि छाती, घरैं तीन बेर खातीं ते वै तीन (बीन) बेर खातीं हैं ॥८॥**

पलंगावरून जमिनीवर कधीं पाय न ठेवणाऱ्या त्या देखील रात्रंदिवस पळत सुटल्या आहेत. भयाकुल झाल्यामुळें त्यांचीं मुखें म्लान झालीं आहेत. त्यांना आपले अवयव झांकून घेण्याचें देखील भान राहिलें नाहीं. दुसऱ्यानें बोललेलें तर त्यांना अगदीं खपत नाहीं. कदाचित् कोणी

* 'बीन बेर खाती हैं' असा पाठभेद आहे. तेथें बोरें वेंचून खातात असा एक अर्थ होतो; किंवा अवेळीं खातात असाहि एक अर्थ होतो.

बोलल्यास त्या लागलीच अतिशय क्रुद्ध होतात. भूषण म्हणतो, हे सिंह-समान शूर शहाजीपुत्र शिवाजी ! तुमचा दरारा ऐकून शत्रुस्त्रिया विलाप करितात, इतकेंच नव्हे तर कोणी आत्मघात करीत आहेत, तर कोणी छाती पिटून रडत आहेत. घरीं तीन तीन वेळां खाणाऱ्या आतां तीन तीन बोरांवर राहूं लागल्या आहेत ! (८)

अन्दर ते निकसी न मन्दर को देख्यो द्वार, बिन रथ पथ ते उघारे पाँव जाती हैं। हवा हू न लगती ते हवा ते बिहाल भईं, लाखन की भीरमें सँभारती न छाती हैं। भूषन भनत सिवराज तेरी धाक सुनि, हयादारी चीर फारि मन झुँझलाती हैं। ऐसी परीं नरम हरम बादसाहन की, नासपाती खातीं ते बनासपाती खाती हैं ॥ ९ ॥

भूषण म्हणतो:—हे शिवराज ! ज्यांनीं कधीं आंतून बाहेर निघून आपल्या महालाचा दरवाजा पाहिला नव्हता त्या (मोगल स्त्रिया) तुझ्या धाकानें आज रस्त्यांतून कसल्याहि वाहनावांचून अनवाणी पायांनीं फिरत आहेत. ज्यांना आपल्या महालांत वाऱ्याचा कधीं स्पर्श होत नसे, त्या वाऱ्यानें व्याकूळ होत आहेत; व त्यांना शेंकडों माणसांच्या गर्दीतून आपला उरोभाग सांभाळण्याचें देखील भान राहिलें नाहीं. लज्जावस्त्र फाडून (लज्जारहित होऊन) मनांतल्या मनांत त्या चरफडत आहेत. बादशहाच्या बेगमा इतक्या दीन झाल्या आहेत कीं, रात्रंदिवस नाशपाती (सफरचंद)सारखे उत्तम मेवे खाणाऱ्या, वनस्पतींवर (भाजीपाल्यावर) उपजीविका करूं लागल्या आहेत ! (९)

अतर गुलाब रस चोवा धन सार सब सहज सुवास की सुरति बिसराती हैं। पलभर पलंग ते भूमि न धरति पाँव, भूली खान पान फिरैं बन बिललाती हैं। भूषन भनत सिवराज तेरी धाक सुनि, दारा हार बारन सम्हारैं अकुलाती हैं। ऐसी परीं नरम हरम बादसाहनकी नासपाती खाती ते बनासपाती खाती हैं ॥ १० ॥

भूषण म्हणतोः—हे शिवराज! तुमच्या धाकानें बादशहाच्या बेगमा ज्यांना नित्य गुलाबी अत्तर, अर्गजाचा, केशर-कस्तुरीमिश्रित सुगंधित रस, कापूर आदि सुगंधी सामग्री सहजपणें लागत असे, त्या आतां सुगंधास पार विसरून गेल्या. पलंगावरून भूमीवर पळभर पाय न ठेवणाऱ्या खाणेंपिणें विसरून रानावनांतून भटकत फिरत आहेत; आपले हार व केश सांभाळण्याचें देखील त्यांस भान नाहीं; बादशहाच्या बेगमा इतक्या दीन झाल्या आहेत कीं, नाशपातीसारखे उत्तम उत्तम मेवे खाणाऱ्या त्या वनस्पती खाऊन दिवस कंठीत आहेत. (१०)

सोंधे को अधार किसमिस जिनको अहार, चारिको सो अंक लंक चंद सरमाती हैं। ऐसी अरि नारी सिवराज वीर तेरे त्रास पायनमें छाले परे कन्द मूल खाती हैं। ग्रीषम तपनि ऐसी तपति न सुनी कान, कंज कैसी कली बिनु पानी मुरझाती हैं। तोरि तोरि आछेसे पिछौरा सों निचौरि मुख कहैं अब (सब) कहां पानी मुकतों में पाती हैं॥११॥

हे वीर शिवाजी! ज्यांच्या प्राणाचा आधार सुगन्ध, ज्यांचा आहार किसमिस (बेदाणा आणि उत्तम उत्तम मेवे) होता, चार (४)च्या अंकांतील मध्यभागाप्रमाणें ज्यांची कंबर अतिशय बारीक, व ज्या आपल्या सौन्दर्यानें चंद्रास देखील लाजवीत होत्या, अशा त्या सुकुमार शत्रु-स्त्रिया तुमच्या भीतीनें पळत आहेत. पळतांना त्यांच्या नाजुक पायांस फोड येत आहेत. त्या कंदमुळांवर गुजराण करीत आहेत. कानांनीं कधीं ऐकिला नाहीं (मग अनुभवणें तर दूरच) अशा कडक उन्हाळ्यांत, कमळांच्या कळ्या पाण्यावांचून जशा कोमेजतात तशा, त्या सुकून गेल्या आहेत. अंगावरील मूल्यवान् चादरीस (उत्तरीय वस्त्रास) लावलेल्या उत्तम व पाणीदार मोत्यांपैकीं कांहीं मोत्यें तोडून आपल्या तोंडांत पाणी निघेल ह्या आशेनें पिळीत आहेत, परन्तु त्या (पाणीदार) मोत्यांत तहान शम-

पिणारें पाणी निघत नाहींसें पाहून म्हणतात, 'ह्या मोत्यांत पाणी कुठें आहे ?' (११)

साहि सिरताज और सिपाहिन में पातसाह, अचल सु सिन्धु के से जिनके सुभाव हैं। भूषन भनत परी शस्त्र रन सेवा धाक काँपत रहत न गहत चित चाव हैं। अथह विमल जल कालिन्दी के तट केते परे युद्ध विपति के मारे उमराव हैं। नाव भरि बेगम उतारैं बाँदी डोंगा भरि, मक्का मिस साह उतरत दरियाव हैं॥ १२॥

[वर छंद ३ ते ७ पावेतों शिवाजीच्या व त्याच्या सैन्याच्या धाकानें मोगल स्त्रियांची जी दैना उडाली, तिचें वर्णन कवीनें केलें आहे; या छंदांत मोठमोठ्या शूरवीर बादशहांची व राजांची शिवाजीच्या दराऱ्यानें जी त्रेधा आणि तारंबळ उडाली आहे, तिचें मोठें मौजेचें वर्णन आहे.]

भूषण म्हणतो:—ज्यांचे स्वभाव पर्वताप्रमाणें निश्चल व समुद्राप्रमाणें गंभीर आणि जे सर्व राजांत श्रेष्ठ व शूरांत वरिष्ठ असे मोठे बादशाह देखील शिवाजीच्या धाकानें रणांत निरुत्साह व गलित-शस्त्र होऊन कांपत आहेत. कित्येक उमराव युद्धाच्या अनर्थास भिऊन यमुना नदीच्या किनाऱ्यानें दडून बसले आहेत. खुद्द बादशाह मक्केस जाण्याच्या मिषानें आपल्या बेगमांस नावेंतून व दासींस होड्यांतून समुद्रपार करीत आहे. (१२)

किबले की ठौर बाप बादसाह साहजहाँ, ताको कैद कियो मानो मक्के आगि लाई है। बड़ो भाई दारा वाको पकरि कै कैद कियो मेहरहु नाहिं माँ को जायो सगो भाई है॥ बंधु तो मुरादबक्स बादि चूक करिबे को, बीच लै कुरान खुदा की कसम खाई हैं। भूषन सुकवि कहै सुनो नवरंगजेब, एते काम कीन्हे तेऊ पातसाही* (छा) पाई हैं १३

* पाठभेद—छाई है.

भूषण म्हणतोः—औरंगजेब ! ऐका. तुम्ही तीर्थासमान पूज्य असलेल्या आपल्या बापास–शहाजहानास कैद केलें, हें तुमचें कृत्य परम पवित्र अशा मक्केस आग लावण्याइतकेंच अनुचित आहे. एकाच आईच्या पोटीं जन्मलेला, त्यांतून वडील बंधू जो दारा, त्यालाहि पकडून कैदेंत घातलें (यावरून मला वाटतें) तुमच्या अंतःकरणांत दयेचा लवलेश नाहीं; दुसरा भाऊ मुरादबक्ष याशीं कपटाचरण न केल्याबद्दल कुराण घेऊन खुदाची (ईश्वराची) खोटीच शपथ घेतली. अशीं हीं कृत्यें केलीं म्हणून तर तुम्हांला बादशाही (राज्य) मिळाली आहे. (१३)

हाथ तसबीह लिये प्रात उठै बन्दगी को, आपही कपटरूप कपट सु जप के। आगरे में जाय दारा चौकमें चुनाय लीन्हों, छत्रहू छिनायो मानो मरे बूढे बापके॥ कीन्हों है सगोत घात सो मैं नाहिं कहौं फेरि पील पै तोरायो चार चुगुल के गप के। भूषन भनत छर छन्दी मतिमन्द महा, सौ सौ चूहे खाय के बिलारी बैठी तप के॥ १४॥

भूषण म्हणतो—हे औरंगजेब ! तुम्हीं रोज सकाळींच उठून हातांत स्मरणी घेऊन ईश्वरप्रार्थना करतां, पण हें सर्व ढोंग आहे. तुम्ही प्रत्यक्ष कपटरूप आहां. कारण आग्र्यास जाऊन आपल्या सख्ख्या भावास–दारास–चौकांत जिवंत चिणलें, जिवंत व वृद्ध बापास मृत समजून त्याचें राजछत्र हिसकावून घेतलें (व स्वतः राज्य करूं लागलां.); मी आतां अधिक सांगत नाहीं. आपल्याच गोत्रजांना चहाडखोर दूतांच्या नुसत्या चहाड्यांवरून हत्तीच्या पायांखालीं तुडवून मारविलें. तुम्ही मोठे धूर्त आहां; धर्मशील आहों असें लोकांस दाखवितां, पण तुमचें हें कपट (ढोंग) शेंकडों उंदीर खाऊन तपश्चर्या करणाऱ्या मांजरीप्रमाणें आहे ! (१४)

[ वरील दोन छंदांत कवीनें औरंगजेबाचा ढोंगी स्वभाव व त्याचीं भयंकर कृत्यें यांचें वर्णन केलें आहे. भूषणानें हे छंद औरंगजेबाचें अभय घेऊन मग त्यास ऐकविले अशी आख्यायिका आहे.]

कैयक हजार जहाँ गुर्जबरदार ठाढ़े, करि कै हुस्यार नीति पकरि समाज की । राजा जसवंत को बुलाय कै निकट राख्यो, तेऊ लखैं नीरे जिन्हें लाज स्वामि-काज की ॥ भूषन तबहुँ ठठकत ही गुसुलखाने, सिंहलौं झपट गुनि सहि महाराज की । हटकि हथ्यार फड बाँधि उमरावन की कीन्ही तब नौरँग ने भेंट सिवराज की ॥ १५ ॥

[ छंद नं. १५-१६; हे औरंगजेबानें शिवाजीस दिल्लीला भेटीकरितां बोलावलेल्या प्रसंगास अनुलक्षून आहेत. औरंगजेबानें शिवाजीची भेट किती कडेकोट बंदोबस्त ठेऊन भीत भीत घेतली आहे हें ह्या छंदांत दिसून येईल.]

शिवाजीस भेटीला बोलाविल्यावेळीं औरंगजेबानें दरबार भरविण्याच्या नियमाप्रमाणें कित्येक हजार गदाधारी मोठ्या सावधगिरीनें उभे केले होते. राजे यशवंतसिंग व त्याच्याच सारखी आणखी कांहीं स्वामिभक्त मंडळी बोलावून जवळ बसविली. इतकें करूनहि औरंगजेब भीतच होता. शिवाजी सिंहासारखी एकदम झडप घालील कीं काय या भीतीनें उमरावांची रांग उभी करून, हत्यार बाजूस ठेवावयास लावून, स्नानागारांत औरंगजेबानें शिवाजीची भेट घेतली. (१५)

सबन के ऊपर ही ठाढ़ो रहिबे के जोग, ताहि खरो कियो जाय जारिन के निहरे । जानि गैर मिसिल गुसैल गुस्सा धरि उर, कीन्हों न सलाम न बचन बोले सियरे ॥ भूषन भनत महावीर बलकन लागो, सारी पातसाही के उडाय गये जियरे । तमक ते लाल मुख सिवा को निरखि भये, स्याह मुख नौरँग सिपाह मुख पियरे ॥ १६ ॥

सर्वांच्यावर उभे राहाण्याची ( सर्वांपेक्षां अधिक मान मिळण्याचा ) ज्या ( शिवाजी )ची योग्यता, त्यास लहान लहान ( पंच हजारी ) सरदारांच्या रांगेंत उभें केलें. अशा अयोग्य स्थानीं उभें केल्यामुळें शिवाजीस

अतिशय राग आला. त्या वेळीं त्यानें बादशहास सलाम केला नाहीं, किंवा विनयाचें कांहीं भाषण केलें नाहीं. भूषण म्हणतो, महावीर शिवाजी संतप्त होऊन बडबडूं लागला तेव्हां दरबारांतील सर्व लोकांचे जीव उडून गेले ( भयानें स्तंभित झाले ). संतापानें लाल झालेलें शिवाजीचें मुख पाहून औरंगजेबाचें तोंड काळें ठिक्कर पडलें व शिपायांचीं तोंडें पिंवळीं झालीं. (१६)

राना भौ चमेली और बेला सब राजा भये, ठौर ठौर रस लेत नित यह काज है। सिगरे अमीर आनि कुन्द होत घर घर, भ्रमत भ्रमर जैसे फूल की समाज है ॥ भूषन भनत सिवराज बीर, तैंही देस देसनमें राखी सब दच्छिन की लाज है। त्यागे सदा षटपद-पद अनुमानि यह अलि नव-रंगजेब चंपा सिवराज है ॥ १७ ॥

( छंद १७-१८ मध्यें कवीनें मोठ्या चतुराईनें हें दाखविलें आहे कीं, औरंगजेब उत्तर हिन्दुस्थानांतील सर्व राजांपासून करभार घेत असे; परन्तु दक्षिणेची लाज राखणाऱ्या शिवाजीकडून मात्र त्याला कांहीं घेतां येत नसे.)

राणे चमेलीच्या व राजे मोगऱ्याच्या फुलाप्रमाणें व सर्व अमीर उमराव कुंद पुष्पासारखे होत. भ्रमर जसा ठिकठिकाणीं बसून ह्या फुलांतून रस-पान करितो तद्वत् औरंगजेबरूप भ्रमर सर्वत्र फिरून करभार घेतो. ह्या औरंगजेबरूप भ्रमरानें ( दक्षिणेकरितां मात्र ) आपली मधुकरवृत्ति नेहमीं करितांच सोडून दिली. यावरून असें वाटतें कीं, औरंगरूप भ्रमरास शिवराज हा चम्पक पुष्पाप्रमाणें होय. भूषण म्हणतो, हे वीर शिवराज, सर्व देशांत दक्षिणेची लाज तुम्हींच काय ती राखिली आहे. (१७)

कूरम कमल कमधुज है कदम फूल, गौर है गुलाब, राना केत की विराज है। पांडुरी पँवार जूही सोहत हैं चन्दावत, सरस बुंदेला सो चमेली साजबाज है ॥ भूषन भनत मुच-कुन्द बड गूजर हैं, बघेले बसंत सब कुसुम समाज है।

लेइ रस एतेन को बैटिन सकत अहै अलि नवरंगजेब चंपा सिवराज है ॥ १८ ॥

कछवाहे* कमलाप्रमाणें, कबंधज§ कदंबाप्रमाणें, गौर गुलाबाप्रमाणें, राणा¶ केतकीपुष्पाप्रमाणें, पवार पांढरीच्या फुलाप्रमाणें, चंदावत जुईच्या फुलासारखें, बुन्देले चमेलीप्रमाणें, बडगूजर मुचुकुंद फुलाप्रमाणें तर बघेले वसंतकाळीं फुलणाऱ्या सर्व पुष्पसमूहाप्रमाणें होत. औरंगजेबरूप भ्रमर ह्या सर्व फुलांतून रसपान करितो; पण शिवाजी चम्पक पुष्प असल्यामुळें त्यावर बसूं शकत नाहीं. (१८)

देवल गिरावते फिरावते निसान अली ऐसे डूबे राव राने सबी गये लबकी। गौरा गनपति आप औरनकौं देत ताप आपनी ही बार सब मारि गये दबकी ॥ पीरा पयगंबरा दिगंबरा दिखाई देत सिद्धकी सिद्धाई गई रही बात रबकी। कासी हूकी कलाजाती मथुरा मसीत होती, सिवाजी न होतो तो सुनति होत सबकी ॥ १९ ॥

(छंद १९ ते २१ यांत मुसलमानांच्या हल्ल्यांनीं हिन्दूंची व त्यांच्या धर्माची उडालेली दैना; देवता व देवालयें यांचा झालेला विध्वंस, जबरदस्तीनें यावनी धर्माचा प्रसार करण्याची महत्त्वाकांक्षा, इत्यादिकांचें कवीनें यथोचित व इतिहासप्रमाणान्वित वर्णन करून अशा बिकट परिस्थितींत शिवाजीचा अवतार झाल्यानें हिंदुधर्म कसा बचावला हें दाखविलें आहे.

मुसमानांनीं देवस्थानें पाडलीं, व अलीचे झेंडे चहूंकडे मिरविले, तेव्हां रावराणे अगदीं निर्बल व निस्तेज झाले. (रावराण्यांची कथा काय?) गौरी, गणपति, आदि देवता परपीडा करणाऱ्या खऱ्या; पण स्वतःवर पाळी येतांच लपून बसल्या. जिकडे तिकडे अवलियांचें पीरांचें व पैगंबरांचें माहात्म्य वाढलें; सिद्धांचें सिद्धपण नाहींसें झालें व 'रब'ची चर्चा सुरू झाली; अशा वेळीं शिवाजी झाला नसता, तर काशीची कळा गेली

*जयपूरचे राजे. §जोधपूरचे राजे. ¶उदेपूरचे राणे.

असती, मथुरेंत चहूंकडे मशिदी दिसून सर्वांची ( हिन्दूंची ) सुंता झाली असती. (१९)

सौंच को न मानै देवी देवता न जानै अरु ऐसी उर आनै मैं कहत बात जबकी। और पातसाहन के हुती चाह हिन्दुन की, अक्कबर साहजहाँ कहै साखि तब की॥ बब्बर के तब्बर हुमायूँ हद्द बाँधि गये दोनो एक करी ना कुरान वेद ढब की कासी हू की कला जाती मथुरा मसीत होती, सिवाजी न होतो तो सुनति होति सब की ॥ २० ॥

भूषण कवि म्हणतो—ज्या वेळीं अन्य मुसलमानी बादशाह राज्य करीत होते त्या वेळची हकीकत मी तुम्हांस सांगतों तुम्ही लक्षपूर्वक ऐका. त्या बादशहांना हिन्दूंविषयींचा आदर होता; याची साक्ष प्रत्यक्ष अकबर आणि शहाजहान हे होत. यांच्याप्रमाणें बाबराचा मुलगा हुमायून यानें देखील हिन्दूंची धर्म-मर्यादा राखिली. कुराण आणि वेद यांचीं भिन्न भिन्न असलेलीं तत्त्वें एक केलीं नाहींत. अर्थात् वेदमर्यादेचें उल्लंघन होईल असें कांहीं-एक केलें नाहीं. पण हा औरंगजेब पहा, ह्याला सत्याची चाड नाहीं, देव-देवतांना जुमानीत नाहीं. अशा वेळीं जर शिवाजी नसता तर काशीची कळा गेली असती, मथुराभर मशिदी दिसल्या असत्या व सर्व हिन्दूंची सुंता झाली असती. (२०)

कुंभकर्न असुर औतारी अवरंगजेब कीन्ही कत्ल मथुरा दोहाई फेरि रब की। खोदि डारे देवी देव सहर महल्ला बाँके, लाखन तुरुक कीन्हे छूटि गई तब की॥ भूषन भनत भाग्यो कासीपति विश्वनाथ, और कौन गिनती में भूली गति भव की। चारों वर्ण धर्म छोड़ि कलमा निवाज पढ़ि, सिवाजी न होतो तो सुनति होत सब की ॥ २१ ॥

भूषण म्हणतो—कुंभकर्ण राक्षसाचा अवतार जो औरंगजेब त्यानें मथुरेची कत्तल करून सर्व शहरांत 'रब'ची द्वाही फिरविली ( मुसलमानी चालविली ). शहरांतील गल्लोगल्लींतून असलेल्या उत्तम उत्तम देवदेवता

खोदून काढिल्या; लाखों हिन्दूंना मुसलमान केलें; इतकेंच काय, प्रत्यक्ष काशीपति विश्वनाथ भयभीत होऊन पळाले. महादेवाची अशी त्रेधा उडाली तेथें इतरांची कथा काय? अशा वेळीं जर शिवाजी नसता तर चारी वर्णांना आपापले धर्म सोडून नमाज पढावी लागली असती. व सर्वांची सुंता झाली असती. (२१)

दावा पातसाहन सों कीन्हों सिवराज वीर, जेर कीन्हों देस हद्द बाँध्यो दरबारे से। हठी मरहठी तामें राख्यौ न मवास कोऊ, छीने हथियार डोलैं बन बनजारे से॥ आमिष अहारी मांसाहारी दै दै तारी नाचैं, खांड़े तोड़े किरचैं उड़ाये सब तारे से। पील सम डील जहां गिरि से गिरन लागे मुंड मतवारे गिरैं झुंड मतवारे से॥ २२॥

आतां वीरश्रेष्ठ शिवाजीनें बादशहाशीं स्वतः जणूं बादशहा होऊनच स्पर्धा चालविली; कारण त्यानें जवळ जवळ सर्व देश पराभूत केला होता; व (दिल्ली)-दरबाराशीं आपली राज्यमर्यादा स्वतंत्र ठरवून टाकिली होती. हट्टी मराठ्यांनीं सर्व किल्लेदारांना निःशस्त्र करून टाकिलें व आपण जंगली लोकांप्रमाणें टेहळणी करीत रानावनांतून भटकूं लागले. हत्तीसारखीं धिप्पाड शरीरें धारण करणाऱ्या मुसलमानी मत प्रचारकांचीं मुंडकीं पर्वताचीं शिखरें कोसळावींत त्याप्रमाणें धडाधड उडूं लागलीं. तेव्हां मांसाहारी प्राणी भक्ष्य मिळालें म्हणून टाळ्या वाजवून नाचूं लागले. (२२)

छूटत कमान और तीर गोली बानन के होत कठिनाई मुरचानहू की ओट में। ताही समय सिवराज हांक मारि हल्ला कियो, दावा बांधि परा हल्ला वीर वर जोट में॥ भूषन भनत तेरी हिम्मती कहाँ लौ कहों, किम्मति यहां लगि है जा की भटझोट में। ताव दै दै मूँछन कँगूरन पै पाँव दै दै अरिमुख घाव दै दै कूदि परैं कोट में॥ २३॥

जेव्हां शत्रूच्या बाजूनें बाणांचा व गोळ्यांचा सारखा वर्षाव सुरू झाला व मोर्चांच्या आड उभें राहून सुद्धां जीव वाचविणें कठिण झालें तेव्हां शिवरायांनीं ललकारून शत्रूवर हल्ला केला; उभय पक्षाकडील वीरांत चकमक उडाली. कविभूषण म्हणतो, हे शिवराज, मी तुमच्या साहसाचें वर्णन कोठवर करूं ? तुमच्या शूरत्वाची ख्याति शूरवीर मंडळींत इतकी पसरली आहे कीं, युद्धक्षेत्रांत तुम्हांस तसें पाहून मराठे गडी मिशांवर ताव देत देत शत्रूवर प्रहार करीत उंचीवरून किल्ल्यांत उड्या घालतात. (२३)

उतै पात साहजू के गजन के ठट्ट छूटे, उमड़ि घुमड़ि मतवारे घन कारे हैं । इतै सिवराज जू के छूटे सिंहराज और बिदारे कुंभ करिन के चिक्करत भारे हैं ॥ फौजें सेख सैयद मुगल औ पठानन की मिली इखलास खाँ हू मीरन सँभारे हैं । हद्द हिन्दुवान की बिहद्द तरवारि राखी, कैयो बार दिल्ली के गुमान झारि डारे हैं ॥ २४ ॥

तिकडून दिल्लीपति औरंगजेब बादशहाच्या हत्तींच्या झुंडीच्या झुंडी काळ्याकुट्ट मेघांप्रमाणें निघाल्या आहेत, तर इकडे शिवराजाकडून सिंहासारखे मराठे शूर गडी घोर गर्जना करीत त्या हत्तींच्या मस्तकांचें विदारण करीत आहेत; शेख, सय्यद, मोगल, पठाण यांचें सैन्य इखलासखांसारखा शूर सरदार देखील संभाळूं शकेना. शिवराजानें आपल्या तरवारीच्या जोरावर कित्येक वेळां दिल्लीवाल्यांची घमेंड जिरवून हिन्दुत्वाची मर्यादा राखली. (२४)

जीत्यो सिवराज सलहेरि को समर सुनि सुनि असुरन के सुसीने धरकत हैं । देवलोक, नागलोक, नरलोक गावैं जस, अजहूँ लौं परे खग्ग दन्त खरकत हैं ॥ कंटक कटक काटि कीटसे उड़ाये केते, भूषन भनत मुख मोरे सरकत हैं । रनभूमि लेटे अध फेटे अरसेटे परे रुधिर लपेटे पठनेटे फरकत हैं ॥ २५ ॥

शिवाजीनें साल्हेरीचें युद्ध जिंकल्याची बातमी ऐकून मुसलमानांच्या काळजांत धडकीच भरली. तिन्ही लोक-स्वर्ग, मृत्यु, पाताळ-शिवाजीचें यश गाऊं लागले. या युद्धांतील जखमी शिपाई अद्यापि विवळत आहेत. भूषण म्हणतो, शत्रूचें सैन्य कापून कित्येकांस मशकाप्रमाणें उडवून लावलें, तर कित्येक पाठ दाखवून पळून गेले व रक्तस्राव झाल्यामुळें निःशक्त झालेले व रक्तानें माखलेले पापी तरुण पठाण रणभूमीवर तडफडत पडले आहेत. (२५)

केतिक देस दल्यो दल के बल दच्छिन चंगुल चाँपि कै चाख्यो । रूप गुमान हर्‍यो गुजरात को सूरत को रस चूसि कै नाख्यो ॥ पंजन पेलि मलिच्छ मले सब सोई बच्यो जिहि दीन व्है भाख्यो । सो रँग हैं सिवराज बली जिन नौरँग में रँग एक न राख्यो ॥ २६ ॥

शिवाजीनें आपल्या सैन्याच्या जोरावर कित्येक देशांचें निर्दालन केलें. (पराभव केला). दक्षिण देश तर केव्हांच पादाक्रांत केला; गुजराथेची शोभा आणि अभिमान पार नाहींसा केला; सुरत शहर लुटून येथील वैभव नष्ट केलें. शिवसिंहानें म्लेंछांस पंजांत पकडून यथास्थित मर्दन केलें. ज्यांनीं दीनता दाखविली (शरण गेले) त्यांना सोडून दिलें. एवढा नवरंगी औरंगजेब; पण बलाढ्य शिवाजीनें त्याचा एकही रंग चालूं दिला नाहीं (२६)

सूबा निरानँद बादर खान गे लोगन बूझत ब्योंत बखानो ।
दुग्ग सबै सिवराज लिये धरि चारु विचारु हिये यह आनो ॥
भूषन बोलि उठे सिगरे, हुतो पूना में साइत खान को थानो ।
ज़ाहिर है जग में जसवन्त लियो गढसिंह में गीदर बानो ॥ २७ ॥

बहादुरखान सुभेदारानें हताश होऊन आपल्या हाताखालील लोकांस विचारलें, "ह्या शिवाजीनें सर्व चांगले चांगले किल्ले तर हस्तगत करून घेतले; आतां तुम्ही पोक्त विचार करून मला योग्य सल्ला द्या." तेव्हां सर्वच म्हणूं लागले-" आपण उपाय कसला विचारीत आहां? सिंहासारखे

शूर असे यशवन्तसिंग व शायिस्ताखान यांनीं पुण्यांत कित्येक दिवसपर्यंत ठाणें बसविलें होतें; परंतु अखेरीस त्यांना सिंहगड सोडून गिधाडाप्रमाणें पळून जावें लागलें. त्या जगविख्यात शिवाजीपुढें तुमचा काय पाड!" (२७)

जोर करि जै हैं जुमिला हूके नरेस पर तोरि अरि खंड खंड सुभट समाज पै । भूषन असाम रूम बलख बुखारे जैहैं, चीन सिलहट तरि जलधि जहाज पै ॥ सब उमरावन की हठ कूरताई देखो, कहैं नवरंगजेब साहि सिरताज पै । भीख माँगि खैहैं बिन मनसब रैहैं पै न जैहैं हजरत महाबली सिवराज पै ॥ २८ ॥

(शिवाजीचा पराक्रम पाहून भयभीत झालेले) औरंगजेबाचे सर्व सरदार त्यास म्हणतात, "आम्ही सर्व ठिकाणच्या राजांवर जोरानें चाल करून जाऊं, शत्रूकडील शूर वीर योद्ध्यांचे तुकडे तुकडे करून टाकूं म्हणाल, तर आसाम, सयामच काय, पण हिन्दुस्थानाबाहेर असलेले रूमबलख-बुखारापावेतों जाऊं; जहाजांत बसून समुद्रोल्लंघन करून चीन, सिलहट आदि देशांत जाऊं. भीक मागून खाऊं; कोणत्याहि पदवीची अपेक्षा न धरितां राहूं; पण त्या महाप्रतापी शिवरायावर मात्र चाल करून जाणार नाहीं." भूषण म्हणतो, औरंगजेबाच्या सरदारांचा हा हट्ट व भित्रेपणा कसा आहे पहा! (२८)

चंद्रावल चूर करि जावली जपत कीन्हों, मारे सब भूप औ सँहारे पुर धाय कै । भूषन भनत तुरकान दलथंभ काटि, अफजल मारि डारे तबल बजाय कै ॥ एदिल सों बेदिल हरम कहैं बार, अब कहा सोवो सुख सिंह हि जगाय कै । भेजना है भेजो सो रिसालैं, सिवराज जू की बाजी करनालैं परनालैं पर आय कै ॥ २९ ॥

विजापूरच्या आदिलशाहास त्याच्या दुःखी झालेल्या बेगमा म्हणतात, "हे नाथ! ज्यानें चंद्रराव मोरे यांचा चक्काचूर करून जावळी हस्तगत

केली, सर्व राजे आणि नगरवासीयांचा शहरांत शिरून संहार केला, ज्यानें मुसलमानांचे अफजलखानासारखे मोठमोठे शूर सरदार मारून देशभर डंका गाजविला, त्या सिंहाला जागें करून आतां तुम्ही सुखानें निजूं म्हणाल तर कोण निजूं देईल? शिवाजीच्या तोफा पन्हाळगडापर्यंत येऊन पोहोंचल्या आहेत, त्याच्याकडे जो करभार पाठविणें आहे तो लौकर कां पाठवीत नाहीं?" (२९)

साजि चमू जनि जाहु सिवा पर, सोवत सिंह न जाय जगावो। तासों न जंग जुरो न भुजंग महा विषके मुख में कर नावो॥ भूषण भाषति वैरि-बधू, जनि एदिल औरंग लौं दुख पावो। तासु सुलाह की राह तजौ मति, नाह दिवाल की राह न धावो॥ ३०॥

शत्रूंच्या स्त्रिया आपल्या नवऱ्यांस म्हणतात, "सैन्याची तयारी करून तुम्ही (कुठें जातां?) शिवाजीवर चढाई करून जाऊं नका; व त्या निजलेल्या सिंहास जागें करूं नका. त्याशीं युद्ध करणें म्हणजे महा विषारी सर्पाच्या तोंडांत हात घालणें आहे. तुम्हां त्या शिवाजीशीं युद्ध करून आदिलशहा व औरंगजेब यांच्याप्रमाणें संकटांत पडूं नका. त्याशीं तडजोडच करा. तडजोडीचा रस्ता सोडून भिंतीवर धडक बसेल अशा रस्त्याला लागूं नका." (३०)

विज्जपूर बिदनूर सूर सर धनुष न संधाहिं। मंगल बिनु मल्लारि नारि धम्मिल नहिं बंधहिं॥ गिरत गब्भ कोटै गरब्भ चिंजी चिंजा डर। चाल कुंड, दल कुंड, गोलकुंडा संका उर॥ भूषन प्रताप सिवराज तव इमि दच्छिन दिसि संचरै। मधुरा धरेस धक धकत सो, द्रविड निबिड डर दबि डरै॥ ३१॥

भूषण म्हणतो,—हे शिवाजी! आपल्या प्रतापाचा धाक दक्षिणेंत इतका बसला आहे कीं, विजापूर आणि बिदनूर येथील शूर वीर शिपाई आतां धनुष्यावर बाण चढवीनातसे झाले. मलबार स्त्रियांनीं तर आपलें

सौभाग्यचिन्ह ( चोळी अंगांत घालणें ) सोडून दिलें; इतकेंच नव्हे, तर त्या आपले केशदेखील बांधीनातशा झाल्या. किल्ल्यांत सुरक्षित राहाणाऱ्या शत्रु-स्त्रियांचे गर्भपात होत आहेत; त्यांचीं लहान लहान मुलें, मुली, सारखीं भीत आहेत. चालकुंड, दलकुंड आणि गोवळकोंड्याच्या किल्लेदारांचीं मनें भीतीनें व्यग्र झालीं आहेत. मदुरापतीची छाती भयानें धडकत आहे, इतकेंच काय, पण सर्वच द्राविडी प्रजा महाभयानें लपून बसली आहे. (३१)

अफजल खान गहि जाने मयदान मारा, बीजापुर गोलकुंडा मारा जिन आज है । भूषन भनत फरासीस त्यों फिरंगी मारि हबसी तुरुक डारे पलटि जहाज है ॥ देखत में खान रुसतुम जिन खाक किया, सालति सुरति आजु सुनि जो अवाज है । चौंकि चौंकि चकता कहत चहुंधा ते यारो, लेत रहौ खबरि कहां लौं सिवराज है ॥ ३२ ॥

भूषण म्हणतो,—दिल्लीपति औरंगजेब घाबरून दचकून आपल्या सरदारांस वारंवार म्हणे, " मित्रांनो ! ज्यानें अफजलखानासारख्या शूर सरदारास चीत केलें; विजापूर, गोवळकोंडा ज्यानें तुकतेच जिंकले; फ्रेंच आणि पोर्तुगीज यांची खबर घेऊन तुर्कांचीं जहाजें समुद्रांत बुडविलीं, पाहतां पाहतां रुस्तुमखानास मातींत घातलें, त्याची आठवण होतांच आज देखील अंगावर शहारे येतात. करितां तो शिवाजी कोठवर आला याची चोहींकडून नित्य खबर आणवीत रहा." (३२)

फिरँगाने फिकिरि औ हदसनि हबसाने, भूषन भनत कोऊ सोवत न घरी है। बीजापुर बिपति बिडरि सुनि भाजे सब, दिल्ली दरगाह बीच परी खरभरी है ॥ राजन के राज सब साहन के सिरताज आज सिवराज पातसाही चित धरी है । बलख बुखारे कसमीर लौं परी पुकार धाम धाम धूमधाम रूम साम परी है ॥ ३३ ॥

सर्व राजांमध्यें श्रेष्ठ व बादशहांमध्यें वरिष्ठ अशा शिवराजांनीं आज राजा होण्याची इच्छा प्रकट केली आहे; त्यामुळें फिरंगी काळजीनें व हबशी भीतीनें घटकाभर देखील झोंप घेईनात. विजापुरावर कोसळलेला अनर्थ ऐकून सर्व लोक पळून गेले, आणि तिकडे दिल्ली दरबारांत खळबळ उडून गेली आहे. इतकेंच नव्हे, तर बलख, बुखारा व रूमशामपर्यंत ठिकठिकाणीं धामधूम उडून गेली आहे. (३३)

गरुड को दावा सदा नाग के समूह पर, दावा नाग जूह पर सिंह सिरताज को। दावा पुरहूत को पहारन के कुलपर, पच्छिन के गोल पर दावा सदा बाज को ॥ भूषन अखंड नव खंड महि-मंडल में, तम पर दावा रवि किरन समाज को। पूरब पछाँह देश दच्छिन ते उत्तर लौं, जहाँ पातसाही तहाँ दावा सिवराज को ॥ ३४ ॥

गरुडाचा अधिकार जसा सर्पांच्या समुदायावर, शूर सिंहाचा हत्तींच्या कळपावर, इंद्राचा पर्वतराजीवर, बहिरी ससाण्याचा पक्षिगणावर, रविकिरणांचा नवखंड पृथ्वीवरील अंधकारावर अखंडपणें चालतो तद्वतूच पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत दक्षिणेपासून उत्तरेपावेतों जेथें जेथें मुसलमानी बादशाही होती तेथें तेथें शिवाजीचा अधिकार चालू झाला. (३४)

दारा की न दौर यह रारि नहीं खजुवे की, बाँधिबो नहीं है किधौं मीर सहबाल को। मठ बिस्वनाथ को न बास ग्राम गोकुल को, देव को न देहरा न मंदिर गोपाल को ॥ गाढ़े गढ़ लीन्हें और बैरी कतलान कीन्हें, ठौर ठौर हासिल उगाहत है साल को। बूड़ति है दिल्ली सो संभारै क्यों न दिल्लीपति, धक्का आनि लाग्यो सिवराज महाकाल को ॥ ३५ ॥

ही दारावरील चढाई किंवा खजुव्याची लढाई नव्हे, अथवा मीरसहबाल (शहाबाज खां) यास धरून बांधणें नव्हे; किंवा काशीचें विश्वनाथ मंदिर उध्वस्त करणें किंवा गोकुळांत ठाणें वसवून केशवरायाचा देव्हारा व गोपाळ मंदिर जमीनदोस्त करणें नव्हे. प्रचंड व दुर्गम असे किल्ले घेत

शत्रूंची कत्तल करीत, ठिकठिकाणाहून वार्षिक कर घेत घेत शिवराज येत आहे. हे दिल्लीपति औरंगजेब, त्या प्रत्यक्ष महाकाल शिवरायाचा धक्का बसण्यापूर्वीच बुडणाऱ्या दिल्लीचें संरक्षण करतां येत असल्यास कां करीत नाहींस ? (३५)

गढ़न गँजाय गढ़धरन सजाय करि, छाँडे कत धरम दुवार दै भिखारी से । साहि के सपूत पूत बीर सिवराज सिंह केते गढधारी किये बन बनचारी से । भूषन बखानै केते दीन्हें बन्दीखाने, सेख सय्यद हजारी गहे रैयत बजारी से । महतों से मुगुल महाजन से महाराज डाँडि लीन्हें पकरि पठान पटवारी से ॥ ३६ ॥

भूषण म्हणतो,—शहाजीच्या पराक्रमी वीरपुत्रानें शत्रूंचे किल्ले उध्वस्त करून कित्येक किल्लेदारांना शिक्षा केल्या, तर कित्येकांना भिकाऱ्याप्रमाणें सोडून दिलें, तर कित्येकांस रानावनांतून भटकावयास लाविलें; कित्येकांना कैदेंत टाकलें. कित्येक ( पंच सप्त हजारी ) शेख-सय्यद सरदारांस बाजारबुणग्याप्रमाणें फिरावयास लाविलें. मोगलास पाटलांप्रमाणें, मोठमोठ्या राजांस महाजनांप्रमाणें व पठाणांस कुळकर्ण्यांप्रमाणें पकडून त्यांचेकडून दंड घेतला. (३६)

सक्र जिमि सैल पर, अर्क तम-फैल पर, बिघन की रैलपर लम्बोदर लेखिये । राम दसकन्धपर, भीम जरासंधपर, भूषन ज्यों सिंधु पर कुंभज बिसेखिये ॥ हर ज्यों अनंग पर, गरुड भुजंग पर, कौरव के अंग पर पारथ ज्यों पेखिये । बाज ज्यों विहंग पर, सिंह ज्यों मतंग पर, म्लेच्छ चतुरंग पर, सिवराज देखिये ॥ ३७ ॥

ज्याप्रमाणें इंद्र पर्वताचा, सूर्य निबिड अंधकाराचा, आणि विघ्नहर्ता गणराज विघ्नसमुदायाचा नाश करितो, किंवा ज्याप्रमाणें रामानें रावणाचा व भीमानें जरासंधाचा नाश केला, अगस्तिऋषींनीं समुद्राचा घोट घेतला, महादेवानें मदनास जाळून भस्म केलें, अर्जुनानें कौरवांचा

निःपात केला; किंवा सर्प गरुडास, पक्षी बहिरी ससाण्यास, हत्ती सिंहास पाहून भयभीत होतात, त्याप्रमाणें शिवाजीस पाहून म्लेंच्छ सैन्याची गाळण उडते. (३७)

बारिधि के कुंभ-भव, घन बन दावानल, तरुन तिमिर हू के किरन समाज हौ। कंस के कन्हैया, कामधेनु हू के कंटकाल, कैटभ के कालिका, बिहंगम के बाज हौ॥ भूषन भनत जम जालिम के सचीपति, पन्नग के कुल के प्रबल पच्छिराज हौ। रावन के राम कार्तवीज के परसुराम, दिल्लीपति दिग्गज के सेर सिवराज हौ॥ ३८॥

समुद्रास ज्याप्रमाणें अगस्ति ऋषि, गहन वनास दावाग्नि, निबिड अंधकारास सूर्यकिरणें, कंसास कृष्ण, कामधेनूस कांटेरी वन, कैटभासुरास कालीदेवी, पक्ष्यांस बहिरी ससाणा, वृत्रासुरास इंद्र, सर्पकुलास प्रबळ गरुड; रावणास राम, कार्तवीर्यास ( सहस्रबाहूस ) परशुराम, त्याप्रमाणें ) शिवराज ! दिल्लीपति औरंगजेबरूपी हत्तीस तुम्ही सिंहासारखे आहां. (३८)

दरबर दौर करि नगर उजारि डारि, कटक कटायो, कोटि दुजन दरब की। जाहिर जहान जंग जालिम है जोरावर, चलै न कछूक अब एक राजा रब की॥ सिवराज तेरे त्रास दिल्ली भयो भुवकंप, थर थर काँपति बिलाइति अरब की। हालत दहलि जात काबुल कंधार बीर रोस करि काढ़े समसेर ज्यों गरब की॥ ३९॥

हे शिवराज ! दुर्जनांच्या द्रव्यानें एकत्रित झालेल्या सैन्यावर आपल्या सैन्यानिशीं चाल करून आपण त्यांस कापून काढलें आणि त्यांचीं नगरें उध्वस्त केलीं; आपला युद्धांतील हा घोर पराक्रम आणि सामर्थ्य हीं जग-जाहीर झालीं आहेत. आपल्या समोर राव, राजे, बादशहा यांचें कांहीं एक चालत नाहीं. आपल्या दराऱ्यानें दिल्लीला भूकंप होत आहेत (दिल्लीवाले भयानें कांपत आहेत). अरबस्तान थरथर कांपत आहे. हे वीर शिरोमणि,

जेव्हां आपण रागावून (वीरोचित) अभिमानानें तरवार उपसतां, तेव्हां काबूल कंदाहार डळमळून जातात. (३९)

'सिवा की बड़ाई और हमारी लघुताई क्यों कहत बार बार' कहि पातसाह गरजा। सुनिये 'खुमान हरि तुरुक गुमान महि देवन जेंवायो' कवि भूषण यों अरजा ॥ तुम-वाको पाय के जरूर रन छोरो वह रावरे वजीर छोरि देत करि परजा। मालुम तिहारो होत याहि मैं निबेरो रन कायर सो कायर औ सरजा सो सरजा ॥ ४० ॥

औरंगजेबानें एकदां भूषण कवीस खोदखोदून विचारलें कीं, तूं नेहमीं शिवाजीची प्रशंसा आणि आमची निंदा करितोस ह्याचें काय कारण? भूषणानें विनयपूर्वक उत्तर दिलें—'ऐका, तो शिवाजी चिरंजीव होवो, त्यानें म्लेंच्छांचा गर्वहरण करून देवाब्राह्मणांचें संरक्षण केलें. दुसरें असें कीं, रणांत तुम्हीं त्याला पाहिलें मात्र कीं, तुम्हांस रण सोडून पळून जावें लागतें. (शिवाजी ही संधि पाहून) तुमच्या प्रधानास आपली प्रजा करून घेतो, (आपल्या छत्राखालीं घेतो). तुमच्या प्रश्नाचा निवाडा या तुमच्या कृतींतच आहे. तुम्ही रण सोडून पळून जातां आणि शिवाजीस पाहून भितां म्हणून तुम्ही रणभीरु व तो रणशूर सिंह. (४०)

कोट गढ़ ढाहियतु एकै पातसाहनके, एकै पातसाहन के देस दाहियतु है। भूषन भनत महाराज सिवराज एकै साहन की फौज पर खग्ग बाहियतु है ॥ क्यों न होहि बैरिन की बौरी सुनि बैर बधू दौरनि तिहारे कहौ क्यों निबाहियतु है। रावरे नगारे सुने बैरबारे नगरन नैनबारे नदन निवारे चाहियतु है ॥ ४१ ॥

हे शिवाजी महाराज! आपण कोणा बादशहाचे किल्ले पाडतां, कोणाचे देश जाळून भस्म करितां, तर कोणा बादशहाच्या सैन्यावर तरवार चालवितां हा आपला पराक्रम पाहून शत्रुस्त्रिया कां बावरणार ( बावचळणार ) नाहींत? तुमच्या हल्ल्यांपासून त्या आपलें संरक्षण कसें करूं शकतील?

भूषण म्हणतो, तुमच्या नगाऱ्यांचा भयंकर ध्वनि ऐकून शत्रूंच्या नगरींतील लोक सारखा विलाप करीत आहेत; तो इतका कीं, त्यांच्या अश्रूंच्या नद्या पार होण्यास मोठमोठ्या नौका पाहिजे आहेत. (४१)

चकित चकत्ता चौंकि-चौंकि उठै बार बार, दिल्ली दहसति चितै चाह करषति है । बिलखि बदन बिलखात बिजैपुरपति, फिरति फिरंगिनि की नारी फरकति है । थरथर काँपत कुतुब साह गोलकुंडा, हहरि हबस भूप भीर भरकति है । राजा सिवराज के नगारन की धाक सुनी केते पातसाहन की छाती दरकति है ॥ ४२ ॥

शिवाजी महाराजांच्या नगाऱ्यांचा दणदणाट ऐकून औरंगजेब भयचकित होऊन वारंवार दचकून उठतो आहे, दिल्लीवासियांच्या मनांत दहशत बसली आहे. विजापूरच्या बादशहाचा उदास झालेला चेहरा पाहून फिरंगी स्त्रिया घाबरून गेल्या आहेत; गोवळकोंड्याचा कुतुबशाह बादशाह थरथर कांपत आहे; हबशी राजे तर भयभीत होऊन पळून जाण्याच्या तयारींत आहेत; कित्येक बादशहांच्या छात्या फाटून गेल्या आहेत. (४२)

मौरँग कुमाऊँ औ पलाऊ बाँधे एक पल, कहाँ लौं गनाऊँ जेऽब भूषन के गोत हैं । भूषन भनत गिरि बिकट निवासी लोग, बावनी बवंजा नव कोटि धुंध जोत हैं । काबुल कंधार खुरासान जेर कीन्हों जिन, मुगल पठान सेख सैयद हा रोत हैं । अब लग जानत हे बडे होत पातसाह सिवराज प्रगटे ते राजा बडे होत हैं ॥ ४३ ॥

भूषण म्हणतो, मौरंग, कमाऊन आणि पलाऊ येथील संस्थानिकांना तर शिवाजीनें क्षणांत जिंकून कैद केलें; यांच्याप्रमाणें आणखी कितीतरी राजांना कैद केलें, तें मी कोठवर मोजूं ? उंच आणि बिकट अशा पर्वतांवर राहणाऱ्यांस, त्याचप्रमाणें बावनी बवंजा, नव कोटी, येथील संस्थानिकांस निस्तेज करून टाकिलें. काबूल-कंदाहारास जर्जर केल्यामुळें मोगल, पठाण, शेख, सैयद हाहाःकार करून रडत आहेत. आजपर्यंत

बादशहाच काय तो मोठा असें लोक समजत असत; पण शिवाजीच्या प्रकट होण्यानें राजाच मोठा ( श्रेष्ठ ) असतो हें समजून आलें. (४३)

दुग्ग पर दुग्ग जीते सरजा सिवाजी गाजी, उग्ग पर उग्ग नाचे रुंड मुंड फरक। भूषन भनत बाजे जीत के नगारे भारे सारे करनाटी भूप सिंहल को सरकं॥ मारे सुनि सुभट पनारे बारे उद्‌भट, तारे लगे फिरन सितारे गढ़धर के। बीजापुर बीरनके गोलकुंडा धीरन के दिल्ली उर मीरन के दाडिम से दर के॥ ४४॥

धर्मवीर शिवाजीनें एकामागून एक असे कित्येक किल्ले घेतले. रणांगणांत शेंकडों धडें व शिरें नाचूं उडूं लागलीं. विजयदुंदुभींच्या प्रचंड जयघोषानें कर्नाटकचे सर्व राजे थेट सिंहलद्वीपापर्यंत पळाले. शिवाजीच भाग्यसूर्य अनुकूल तळपत आहेसें पाहून व पन्हाळगडच्या शूर वीर योद्ध्यांस मारलेलें ऐकून विजापूरच्या वीरांचीं, गोंवळकोंडा येथील धैर्यशील शूरांचीं, व दिल्लीच्या सरदारांचीं हृदयें डाळिंबाप्रमाणें उकललीं ( फाटलीं ). (४४)

मालवा उजैन भनि भूषन भेलास ऐन सहर सिरोज लौं परावने परत हैं। गोंड़वानो तिलंगानो फिरंगानो करनाट रुहिलानो रुहिलन हिये हहरत हैं॥ साहिके सपूत सिवराज, तेरी धाक सुन गढ़पति बीर तेऊ धीर न धरत हैं। बीजापुर गोलकुंडा आगरा दिल्ली के कोट बाजे बाजे रोज दरवाजे उघरत हैं॥ ४५॥

भूषण म्हणतो—हे शहाजीचे सुपुत्र शिवराज! तुमच्या धाकानें माळव, उज्जैन, आणि भेलसा येथील (यवन) रहिवाशांस थेट इराणची राजधानी शिराजपर्यंत पळावें लागलें. गोंडवण, तेलंगण, रोहिलखंड, कर्नाटक तसेंच फिरंगी लोकांच्या वस्तींतील रहिवाशांच्या हृदयांत धडकी भरली आहे मोठमोठे शूर किल्लेदार धीर धरीनातसे झाले. गोंवळकोंडा, आग्रा आणि

दिल्ली येथील किल्ल्यांचे दरवाजे केव्हां तरी उघडतात (रोज रोज उघडत नाहींत). (४५)

मारि करि पातसाही खाकसाही कीन्हीं जिन जेर कीन्हों जोर सों लै हद्द सब मारे की। खिसि गई सखी, फिसि गई सूरताई सब, हिसि गई हिम्मति हजारों लोग सारे की॥ बाजत दमामें लाखौं धौंसा आगे घहरात, गरजत मेघ ज्यों बरात चढ़े भारे की। दूलहो सिवाजी भयो दच्छिनी दमामेवारे, दिल्ली दुलहिन भई सहर सितारे की॥ ४६॥

ज्यानें केवळ आपल्या सामर्थ्यानें सर्व मान्यांच्या जागा हस्तगत करून घेऊन मोटमोठ्यांची बढाई, शूरपणा, तसेंच हजारों शूरांच्या हिंमती नष्ट केल्या, त्या शिवाजीराजाच्या विजयदुंदुभि मेघांच्या गडगडाटाप्रमाणें दणाणत आहेत; जणों एखाद्या श्रीमंताच्या लग्नाची वरातच (जिच्यापुढे लाखों नगारे, नौबत इत्यादींचा मेघगर्जनेप्रमाणें दणदणाट चालावा) निघाली आहे असें वाटतें. दक्षिणेंत विजय–दुंदुभि वाजविणारे शिवाजी हे ह्या वरातींतील नवरदेव होत व दिल्ली त्या सातारा-गडाधिपतीची नवरी होय. (४६)

डाढ़ीके रखैयनकी डाढ़ीसी रहत छाती बाढ़ी मरजाद जैसी हद्द हिन्दुवाने की। कढ़िगई रैयत के मनकी कसक सब, मिटिगई ठसक तमाम तुरकाने की॥ भूषन भनत दिल्लीपति दिल धकधका सुनि सुनि धाक सिवराज मरदाने की। मोटी भई चंडी बिन चोटी के चबाय सीस, खोटी भई संपति चकत्ता के घराने की॥ ४७॥

जसजशी हिन्दूंची राज्यमर्यादा वाढूं लागली, तसतशी दाढी राखणाऱ्यांची छाती जळूं लागली (हिन्दूंचें वैभव सहन होईना), हिन्दू प्रजेच्या मनांतील सर्व पीडा नाहींशी झाली व मुसलमानांचा गर्व पार नष्ट झाला. भूषण म्हणतो, मर्द शिवराजाचा वारंवार दरारा ऐकून, दिल्लीपति औरंग-

जेबाच्या हृदयांत धडकी भरली. रणदेवता शिवाहीनांचीं मुंडकीं खाऊन ताजी व लट्ठ झाली आणि मोगल घराण्यांतील राजलक्ष्मी दिवसेंदिवस क्षीण होत चालली. (४७)

जिन फन फुतकार उडत पहार भार, कूरम कठिन जनु कमल बिदलि गो। विषजाल ज्वालामुखी लवलीन होत, जिन झारन चिकारि मद दिग्गज उगलि गो॥ कीन्हो जिन पान पयपान सो जहान सब, कोल हू उछलि जल सिन्धु खलभलि गो। खग्ग खगराज महाराज सिवराज जू को अखिल भुजंग मुगलदल निगलि गो॥ ४८॥

ज्या मोगल सैन्यरूपी महासर्पाच्या फूत्कारानें मोठमोठे डोंगर उडून जात, ज्याच्या भारानें कूर्माची अतिशय कठिण पाठ देखील कमलाप्रमाणें छिन्नभिन्न होऊन जाई, ज्याच्या भयंकर विषारी ज्वालांनीं मोठमोठे मदोन्मत्त हत्ती पण चीची करीत मदहीन होऊन जात, ज्यानें सर्व जग दुधाप्रमाणें पिऊन टाकलें होतें (ग्रासलें होतें), वराह देखील स्थानभ्रष्ट झाल्यामुळें समुद्र खवळून जाई, त्या महा सर्पास (मोगल सैन्यास) शिवाजीच्या खड्गरूपीं गरुडानें सहज गिळून टाकलें. (४८)

राखी हिन्दुवानी हिन्दुवान को तिलक राख्यो, अस्मृति पुरान राखे वेद विधि सुनी मैं। राखी रजपूती राजधानी राखी राजन की, धरा में धरम राख्यो राख्यो गुन गुनी में॥ भूषन सुकवि जीति हद्द मरहट्टन की देस देस कीरति बखानी तब सुनी मैं। साहि के सपूत सिवराज, समसेर तेरी दिल्ली दल दाबि कै दिवाल राखी दुनी मैं॥ ४९॥

हे शहाजीचे सुपुत्र शिवराज! तुम्हीं हिन्दूंचें धर्म-चिन्ह 'तिलक' तसेंच स्मृति, पुराणें, यांचें संरक्षण करून वेद-मर्यादा कायम ठेविली. रजपूत राजांच्या राजधानीचें संरक्षण केलें, पृथ्वीवर धर्म राखिला, आणि गुणि-जनांचा गुण (त्यांच्या गुणांस उत्तेजन देऊन) कायम ठेविला. भूषण म्हणतो

शिवाजीनें आपल्या तरवारीच्या जोरावर दिल्लीच्या सैन्यास जरबेंत ठेऊन-पराभव करून-दुनियेंत मर्यादा ( शांतता ) राखली; तसेंच देशामागें देश जिंकल्यानें मराठ्यांची चहूंकडे ख्याति झाली तेव्हां ( ती ) मीं ऐकली. (४९)

सारस से सूबा करवानक से साहजादे, मोर से मुगल मीर धीर ही धचैं नहीं । बगुला से बंगस बलूचियो बतक ऐसे, काबुली कुलंग याते रन मैं रचैं नहीं ॥ भूषन जू खेलत सितारे में सिकार सिवा साहि को सुवन जात दुवन सँचै नहीं । बाजी सब बाज से चपेटैं चंगु चहूं ओर, तीतर तुरुक दिल्ली भीतर बचैं नहीं ॥ ५० ॥

[ या छंदांत कवीनें शिवराज शिकारी व इतर राजे, बादशाह हीं त्याचीं सावजें होत, असें एक मौजेचें रूपक कल्पिलें आहे ]

( ठिकठिकाणचे ) सुभेदार हे सारस, शहाजादे हे गौरवापक्षीं व मोगल सरदार हे मोरांप्रमाणें होत. हे सारे शिकारी शिवाजीस पाहून, मुळींच धैर्य धरीत नाहींत. बंगष बगळ्याप्रमाणें व काबुली कुलंगाप्रमाणें असून ते शिवाजीरूपी शिकाऱ्यास पाहून मैदानांत (रणांत पाय रद्धां ठेवीत नाहींत. भूषण म्हणतो; शहाजीचे सुपुत्र शिवाजी हे साताऱ्यांत शिकार खेळतात, पण या पक्षीरूप दुर्जनांची इतस्ततः फिरण्याची प्राज्ञा नाहीं; कारण तो शिवाजी बहिरी ससाण्याप्रमाणें कोणीकडून भरारी मारून पंजांत कसा पकडील याचा नेम नाहीं व म्हणूनच दिल्लींत यवनरूप तित्तिर पक्षी वांचणें कठिण झालें आहे. (५०)

वेद राखे विदित पुरान राखे सार युत रामनाम राख्यो अति रसना सुघर में । हिन्दुनकी चोटी रोटी राखी है सिपाहिन की, काँधे मैं जनेऊ राख्यो माला राखी गर में ॥ मीड़ि राखे मुगल मरोरि राखे पातसाह, बैरी पीसि राखे बरदान राख्यो करमें । राजन की हद्द राखी तेग बल सिवराज, देव राखे देवल स्वधर्म राख्यो घरमें ॥ ५१ ॥

शिवाजीनें आपल्या तरवारीच्या जोरावर वेद आणि पुराणें यांचें संरक्षण केलें, सर्वस्वाचें सार असें जें रामनाम तें हिन्दूंच्या जिव्हेवर कायम ठेविलें. हिन्दूंची शेंडी राखली आणि शिपायांची रोटी (उपजीविका) चालविली. खांद्यावरील जानवीं आणि गळ्यांतील माळा सुरक्षित ठेविल्या. मोगलांचें यथास्थित मर्दन केलें, बादशहास मुरगाळून टाकिलें, शत्रूंचें चूर्ण केलें. इतकें करून आपल्या हातीं वर देण्याचा अधिकार ठेवला देवळांत देव व घरांत कुलधर्म, कुलाचार कायम ठेविले. (५१)

सपत नगेस चारो कुकुभ गजेस कोल कच्छप दिनेस धरैं धरनि अखंड को। पापी घाले धरम सुपथ चाले मारतंड, करतार प्रन पाले प्रानिन के चंडको॥ भूषन भनत सदा सरजा सिवाजी गाजी म्लेच्छन को मारै करि कीरति घमंड को॥ जग-काज-वारे निहचिंत करि डारे सब भोर देत आसिष तिहारे भुजदंड को॥ ५२॥

भूषण म्हणतो, हे धर्मवीर शिवाजी! तुम्हीं म्लेंच्छांना मारून अखंड कीर्ति आणि मान मिळविला. दुष्टांचें निर्दलन करून सूर्य धर्ममार्गानें चालविला; व परमेश्वरांची प्रतिज्ञा (यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत। अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥) अक्षरशः पाळली. जीवांच्या सामर्थ्याचें संरक्षण केलें; यामुळें सातहि पर्वत, चारी दिशा, वराह, कूर्म, पृथ्वीस अखंड धारण करणारा शेष, सूर्य, तसेंच नित्याचा व्यवहार सुरळीतपणें चालूं लागल्यामुळें प्रापंचिक लोक रोज सकाळीं उठून अगोदर तुमच्या उभय बाहूंस आशीर्वाद देत आहेत. (५२)



# श्रीछत्रशाल दशक



दोहा

इक हाड़ा बूँदी धनी मरद महेवा वाल।
सालत नौरंगजेब को ये दोनों छतसाल॥
वै देखो छत्ता पता यै देखो छतसाल।
वै दिल्ली की ढाल यै दिल्ली ढाहन वाल॥

भुज भुजगेस की वै संगिनी भुजंगिनी सी खेदि खेदि खातीं दीह दारुन दलन के। बखतर पाखरिन बीच धसि जाति मीन पैरि पार जात परबाह ज्यों जलन के॥ रैया राय चंपति को छत्रसाल महाराज भूषन सकत को बखानि यों बलन के। पच्छी पर-छीने ऐसे परे पर छीने बीर तेरी बरछी ने बर छीने हैं खलन के॥ १

(१) भुज भुजगेस=बाहुरूपसर्प. भुजंगिनी=सर्पिणी. खेदि खेदि=धावून. दीह=दीर्घ. दारुन=कठिण. बखतर=चिलखत. पाखरिन=कवच. धँसिजात= घुसते. पैरि=पोहून. परबाह=प्रवाह. जलन के=पाण्याचे. पर-छीने=पंख कापलेलं (हात पाय तुटलेले). बर छीने हे=बळ हिसकावून घेतलें, हत- बळ केलें.

रैया राय चंपति को चढ़ो छत्रसालसिंह भूषन भनत सम- सेर जोम जमकै। भादौं की घटा सी उठीं गरदैं गगन घेरैं सेलैं समसैं फेरैं दामिनी सी दमकैं॥ खान उमरावन के आन राजा रावन के सुनि सुनि उर लागैं घन कैसी घमकैं। बैहर बगारन की अरि के अगारन की नाँघती पगारन नगा- रन की धमकैं॥ २॥

(२) जमकै=जमते, टिकते. भादो=भाद्रपद. घटा=ढग. गरद=धूळ सेलैं=भाले. दमकै=चमकते. घन=घण. बेहर=त्रिया. बगारन की=दूरच्या अगारन=घरें. नाँघती=उल्लंघितात. पगारन=अनवाणी. धमकै=ध्वनि.

अत्र गहि छत्रसाल खिझ्यो खेत बेतवै के उत ते पठाननहू कीन्हीं झुकि झपटैं। हिम्मति बड़ी के गबड़ो के खिलवारन लौं देत से हजारन हजार बार चपटैं॥ भूषन भनत काली हुलसी असीसन को सीसन को ईस की जमाति जोर जपटैं। समद लौं समद की सेना त्यों बुँदेलन की सेलैं समसेरैं भई बाड़व की लपटैं॥ ३॥

(३) अत्र=अस्त्र. गहि=घेऊन. खीझ्यो=रुष्ट, क्रुद्ध. बेतवै के उत= बेतवा नदीपलीकडे. गबडि=एक खेळ. हुलसी=उत्सुक झाली. ईस जमाति=महादेवाचे गण.समद=समुद्र,अब्दुल समद. मो=सर.]|गहे पाठभेद

है बर हरट्ट साजि गै बर गरट्ट सम पैदर के ठट्ट फौज जुरी तुरकाने की। भूषन भनत राय चंपति कोछत्रसाल रोप्यो रन ख्याल ह्वैके ढाल हिंदुवाने की॥ कैयक हजार एक बार बैरी मारि डारे रंजक दगनि मानो अगिनि रिसाने की। सैद अफगन सेन सगर सुतन लागी कपिल सराप लौं तराप तोपखाने की॥ ४॥

(४) हैवर=चांगला घोडा. हरट्ट=पुष्ट. गैबर=हत्ती. गरट्ट=समूह. ठट्ठ= समुदाय. रोप्यो=रोवली. रंजक=चित्रकार, रंगारी. दगनि=चमक. रिसाने की अगिनी=क्रोधाग्नि. लौं=प्रमाणें. सगर सुतन=सगर पुत्रांना. लागी= लागले. तराप=तडफड.

चाक चक चमू के अचाक चक चहूँ ओर चाक सी फिरति धाक चंपति के लाल की। भूषन भनत पातसाही मारि जेर कीन्हीं काहू उमराव ना करेरी करबाल की॥ सुनि सुनि रीति बिरदैत के बड़प्पन की थप्पन उथप्पन की बानि छत्र-

साल की। जंग जीतिलेवा ते वै ह्वैके दामदेवा भूप सेवा लागे करन महेवा महिपाल की ॥ ५ ॥

(५) चाक चक=दृढ, स्वच्छ. अचाकचक=अकस्मात्. करेरी=कठिण. जीतिलेवा=जिंकणारा. महेवा महिपाल=छत्रसाल. दामदेवा=करभार देणारा.

साँगन सों पेलि पेलि खग्गन सों खेलि खेलि समद सा जीता जो समद लौं बखाना है। भूषन बुँदेला मनि चम्पत सपूत धन्य जाकी धाक बचा एक मरद मिया ना है॥ जंगल के बल से उदंगल प्रबल लूटा महमद अमी खाँ का कटक खजाना है॥ बीर रस मत्ता जाते काँपत चकत्ता यारो कत्ता ऐसा बाँधिये जो छत्ता बाँधि जाना है॥ ६॥

(६) साँगन=भाले. समद=समुद्र. अब्दुस्समद=दिल्लीचा सरदार. उदंगल=उद्दंड, उन्मत्त. मत्ता=मस्त, माजलेला. कत्ता=तलवार. छत्ता=छत्रसाल. चकत्ता=औरंगजेब.

बड़ी औंड़ी उमड़ी नदी सी फौज छेकी जहाँ मेड़ बेड़ी छत्रसाल मेरु से खरे रहे। चम्पति के चक्कवै मचायो घमासान वैरी मलियै मसानि आनि सौंहैं जे अरे रहे॥ भूषन भनत भक रुण्ड रहे रुण्ड मुण्ड भव के भुसुण्ड तुण्ड लोहू सों भरे रहे। कीन्हों जस-पाठ हर पठनेटे ठाट पर काठ लौं निहारे कोस साठ लौं डरे रहे ॥ ७॥

(७) औंडी=खोल. उमडी=उचंबळली. छेकी=अडकली. मेंड=मर्यादा, सीमा. चकवै=चक्रवर्ती. अरे रहैं=अडून बसले. पठनेटे=पठाण. लोहू सों=रक्तानें. काठ लौं=लाकडाप्रमाणें.

देस दहबट्टि आयो आगरे दिली के मेंडे बहरि मानौ दल जिमि देवा को। भूषन भनत छत्रसाल छितिपाल मनि ताके ते कियो बिहाल जंग जीति लेवा को॥ खंड खंड सोर यों अखंड महिमंडल मैं मंडो ते बुन्देलखंड मंडल महेवा

को। दच्छिन के नाह को कटक रोक्यो महाबाहु ज्यों सहसबाहु ने प्रबाहु रोक्यो रेवा को ॥ ८ ॥

(८) दहबट्टि=धांवून हस्तगत केले. मेंडे=सीमेवर. बरगी बहरि=पक्षी विशेष. सोर=गोंगाट. नाह=नाथ.

बाजे बाजे राजे से निवाजे हैं नजर करी बाजे बाजे राजे काढ़ि काटे असि मत्ता सों। बाँके बाँके सूबा नालबंदी दे सलाह करैं बाँके बाँके सूबा करैं एक एक लत्ता सों ॥ गाढ़े गाढ़े गढ़पति काटे रामद्वार दे दे गाढ़े गाढ़े गढ़पति आने तरे कत्ता सों। बाजीराव गाजी ते उबाऱ्यो आइ छत्रसाल आमिल बिठायो बल करि कै चकत्ता सों ॥ ९ ॥

(९) गाढ़े=प्रबल. कत्ता तरे=कत्त्याखालीं. कत्ता=तरवार. उबाऱ्यो=उत्साहित झाला. आमिल=अधिकारी.

राजत अखंड तेज छाजत सुजस बड़ो गाजत गयंद दिग्गजन हिय साल को। जाहि के प्रताप सों मलीन आफताप होत ताप तजि दुज्जन करत बहु ख्याल को ॥ साज सजि गज तुरी पैदरि कतार दीन्हे भूषन भनत ऐसो दीन प्रतिपाल को?। और राव राजा एक मन मैं न ल्याऊं अब साहू को सराहौं कै सराहौं छत्रसाल को ॥ १० ॥

(१०) छाजत=शोभत. गयन्द=हत्ती. हिय=हृदय. आफताप=सूर्य तुरी=घोडा. कतार=रांग. सराहौं=वर्णन करूं. साहू=शाहूमहाराज.



# फुटकर

जानि पति बागवान मुगल पठान सेख बैल सम फिरत रहत दिन रात हैं। ताते ह्वै अनेक कोई सामने चलत कोई पीठ दै चलत मुख नाहीं सरमात हैं ॥ भूषन भनत जुरे जहा जहाँ जुद्धभूमि सरजा सिवा के जस बाग न समात हैं। रहट की घड़ी जैसे औरंग के उमराव पानिप दिली तें लाइ ढोरि ढोरि जात हैं ॥ १ ॥

(१) ताते=त्यामुळें. रहट=रहाट. घडी=पोहरा. ढोरि ढोरि=उलथून, पालथें करून. पानिप=पाणी, मान.

तेग बरदार स्याह पंखा बरदार स्याह निखिल नकीब स्याह बोलत बिराह को। पान पीक दानी स्याह सेनापति मुख स्याह जहाँ तहाँ ठाढ़े गिनें भूषन सिपाह को ॥ स्याह भये सारी पातसाही के अमीर खान काहू को न रह्यो जोम समर उमाह को। सिंह सिवराज दल मुगल बिनासि करि घास ज्यों पजार्‍यो आमखास पातसाह को ॥ २ ॥

(२) तेग= तरवार. बरदार= उचलणारे, धारण करणारे. स्याह=काळा. नकीब=शत्रु बिराह=आडमार्ग. ठाढ़े=उभे. उमाह=उत्साह. पजार्‍यो=जाळलें.

सिंधु के अगस्त और बाँस बन दावानल तिमिर पै तरनि की किरन समाज हो। कंस के कन्हैया और चूहा के बिड़ाल पुनि कैटभ की कालिका बिहंगम के बाज हो ॥ भूषन भनत सब असुर के इन्द्र पुनि पन्नग के कुल के प्रबल पच्छिराज हो। रावन के राम सहसबाहु के परसुराम दिल्लीपति दिग्गज के सिंह सिवराज हो ॥ ३ ॥

(३) बाँस=वेळू. बिडाल=मांजर. पुनि=पुनः.

बाप ते बिसाल भूमि जीत्यो दस दिसिन तें महिमें प्रताप कीनो भारी भूप भान सों। ऐसो भयो साहि के सपूत सिवराज वीर तैसा भयो होत है न व्है है कोऊ आन सों॥ एदिल कुतुबसाह औरँग के मारिबे को भूषन भनत को है सरजा खुमान सों। तीनपुर त्रिपुर के मारे शिव तीन बान तीन पातसाही हनी एक किरवान सों॥ ४

(४) कीनो=केला. सों=प्रमाणें. व्है है=झाला आहे. हनी=मारिली.

तेरी धाकही ते नित हबसी फिरंगियो बिलायती बिलन्दे करैं बारिधि बिहरनौ। भूषन भनत बीजापुर भागनेर दिल्ली तेरे बैर भयौ उमरावन कौ मरनौ॥ बीच्र बीच्र उहाँ केते जोर से मुलुक लूटे कहाँ लगि साहस सिवाजी तेरे बरनौ। आठ दिगपाल त्रास आठ दिसि जीतिबे को आठ पात-साहन सों आठोयाम लरनौ॥ ५॥

(५) बिलन्दे=गोलन्दाज. केते=किती. सों= शीं.

भूप सिवराज कोप करी रनमंडल में खग्ग गहि कूद्यो चकता के दरबारे में। काटे भट विकट औ गजन के सुण्ड काटे पाटे उर भूमि काटे दुवन सितारे में॥ भूषन भनत चैन उपजे शिवा के चित्त चौंसठ नचाई जबै रेवा के किनारे में। आंतन की ताँत बाजी खाल की मृदङ्ग बाजी खोपरी की ताल पसुपाल के अखारे में॥ ६॥

(६) गहि=घेऊन. चकता=चगताई वंशज ( औरंगजेब ). दुवन=शत्रु. आँतन=आंतडीं. ताँत=तंतू. खाल=चामडी, त्वचा. अखारे में=आखाड्यांत.

दौरि चढ़ि ऊँट फरियाद चहुँ खूँट कियो सूरत को कूट सिवा लूट धन लै गयो। कहि ऐसे आप आमखास माँधि साहन को कौन ठौर जायें दाग छाती बीच दै गयो॥ सुनि सोइ साह कहे यारो उमराओ जाओ सो गुनाह राव एती

बेर बीच कै गयौ । भूषन भनत मुगलान सबै चौथ दीनी हिन्द में हुकुम साहि नंद जी को व्है गयो ॥ ७ ॥

(७) खूँट=दिशा. सबै=सर्व. चौथ=चौथाई.

मारि दल मुगल तिहारी तलवार आज उछलि बिछलि म्यान बामी तें निकासती । तेरी तलघार लागे दूसरी न माँगे कोऊ काटि के करेजा स्रोन पीवत बिनासती ॥ साहि के सपूत महाराज सिवराज बीर तेरी तरवार स्याह नागिन ते जासती । ऊँट हय पैदल सवारन के झुण्ड काटि हाथिन के मुण्ड तरबूज लौं तरासती ॥ ८ ॥

(८) उछलि=उसळून. बिछलि=अलग होऊन. बामी=बीळ. निकासती=निघते. स्याह=काळी. तरासती=कापते. जासती=ज्यास्त.

तेरी स्वारी माँझ महाराज सिवराज बली केते गढ़पतिन के पंजर मचकि गे । केते बीर मारि के बिडारे किरवानन ते केते गिद्ध खाय केते अंबिका अचकि गे ॥ भूषन भनत रुण्ड मुण्डन की माल करि धार पाँव नाँदिया के भार ते भचकि गे । टूटिगो पहार बिकराल भुवमण्डल के सेस के सहस फन कच्छप कचकि गे ॥ ९ ॥

(९) मचकि गे=पीडा झाली. बिडारे=टाकले. अचकि गे=खाऊन गेली. नाँदिया=नंदीबैल. भचकि गे=विस्मित झाला. टूटिगो=तुटला. कचकि गे=कुचलून गेला.

तखत तखत पर तपत प्रताप पुनि नृपति नृपति पर सुनि है अवाज की । दण्ड सातौ दीप नवखंडन अदंड पर नगर नगर पर छावनी समाज की ॥ उदधि उदधि पर दाबनी खुमानजू की थल थल ऊपर सुबानी कविराज की । नग नग ऊपर निसान झरि जगमगे पग पग ऊपर दुहाई सिव-राज की ॥ १० ॥

बारह हजार असवार जोरि दलदार ऐसे अफल खान आयो सुरसाल है। सरजा खुमान मरदान सिवराज बीर गंजन गनीम आयो गाढ़े गढ़पाल है ॥ भूषन भनत दोऊ दल मिलि गये बीर, भारत सो भारी भयो युद्ध बिकराल है। पार जावली के बीच गढ़ परताप तले स्रोन भयो सोनित सों अजौं धरा लाल है ॥ ११ ॥

(११) सुरसाल=राक्षस. गंजन=नाश करणारा. सों=नें. अजौं=अद्याप.

कत्ता के कसैया महावीर सिवराज तेरी रूम के चकत्ता तक संका सरसात है। कासमीर काबुल कलिंग कलकत्ता अरु कुल करनाटक की हिम्मत हिरात है ॥ विकट विराट बंग व्याकुल बलख बीर बारहो बिलायत सकल बिललात है। तेरी धाक धुँधरि धरा में अरु धाम धाम अंधाधुन्ध आँधी सी हमेस हहरात है ॥ १२ ॥

(१२) अरु=आणि. हिरात है=हरली आहे. धुँधरि=अंधार.

तेरे त्रास बैरी बधू पीवत न पानी कोऊ पीवत अघाय धाय उठ अकुलाई है। कोऊ रही बाल कोऊ कामिनी रसाल सो तो भई बेहवाल भागी फिरै बनराई है। साहि के सपूत खुद आलम खुमान सुनो भूषन भनत तेरी कीरति बनाई है। दिल्ली को तखत तजि नींद खानपान तजि सिवा सिवा बकत-से सारी पातसाई है ॥ १३ ॥

बंद कीने बलख सो बैर कीनो खुरासान कीनी हबसान पर पातसाही पलही। बेदर कल्यान घमसान कै छिनाय लीने जाहिर जहान उपखान ये ही चलही ॥ जंग करि जोर सों निज़ाम साहि ज़ेर कीनी रन में नमाय हैं बुन्देल छल-बल ही। ताके सब देस लूटि शाहजी के सिवराज कूटी फौज अजौं मुगलन हाथ मलही ॥ १४ ॥

(१४) उपखान=म्हण. मलही=चोळतात.

कूरम कबंध हाडा तूँ बर बघेला वीर प्रबल बुन्देला हुते जेते दलमनी सों। देवल गिरन लागे मूरति ले विप्र भागे नेकहू न जागे सोई रहो रजधनी सों। सबने पुकार करी सुरन मनाइबे को सुर ने पुकार भारी कीनी विश्वधनी सों। धरम रसातल को डूबत उबार्‍यो सिवा मारि तुरकान घोर बल्लम की अनी सों ॥ १५ ॥

(१५) बल्लम=भाला, अनी=टोंक. नेकहू=एक देखील. मना इबे=प्रसन्न करण्यासाठीं. उबार्‍यो=वर उचलला.

बैठतीं दुकान लैके रानी रजवारन की तहाँ आइ बादशाह राह देखे सब की। बेटिन को यार और यार है लुगाइन को राहन के मार दावादार गये दबकी ॥ ऐसी कीनी बात तोऊ काऊए न कीनी घात भई है नदानी बंस छत्तिस में कबकी। दच्छिन के नाथ ऐसी देखि धरे मूछों हाथ सिवाजी न होतो तो सुनत होती सब की ॥ १६ ॥

(१६) लुगाइन स्त्रिया. नदानी=उपमर्द. सुनत=सुंता.

देह देह देह फिर पाइये न ऐसी देह जौन तौन जो न जानै कौन जौन आइबो। जेते मन मानिक हैं ते ते मन मानि कहैं, धराई में धरे ते तौ धराई में धराइबो ॥ एक भूख राख भूख राखै मत भूषन की यहि भूख राख भूप 'भूषन' बनाइबो। गगन के गौन जम न गिनन दैहैं नग नगन चलैगो साथ नग न चलाइबो ॥ १७ ॥

(१७) देह देह=या. जेते=जितके. मन=माणि. जौन तौन=जो, तो. मन मानी=इच्छेस येईल त्याप्रमाणें. भूख=भूक. गौन=जाणें. जम=यम. गिनन न दै हैं=मोजुं देत नाहीं. नगन=दागिने, नग्न.

जोर रूसियान को है तेग खुरासान की है नीति इंगलांड चीन हुन्नर महादरी। हिम्मत अमान मरदान हिन्दुवान हू

की रूम अभिमान हबसान हद कादरी ॥ नेकी अरबान सान अदब इरान त्यौंही क्रोध है तुरान ज्यों फरांस फंद आदरी । भूषन भनत इमि देखिये महीतल पै बीर सिरताज सिवराज की बहादरी ॥ १८ ॥

(१८) महादरी=आदरणीय. अमान=निरभिमान. नेकी=इमानदारी, सचोटी. सान अदब=विनयाची पद्धत. फंद आदरी=फितुरीची गोडी. हद कादरी=कादरी संप्रदायाची मर्यादा.

आपस की फूटही ते सारे हिन्दुवान टूटे टूट्यो कुल रावन अनीति अति करते । पैठिगो पताल बलि बज्रधर ईरषा तें टूट्यो हिरनाक्ष अभिमान चित्त धरते ॥ टूट्यो शिशुपाल बासुदेव जू सों बैर करि टूट्यो है महिष दैत्य अधम बिचरते । राम कर छुवन ते टूट्यो ज्यों महेश चाप टूटी पातसाही सिवराज संग लरते ॥ १९ ॥

(१९) पैठिगो=घुसला. छुवन ते=स्पर्श करण्यानें.

साजि दल सहज सितारा महाराज चलै बाजत नगारा पढ़ै धाराधर साथ से । राइ उमराइ राना देस देसपति भागे तजि तजि गढ़न गढ़ोई दसमाथ से ॥ पैग पैग होत भारी डाँवाँडोल भूमि गोल पैग पैग होत दिग्ग मैगल अनाथ से । उलटत पलटत गिरत झुकत उझकत शेषफनि वेद पाठिन के हाथ से ॥ २० ॥

(२०) गढ़ोन=किल्ले. गढ़ोई=किल्लेदार. पैग पैग=पदोपदीं. डाँवाँ डोल=इकडे तिकड. मैगल=हत्ती. उझकत=न्याहाळीत.

चोरी रही मन में ठगोरी रही रूप ही में नाहीं तो रही है एक मानिनी के मान में । केस में कुटिलताई नैन में चपलताई भौंह में बँकाई हीनताई कटियान में । भूषन भनत पातसाह पातसाहन में तेरे सिवराज राज अदल जहान

में। कुच में कठोरताई रति में निलजताई छाँड़ि सब ठौर रही आइ अबलान में ॥ २१ ॥

(२१) ठगोरी=कपट. भौंह=भिवई. बँकाई=बाँक. कटियान=कंबर. अद्ल=न्याय. जहान=जग. ठौर=ठिकाण.

सुमन में मकरन्द रहत है साहि नन्द मकरन्द सुमन रहत ज्ञान बोध है। मानस में हंस बंस रहत हैं तेरे जल हंस मैं रहत करि मानस बिसोध है ॥ भूषन भनत भौंसिला भुवाल भूमि तेरी करतूति रही अदभुत रस ओध है। पानी में जहाज रहे लाज के जहाज महाराज सिवराज तेरे पानिप पयोध है ॥ २२ ॥

(२२) बिसोध=दुर्गंध. रसओध=रसानें भरलेली. पानिप=पाणी, मान.

सवैया

चक्रवती चकत्ता चतुरंगिनि चारि यों चापि लई दिसि चक्का। भूप दरीन दुरे भनि भूषन एक अनेकन बारिधि नक्का ॥ औरंगशाह सों साहि को नन्द लड्यो शिव शाह बजाय के डक्का। सिंह की सिंह चपेट सहे गजराज करे गजराज सों धक्का ॥ २३ ॥

(२३) चापि लई=दाबून घेतली. दिसि चक्का=दिशा चक्र. दुरे=लपले भनि=म्हणतो. नक्का=उतरून. सों=शीं.

औरंग सा इक ओर सजे इक ओर सिवा नृप खेलनवारे भूषन दच्छिन दिल्लिय देस किये दुहूँ टीक ठिकान मिनारे ॥ साह सिपाह खुमानहि के खग लोग घटान समान निहारे। आलमगीर के मीर वजीर फिरैं चहुगान बटान से मारे २४

(२४) सा=शहा. ओर=बाजू. चहुगान=चौगान, एक खेळ. बटान=चेंडू.

श्री सिवराज धरापति के यहि भाँति पराक्रम होवत भारी। दंड लिये भुवमंडल के नहिं कोऊ अदंड बच्यो

छतधारी ॥ बैठ सु दच्छिन भूषन दच्छ खुमान सबे हिन्दु-
वान उजारी। दिल्ली तें गाजत आवत ताजिये पीटत आप
को पंज हजारी ॥ २५ ॥

(२५) उजारी=प्रकाश केला. ताजिये=ढोले, ( येथें सुभेदार ता०),

यों पहिले उमराव लरे रन जेर किये जसवन्त अजूबा।
साइतखाँ अरु दाउदखाँ पुनि हारि दिलेर महम्मद डूबा ॥
भूषन देखे बहादुरखाँ फिर होय महाबतखाँ अति ऊबा।
सूखत जानि शिवाजी के तेज सों पान से फेरत नौरँग
सूबा ॥ २६ ॥

(२६) ऊबा=त्रस्त. से=प्रमाणें. सों=नें.

छप्पय

तहवरखान हराय ऐँड़ अनवर की जंग हरि।
सुतरुदीन बहलोल गये अबदुल समद मुरि ॥
महमद को मद मेटि शेर अफ़गनहि ज़ेर किय।
अति प्रचंड भुजदंड बलन काहिँ न दंड दिय ॥
भूषन बुँदेल छत्रसाल डर, रंग तज्यो अवरंग लजि।
झुक्के निशान तजि समर सों मक्के तक्कि तुरक्क भजि ॥ २७ ॥

(२७) ऐँड=ऐट. मुरि=तुकून. मेटि=नष्ट करून. काहि नें=कोणाला
नाहीं? तक्कि=पर्यंत. तुरक्क=तुर्क. भजि=पळाले.

सैयद मुगल पठान सेख चन्द्रावत भच्छन।
सोम सूर द्वै बंस राव राणा रन रच्छन ॥
इमि भूषन अवरंग और पदिल दल जंगी।
कुल करनाटक कोट भोट कुल हबस फिरंगी ॥

चहुँ ओर बैर महि मेरु लगि साहितनै साहस झलक।
फिरे एक ओर सिवराज नृप एक ओर सारी खलक ॥ २८ ॥

(२८) भोट=समूह. चहुँ ओर=चहूंकडे. खळक=जग.

कौन करे बस वस्तु कौन यहि लोक बड़ो अति ? ।
को साहस को सिंधु कौन रज लाज धरे मति ? ॥
को चकवा को सुखद बसै को सकल सुमन महि ? ।
अष्ट सिद्धि नव निद्धि देत माँगे को सो कहि ? ॥
जग बूझत उत्तर देत इमि कवि भूषन कवि कुल सचिव ॥
दच्छिन नरेस सरजा सुभट साहिचन्द मकरन्द सिव ॥ २९ ॥

(२९) को=कोण. रज=राजश्री. चकवा=चक्रवाक (पक्षी). बूझत=विचारीत. निद्धि=निधि.

कवित्त मनहरण

साहूजी की साहिबी दिखात कछु होनहार जाके रजपूत भरे जोम बमकत हैं। भारे भारे नग्र वारे भागे घर तारे दे दे बाजे ज्यों नगारे घनघोर घमकत हैं। व्याकुल पटानी मुगलानी अकुलानी फिरैं भूषन भनत माँग मोती दमकत हैं। दच्छिन के आमिल भो सामिलहि चहूँओर चम्बल के आरपार नेज़ा चमकत हैं ॥ ३० ॥

(३०) बमकत=उसळत. नग्र=नगर. तारे=ताले, कुलुपे. घमकत=दणदणत. दमकत=चमकत. आमिल=अधिकारी. भो=झाले. सामिल हि भो=मिसळले. नेजा=भाला.

बलख बुखारे मुलतान लौं हहर पारे काबुल पुकारे कोऊ धरत न सार है। रूम रूँदि डारै खुरासान खूँदि मारै खाक खादर लौं झारै ऐसी साहु की बहार है ॥ सक्खर लौं भक्खर लौं मक्कर लौं चले जात टक्कर लेवैया कोऊ वार है

नपार है। भूषन सिराज लौं परावने परत फेरि दिल्ली पर परंति परिन्दन की छार है ॥ ३१ ॥

(३१) हहर पारे=हाहाकार करतो. सार=हत्यार. रूँदि डारे=कुचलून टाकलें. खूँदि=चूर्ण करून. खाक=माती. खादर=एक नदी. लौं=पर्यंत. सकर, भकर, मकर=सिंध प्रांतांतील गांवें. साहू=शाहू. परिन्दन=पक्षी. छार=धूळ. परावते=पलायन.

दोहा

रेवा ते इत देत नहिं, पत्थिक म्लेच्छ निवास।
कहत लोग इन पुरनि मैं, है सरजा को त्रास ॥ ३२ ॥

(३२) इत=अलीकडे. पत्थिक=वाटसरू. पुरनिमें=गांवांत. को=चा.

कवित्त मनहरण

बाजि बम्ब चढो साजि बाजि जब कलँ भूप गाजी महाराज राजी भूषन बखानते। चंडी की सहाय महि मंडी तेजताई ऐंड़ छंडी राय राजा जिन दंडी औनि आन ते॥ मन्दी भूत रवि रज बन्दी भूत हठ धर नन्दी भूतपति भो अनंदी अनुमान ते। रङ्की भूत दुवन करङ्कीभूत दिगदंती पंकीभूत समुद सुलंकी के पयान ते ॥ ३३ ॥

(३३) कलँ=मोठा. ऐंड छंडी=ऐट सोडून. औनि= पृथ्वी. रंकी=दरिद्री. भूत=झाले. दुवन=शत्रु. करंकी=कलंकित. समुद=समुद्र.

रहत अछक पै मिटै न धक पीयन की निपट जु नाँगी डर काहू के डरै नहीं। भोजन बनावै नित चोखे खान-खानन के सोनित पचावे तऊ उदर भरै नहीं ॥ उगिलत आसौ तऊ सुकल समर बीच राजै रावबुद्ध कर बिमुख परै नहीं ॥ तेग या तिहारी मतवारी है अछक तौलौं जौलौं गजराजन की गज़क करै नहीं ॥ ३४ ॥

(३४) अच्छक=तृप्त. धक=इच्छा. पीवन=स्थूल. नाँगी=नग्न. काहू के=कोणाचे. उगिलत=ओकत. आसौ=आंसव. रावबुद्ध=हाडा छत्रसालाच्या भावाचा पणतू. गज़क=खमंग.

जा दिन चढ़त दल साजि अवधूतसिंह तादिन दिगन्त लौं दुवन दाटियतु है । प्रलै कैसे धाराधर धमकें नगारा धूरि धारा ते समुद्रन की धारा पाटियतु है ॥ भूषन भनत भुवगोल को कहर तहाँ हहरत तगा जिमि गज काटियतु है । काँच से कचरि जात सेस के असेस फन कमठ की पीठि पै पिठी सी बाँटियतु है ॥ ३५ ॥

(३५) अवधूतसिंह=रीवाँ ( रेवा ) संस्थानिक. दुवन=शत्रू. दाटियतु है=रेटतो. धूरि=धूळ. पर्तटयतु है=भरतो. तगाजिमि=ताग्याप्रमाणें. असेस= सर्व. पीठिपै=पाठीवर.

मेचक कवच्च साजि बाहन बयारि बाजि गाढ़े दल गाजि रहे दीरघ बदन के । भूषन भनत समसेर सोई दामिनी है हेतु नर कामिनी के मान के कदन के ॥ पैदरि बलाका धुरवान के पताका गहे घेरियत चहूँओर सूते ही सदन के । ना करु निरादर पिया सों मिलु सादर ये आये बीर बादर बहादर मदन के ॥ ३६ ॥

(३६) मेचक=काळा. बयारि=वारा. मान के कदन के=मानभंगाचे. बलाका=बगळा. धुरवान=मेघ.

उलदत मद अनुमद ज्यों जलधि जल बल हद भीम कद काहू के न आह के । प्रबल प्रचंड गंड मंडित मधुप वृन्द बिन्ध्य से बिलन्द सिन्धु सात हू के थाह के ॥ भूषन भनत झूल झम्पति झपान झुकि झूमत झुलत झहरात रथ डाह के । मेघ से घमंडित मजेजदार तेज पुंज गुंजरत कुंजर कुमाऊँ नरनाह के ॥ ३७ ॥

(३७) उलदत=ढळत. भीम=स्थूल. आह=धैर्य. विंध्य=पर्वत. बिलन्द=उंच. झूल झंपति झपान=झुलीस लावलेले. झहरात=झाडतात. मजेजदार=मिजासखोर. कुंजर=हत्ती.

जुद्ध को चढ़त दल बुद्ध को जसत तब लंक लौं अतंकन के पतरैं पतारे से। भूषन भनत भारे घूमत गयंद कारे बाजत नगारे जात अरि उर छारे से॥ धसिक धरा के गाढ़े कोल की कड़ाके डाढ़े आवत तरारे दिगपालन तमारे से। फेन से फनीस फन फूटि विष छूटि जात उछरि उछरि सिंह पुर वै भुआरे से॥ ३८॥

(३८) अतंक=धाक. गयंद=हत्ती. उरछारे=छाती फाटली. धसिकै=घुसून उछरि=उसळून.

अकबर पायो भगवन्त के तनै सों मान बहुरि जगतसिंह महा मरदाने सों। भूषन त्यों पायो जहाँगीर महासिंह जू सों साहिजहाँ पायो जयसिंह जग जाने सों॥ अब अवरंगजेब पायो रामसिंह जू सों और दिन दिन पैहै कूरम के माने सों। केते राजा राय मान पावैं पातसाहन सों पावै पातसाह मान मान के घराने सों॥ ३९॥

(३९) कूरम के माने=कछवाहा वंशज मानसिंह. केते=कित्येक.

डंका के दिये ते दल डम्बर उमंड्यो उडमंड्यो उडमण्डल लौं खुर की गरद्द है। जहाँ दारासाह बहादुर के चढ़त पैड़ पैड़ में मड़त मारू राग बम्ब नद्द है॥ भूषन भनत घने घुम्मत हरौल वारे किम्मत अमोल बहु हिम्मत दुरद्द है। हद्दन छपद्द महि मद्द फरनद्द होत कद्दन भनद्द से जलद्द हलदद्द है॥ ४०॥

(४०) डम्बर=मेघ. उडमंड्यो=व्यापलें. उडमंडल=तारामंडल. गरद्द=गर्द धूळ. पैड पैड=पदोपदीं. दुरद्द=हत्ती. छपद्द=भृंगे.

भले भाई भासमान भासमान भान जाको भानत भिखा-
रिन के भूरि भय जाल है। भोगन को भोगी भोगीराज
कैसी भाँति भुजा भारी भूमिभार के उभारन को ख्याल है॥
भावतो समानि भूमि भामिनी को भरतार भूषन भरतखंड
भरत भुवाल है। बिभौ को भँडार औ भलाई को भवन
भासे भाग भरे भाल जयसिंह भुवपाल है॥ ४१॥

(४१) भासमान=सूर्य. भानत=नष्ट करीत. भावतो=आवडती.

पौरच्च नरेस अमरेस जू के अनिरुद्ध तेरे जस सुने ते
सुहात स्रौन सीतलैं। चंदन सी चाँदनी सी चादरैं सी चहूँ
दिसि पथ पर फैलती हैं परम पुनीत लैं॥ भूषन बखानी
कवि मुखन प्रमानी सो तो बानी जू के बाहन हरख हंस
हीतलैं। सरद के घन की घटान सी घमंडती हैं मेंढ्ढ ते
उमंडती हैं मंडती महीतलैं॥ ४२॥

(४२) स्रौन=श्रवण, कान. सरद=शरद् ऋतु. मेंढ्ढ=एक संस्थान.

साहि के सपूत रनसिंह सिवराज वीर बाही बाहा सम-
सेर सिर सत्रुन पै कढ़ि कै। काटे वै कटक कटकिन के
निकट भूमें हम सों न जात कह्यो सेस सम पढ़ि कै॥ पारा
बार ताहि को न पावत है पार कोऊ सोनित समुद्र यहि
भाँति रह्यो बढ़ि कै। नादिया की पूँछ गहि पौरि के कपाली
बचे काली बँची मांस के पहार पर चढ़ि कै॥ ४३॥

(४३) बाही=उगारली. सोनित=रक्त. भाँति=प्रकार. नादिया=नंदी.
पूँछ=शेपूट. गहि=धरून. कपाली=महादेव. पहार=पर्वत.

साहि के सपूत सिवराज वीर तेरे डर अडग अपार
महा दिग्गज सो डोलिया। बंदर विलायत सो उर अंकु-
लाने अरु संकित सदाय रहे बेस बहलोलिया॥ भुषन
भनत कौल करत कुतुबशाह चारे चहुँ ओर इच्छा पदि-

लसा भोलिया । दाहि दाहि दिले कीने दुखदाई दाग ताते आहे आहि करत औरंगशाह औलिया ॥ ४४ ॥

(४४) अडग=न डगमगणारा. सो=प्रमाणें. डोलिया=झुलणारा. अरु= आणि. अकुलाने=व्याकूळ झाले. बेस=पुष्कळ. कौल=प्रतिज्ञा. चारे=चाळविती. भोलिया=भोळा. दाहि=जाळून. आहि आहि=हाय हाय.

दिल्ली को हरौल भारी सुभट अडोल गोल चालिस हजार ले पठान धायो तुरकी । भूषन भनत जाकी दौरिही को सोर मच्यो येदिल की सीमा पर फौज आनि ढुरकी ॥ भयो है उच्चाट करनाट नरनाहन को काँपि उठी छाती गोलकुण्डा ही के धुर की । साहि के सपूत सिवराज बीर तैने तब बाहुबल राखी पातसाही बीजापुर की ॥ ४५ ॥

(४५) हरौल=सेना. गोल=समुदाय. ढुरकी=पोहोंचली. उच्चाट=उदासीन. नरनाहन=राजे.

घिरे रहे घाट और बाट सब घिरे रहे बरस दिना की गैल छिन माँहि ह्वै गयो । ठौर ठौर चौकी ठाढ़ी रही सब स्वारन की मीर उमरावन के बीच ह्वै चलो गयो ॥ देखे में न आयो ऐसे कौन जानै कैसे गयो दिल्ली कर मीड़े कर झारत किते गयो । सारी पातसाही के सिपाह सेवा सेवा करैं पर्यो रह्यो पलँग परेवा सेवा ह्वै गयो ॥ ४६ ॥

(४६) घिरे रहे=घेरले आहेत, पहारे बसले आहेत. गैल=रस्ता. दिना= दिवस. छिन माँहि=क्षणांत. ह्वै गयो=निघून गेला. ठौर=ठिकाण. ठाढ़ी=उभी बीच व्है=मधून. मींडे चोळीत. झारत=झाडीत. सेवा=शिवाजी. परेवा= पारवा, कबूतर. व्है गयो=झाला.

कोकनद नैनी केलि करी प्रानपति संग उठी, परजंक ते अनंग जोति सोकी सी । भूषन सकल दलमलि हलचल भये

बिन्दु लाल भाल फैल्यो कान्ति रवि रोकी सी ॥ छूटि रही गोरे गोल गाल पै अलक आछी कुसुम गुलाब के ज्यों लीक अलि दोकी सी । मोती सीस फूल ते बिथुरि फैलि रह्यो मानो चन्द्रमा ते छूटी है नछत्रन की चौकी सी ॥ ४७ ॥

(४७) कोकनद नैनी=कमल नयनी. केलि=क्रीडा. अनंग जोति सोकी सी=मदन तेजानें सुकल्यासारखी. अलक=केश. लीक=रेखा, चिन्ह. दो की सी=दोघांप्रमाणें. बिथुरि=विखरून.

देखत ही जीवन बिडारो तो तिहारो जान्यो जीवनद नाम कहिबे ही को कहानी मैं । कैधौं घनश्याम जो कहावै सो सतावै मोहिं निहचै कै आजु यह बात उर आनी मैं ॥ भूषन सुकवि कीजै कौन पर रोसु निज भागिही को दोसु आगि उठति ज्यों पानी मैं । रावरे हू आये हाय हाय मेघराय सब धरती जुड़ानी पै न बरती जुड़ानी मैं ॥ ४८ ॥

(४८) बिडारो=सोडला. जान्यो=समजते. जीवनद=जीवनदाता. रोसु=राग. निहचै कै=निश्चय करून. जुड़ानी=शांत झाली. पै परन्तु. बरती=व्रत करणारी.

मलय समीर परलै को जो करत अति जमकी दिसा ते आयो जमही को गोतु है । साँपन को साथी न्याय चन्दन छुये ते डसै सदा सहबासी विष गुन को उदोतु है ॥ सिंधु को सपूत कलपद्रुम को बंधु दीनबंधु को है लोचन सुधा को तनु सोतु है । भूषन भनै रे भुव-भूषन द्विजेस तैं कला-निधि कहाय कै कसाई कत होतु है ॥ ४९ ॥

(४९) परलै=प्रलय. जम की दिसा=दक्षिण. ते=पासून. उदोतुहै=उत्पन्न करितो. सोतु=स्रोत, प्रवाह. कलानिधि=चन्द्र. कत=कसा ?

बन उपवन फूले अंबनि के झौर झूले अवनि सुहात सोभा और सरसाई है । अलि मदमत्त भये केतकी बसंती फूली भूषन बखानै सोभा सबै सुखदाई है । बिषम बिडा-

रिबे को बहत समीर मंद कोकिला की कूक कान कानन सुनाई है। इतनो सँदेसो है जू पथिक तिहारे हाथ कहो जाय कन्त सों बसन्त ऋतु आई है ॥ ५० ॥

(५०) अंबनि के=आम्रवृक्षांचे. झोर=गुच्छ. सुहात=शोभते. सँदेसो=निरोप. कन्त=कांत, प्रिय. पथिक=प्रवासी.

जिन किरनन मेरो अंग छुयो तिनहीं सों पिय अंग छुवै क्यों न मैन दुख दाहे को। भूषन भनत तू तो जगत को भूषन है हौं कहा सराहौं ऐसे जगत सराहे को ॥ चंद ऐसी चाँदनी तू प्यारे पै बरसि, उतै रहि न सकै, मिलाप होय चित चाहे को। तू तो निसाकरै सब ही की निसा करै मेरी जो न निसा करै तो तू निसाकर काहे को ॥ ५१ ॥

(५१) छुयो=स्पर्श केला. मैन दुख दाहे को=कामाग्नीनें दग्ध झालेल्यास. निसाकर=चन्द्र. निसा=तृप्ति.

कारो जल जमुना को काल सो लगत आली छाइ रह्यो मानो यह विष काली नाग को। बैरिन भई है कारी कोयल निगोड़ी यह तैसो ही भँवर कारो बासी बन बाग को ॥ भूषन भनत कारे कान्ह को वियोग हिये सबै दुखदाई जो करैया अनुराग को। कारौ घन घेरि घेरि मार्‍यो अब चाहत है एते पर करति भरोसो कारे काग को ॥ ५२ ॥

(५२) कारो=काळें. निगोड़ी=दुष्ट (स्त्रियांच्या तोंडीं मराठींतील 'मेली' ह्या शब्दासारखा हा शब्द नेहमीं असतो) भँवर=भृंग. कान्ह=कृष्ण. काग=कावळा. एते पर=इतक्यावर.

सवैया

सौंधे भरी सुखमा सु खरी मुख ऊपर आइ रही अलकैं।
कवि भूषन अंग नवीन बिराजत मोतिन माल हिये झलकैं ॥
उन दोउन की मनसा मनसी नित होत नई ललना ललकैं।

